




किंमत १। रुपया.

चित्रशाळा, पुणें.

"स्फूर्ति" मासिकांतील निवडक गोष्टी : पुस्तक ४

# कथामंदिर





प्रस्तावनालेखक

रा. प्र. कानिटकर एम्. ए.

१९३३ ]

[ किंमत १। रुपया

# अनुक्रमणिका

| विषय | लेखक | | | पृष्ठांक |
|---|---|---|---|---|
|  |

# प्रस्तावना.

आजकालच्या वाङ्मयनिर्मितींत लघुकथेनें जें अग्रस्थान संपादन केलें आहे, तें पाहिलें असतां लघुकथेचें केवढें महत्त्व आहे, तें ध्यानांत आल्यावांचून रहाणार नाहीं. आजकाल लघुकथांना एवढें अपूर्व प्राधान्य प्राप्त झालें आहे कीं, आजच्या युगाला लघुकथांचें युग म्हटल्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं. समाज आणि ललितवाङ्मय यांचा अगदीं निकट संबंध असल्यामुळें समाजसुधारणेच्या दृष्टीनें लघुकथावाङ्मयाचा अत्यंत उपयोग आहे हें सांगणें नकोच. राष्ट्रीय जागृतीच्या दृष्टीनें लघुकथा हें परिणामकारक व अमोघ साधन आहे, ही गोष्ट पाश्चात्य वाङ्मयांत अनेकवार सिद्ध झालेली आहे. सहेतुक पण ध्येयप्रधान गोष्टींचें उद्दिष्ट मनोरंजन एवढेंच नाहीं, तर चालू परिस्थितीविषयीं जनतेच्या हृदयांत आंदोलन उत्पन्न करणें हेंही तिचें एक महत्त्वाचें कार्य आहे. ज्यांत सामाजिक जिवनाचें यथार्थ पण आदर्शपूर्ण प्रतिबिंब पडलें आहे अशा गोष्टी विचाराला चालना देण्यास उपयोगीं पडतात. क्षणभर करमणूक हें लघुकथेचें ध्येय नाहीं; उद्बोधन हें आहे. देशांतील विचारजागृतीस हातभार लावणें हें लघुकथेचें प्रमुख उद्दिष्ट समजलें पाहिजे.

या दृष्टीनें लिहिलेल्या गोष्टींना तंत्राची मोठीशी आवश्यकता आहे असें नाहीं. त्या परिणामकारक कशा होतील, व वाचकांना विचार करावयास कशा लावतील इकडे लेखकानें लक्ष पुरविलें म्हणजे झालें. ज्यांना परिणामकारक लघुकथा लिहितां येत नाहींत, त्यांनीं लघुकथेच्या तंत्राचें स्तोम माजविल्यास आश्चर्य नको. लघुकथेचें एक स्वतंत्र शास्त्र असून त्याचा ज्यानें अभ्यास केलेला नाहीं, त्याला लघुकथाच लिहितां येणार नाहींत, असें या तंत्रवादी लेखकबुवांना वाटत असतें. शास्त्र काय, वाटेल त्या गोष्टींचें शास्त्र बनवितां येईल. रस्ते झाडण्याचें सुद्धां एक शास्त्रच आहे.

त्याचप्रमाणें तंत्राच्या चौकटींत बसणाऱ्या लघुकथा लिहिण्याचेंही शास्त्र बनवितां येईल. पण हल्लीं जो उठतो तो लघुकथेचें तंत्र अभ्यासून लघु-कथा लिहिण्याची महत्त्वाकांक्षा बाळगत असतो. तंत्राचा अभ्यास करून जर गोष्टी लिहितां आल्या, तर स्वतंत्र लेखनाची प्रगति खुंटलीच म्हणून समजावें. तंत्रवादी लेखक इतके परतंत्र व परावलंबी असतात कीं, त्यांच्या-जवळ तंत्ररूपी पांगुळगाडा नसेल तर त्यांची लेखणी अडलीच, असें म्हण-ण्यास हरकत नाहीं. तंत्रशास्त्र हें एक प्रकारचें खूळ आहे. म्हणजे लघु-कथेला अगदींच धरबंध नाहीं असें नाहीं. लघुकथा हा जरी कलाविलासाचा एक प्रकार असला तरी, आणि वाङ्मयदृष्ट्या त्या कलेला महत्त्व असलें तरी लघुकथेंत जिव्हाळा किंवा जिवंतपणा नसेल तर ती कला निर्जीवच म्हटली पाहिजे. एकाच भावनेचें परिणामकारक केंद्रीकरण हें लघुकथेचें मर्म आहे. ज्या गोष्टीच्या वाचकाच्या मनावर इष्ट परिणाम होतो, तीच गोष्ट उत्कृष्ट समजावयास मुळींच हरकत नाहीं. तंत्राच्या फंदांत पडल्यानें बहुतेक वेळीं रसहानि होऊन परिणामकारकता नष्ट होते. म्हणून नवीन लघुकथालेखकांनीं ह्या मंत्र-तंत्रांच्या फंदांत न सांपडतां आपली गोष्ट वाचकांवर कसा परिणाम करील इकडे लक्ष पुरवून लघुकथा लिहिण्याचा प्रयत्न करावा, म्हणजे त्यांस यश हें ठेवलेलेंच आहे.

एक नवीन विचार म्हणजे अनेक कल्पनांचा उद्गम. नवीन विचार हा इतका तेजस्वी व शक्तिगर्भ असतो कीं त्याच्यापासून अनेक नव्या नव्या कल्पनांना जन्म मिळूं शकतो. छऱ्याच्या बंदुकीचा चाप ओढल्याबरोबर ज्याप्रमाणें अनेक छरे उडतात, त्याप्रमाणें विचाराच्या स्फोटाबरोबर असंख्य कल्पना हवेंत तरंगूं लागतात. प्रत्येक नवीन लेखकाजवळ नवीन विचार असतीलच असें नाहीं. पण नवीन कल्पना मात्र असल्याशिवाय त्याच्या लेखाला कोणी कवडीचीहि किंमत देणार नाहीं. आपला लेख जास्तीत

जास्त वाचला जावा व त्याची सर्वत्र प्रशंसा व्हावी, असें प्रत्येक लेखकाला वाटत असतें. लेखकाची ही इच्छा स्वाभाविक असली तरी विविध अभिरुचीच्या वाचकांचें समाधान करणें हें दुर्घट कार्य आहे. तथापि लेखकाजवळ जर नव्या कल्पनांचा भरपूर संग्रह असला तर त्याची ही इच्छा सफळ व्हावयास मुळींच प्रत्यवाय नाहीं. नियतकालिकांतील लेखांचें जर कोणतें वैशिष्ट्य असेल तर 'कल्पनानाविन्य' हें आहे. प्रत्येक लेखांत कांहीं तरी नवीन व अ-पूर्व असल्याशिवाय वाचकांचें त्याकडे लक्ष वेधत नाहीं. तसा विचार केला तर प्रत्येक लेखकाला अगदीं नवीन विचार सांपडणार नाहींत; पण त्याला निदान एकादी नवीन कल्पना शोधून काढतां येणें अशक्य नाहीं. सामान्य वाचकाला नेहेमीं तेंच तेंच वाचावयाचा कंटाळा आलेला असतो. त्याच त्याच गोष्टींची, प्रसंगांची व कल्पनांची पुनरुक्ति झालेली पाहून वाचकाचें चित्तस्वास्थ्य नाहींसें झाल्यास व त्यानें लेखकाच्या कल्पनादारिद्र्याचा तीव्र निषेध केल्यास आश्चर्य नाहीं. सामान्य वाचक नेहेमीं नाविन्याचा—अपरिचिताचा भुकेलेला असतो. त्याची भूक भागाविणें हें प्रत्येक लेखकाचें कर्तव्य आहे. वास्तविक दृष्ट्या विचार करतां विषयांना तोटा नाहीं, असेंच प्रत्येक लेखकाला आढळून येईल. मात्र त्यानें डोळे उघडून जगाकडे व्यापक दृष्टीनें पाहिलें पाहिजे. प्रत्येकानें आपली स्वतःची भूमिका—पेशा—व्यवसाय—व्यक्तित्व क्षणभर विसरून नव्या सृष्टींत संचार करावयास लागलें पाहिजे. परकायाप्रवेश करून नव्या दृष्टीनें पहावयास लागलें पाहिजे. तरच त्याला हजारों कल्पना सुचतील—आपल्यावर कल्पनांची वृष्टि होत आहे असा त्याला अनुभव येईल. मजूर, लोहार, शेतकरी, खलाशी, भांडवलवाला, मच्छीमार, मुत्सद्दी, भिकारी इत्यादि अनेक प्रकारच्या व विविध व्यवसायाच्या धंदेवाईकांशीं समरस झाल्याशिवाय त्याला नवीन दृष्टि येणार नाहीं. नवीन दृष्टि यावयाला आपल्या आंखीव व मर्यादित क्षेत्रापलीकडे पहावयाची संवय व्हावी लागते. नवीन विषयांबरोबर मांडणींतहि नाविन्य लागतें ही गोष्ट पुष्कळ लेखक विसरतात.

एक वेळ विषयांत ताजेपणा नसला तरी चालेल, असेंही म्हणतां येईल; पण तो इतक्या आकर्षक भाषेंत व सफाईनें मांडण्यांत आला पाहिजे कीं सुसर ज्याप्रमाणें माणसाला पाण्यांत ओढून घेऊन जाते, त्याप्रमाणें लेखानें वाचकाचें आकर्षण केलें पाहिजे. त्याची इच्छा असो वा नसो, त्याला लेखाच्या प्रवाहाबरोबर वहात जाणें भागच पडलें पाहिजे. लेखाच्या मांडणींत जर इतकी वेधकशक्ति असेल, तर त्याच्या लेखाचें सार्थक झालेंच म्हणून समजावें. म्हणून प्रत्येक लेखकानें नव्या कल्पना अमलांत आणण्याचा प्रयत्न केल्यास तो लेखक यशस्वी व लोकप्रिय झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

लघुकथा लिहूं इच्छिणाऱ्या नवीन लेखकांच्यासाठीं हे चार विचार मांडले आहेत. ते त्यांना उपयुक्त होतील अशी आशा आहे.

घोम.<br>
ता. १९-१०-३३

रा. भ. कानिटकर

"स्फूर्ति" मासिकाच्या पांचव्या वर्षात ज्या लघुकथा व लघुनाटिका प्रसिद्ध झाल्या, त्यापैकीं निवडक गोष्टींचा व नाटिकांचा ह्या पुस्तकांत संग्रह करण्यांत आला आहे. यापूर्वी प्रसिद्ध झालेल्या "स्फूर्तिप्रभा" "कथा-मंमार" इत्यादि पुस्तकांप्रमाणें हा संग्रहही वाचकांना मनोरंजक, उद्बोधक व स्फूर्तिप्रद वाटेल असा भरंवसा आहे. या संग्रहांत ज्या लेखकांच्या गोष्टी व नाटिका प्रसिद्ध झाल्या आहेत त्यांचे आम्ही अत्यंत आभारी आहों.

# युद्धानंतर.

स. वि. सामंत.

कांहीं वर्षांपूर्वी फ्रान्सच्या पूर्व भागांत, मोठमोठ्या प्राचीन वृक्षांनीं झांकलेला व रुंद तटानें परिवेष्टितअसा एक मोठा वाडा होता. या वाड्यापासून राजरस्ता बराच दूर होता. एक अर्धवट मळलेली पाऊलवाट मात्र वाड्यापर्यंत पडलेली दिसे; यावरून असें वाटे—या वाड्यांत राहणारे लोक एकांताचे व शांततेचे निस्सीम उपासक असावे.

वाड्याच्या चारी बाजूला उद्यान होतें. पण निगा न ठेवल्यानें त्याला लहानशा जंगलाची कळा आली होती. दाट गवतांत कांटेरी झुडपें इतकीं वाढलीं होतीं, कीं तेथें पाय ठेवण्यास जागा नव्हती. मोठमोठ्या वृक्षांना वळसे देत एक नदी वाहत होती. तिच्या कलशब्दानें उद्यान एकसारखें मुखरित असे. पूर्वी तेथें एक पुष्करणी होती, पण सध्यां सभोंवतालचा दगडी तट फुटून जाऊन, तिला डबक्याचें रूप आलें होतें. घनदाट तरुलतांचें त्यांत प्रतिबिंब पडल्यामुळें, तो एक काळा आरसाच आहे, असा भास होई; जवळच एक जुनें होडगें एका प्रवाहहीन डबक्यांत, गवताच्या हिरवळींत बुडून बसलें होतें, अस्ताव्यस्त वाढलेल्या 'आयव्ही' लतेनें भिंतीच्या पडक्या जागा झांकून टाकल्या होत्या. तिच्यावरच्या मजल्यावरून झोंके घेणाऱ्या नाग्या हिरव्या झालरीसारख्या दिसत असत.

जेथें फुलांचा ताटवा असायचा तेथें रानगवताचा हिरवा गालिचा पसरला होता. जेथें गुलाबांच्या फुलांचा सुगंध दरवळायचा तेथें कांहीं रानफुलांनीं आपल्या निर्वास रंगाचा भिकार भपका भरपूर मांडला होता. उद्यानाच्या फाटकापासून वाड्यापर्यंत कशी तरी एक क्षुद्र पाऊलवाट पडली होती. प्रवेशद्वारांतल्या दगडी पायऱ्यांवर व दगडी 'फूटपाथ' वर रेशमी फितेसारखी शेवाळाची हिरवळ उगवली होती. पायऱ्यांच्या दोहीकडे जे दोन 'एन्जेल' चे पुतळे होते, त्यांतला एक आपल्या आसनावर कसाबसा उभा होता,आणि दुसरा खालीं गडगडत जाऊन मातींत बुजला होता. वाड्याच्या आंत मोठें अंगण होतें. अंगणाच्या मध्यभागीं एक आड होता. त्याच्या लोखंडी कठड्याभोंवतीं रान वाढलें होतें.

पूर्वी वाड्याच्या खोल्यांतून जी विलाससामुग्री होती, तिचे कांहीं अवशेष अजून विद्यमान् होते. निरनिराळ्या तुळयांवर व भिंतीवर जें सार्टीन, किनखाप व मखमल यांचे कापड होतें—तें एकाद्या राजवाड्याला शोभेसें होतें. जरीची किनार, झालरी, पडदे, गालिचे इत्यादि कितीतरी जिन्नस पडले होते; पण सर्व जुने मळकट झालेले—फाटकेतुटके ! पडद्यांच्या कांठांच्या सार्टीनचें फूल उडून गेलेलें; खुर्च्यांच्या बसण्याच्या जागेची वेतांची विणकर जाऊन केवळ दोरे लोंबत होते; तसबिरांच्या चौकटींवरच्या गिल्टाचे तुकडे पडून गेले होते; दारांच्या बिजागऱ्या अर्ध्याअधिक निखळलेल्या; चांदवा, रेशमीकापड इत्यादि वस्तूंवर इतकी धूळ बसली होती, कीं त्यांचा मूळचा रंग लोपून गेला होता. शामदानमधील सफेत मेणबत्त्या बरेच दिवस पडून राहिल्यानें पिवळ्या झाल्या होत्या.

गेल्या शतकांतल्या विशिष्ट रंगानें व लक्षणांनीं परिपूर्ण असलेल्या या जुन्या वाड्यांत 'हर्टेन्शिया' नांवाची एक परम सुंदर स्त्री गुप्तपणें राहत होती.

ती कोण हें कुणालाच माहीत नव्हतें. समाजाच्या कोलाहलापासून पांचसहा सेवकांसह तिचें हें दूर राहणें, लोकांना एक कौतुकविषय होऊन बसलें होतें.

तिथला सर्वच देखावा विषादमय होता. फुलांच्या ताटव्यांत सध्यां एकहि फूल नव्हतें. घुराड्यांत कोंबडी, बदकें, कबुतरें यांतलें कांहींच पक्षी नव्हते. फार काय वनबिडालादि या वाड्याला सोडून जवळच्या अरण्यांत जाऊन राहिले होते.

ती स्त्री व तिचा तो वाडा या दोहोंत मात्र एक विलक्षण साम्य होतें. या

पुरातन वाड्यावर व या विषादमय उद्यानावर तिचा जो अनुराग होता, तो या सादृश्यामुळेंच असावा.

हें विषादमय घर व घराभोंवतीं वाढलेलें रान या सुंदरीच्या प्रशांत व विषण्ण सौंदर्याला जणूं एक आच्छादन होतें. हर्टेन्शियाची चालण्याची मदालसगति व जणूं जीवनाला कंटाळून जमिनीवर अर्धवट पडलेल्या तरुलतांचें मृदुमंद चलनवलन, या दोहोंत बरेंच साम्य होतें. तिचें मुख पांडुरवर्ण, आकाशहि पांढुरकें, दोहोंत विलक्षण सादृश्य. त्या प्रदेशाची कवित्वपूर्ण निषण्णता व रमणीचा सौम्य व रम्य शांतभाव यांचें हर्टेनशियांत पूर्ण मिश्रण झालें होतें. तिच्या डोळ्याची दृष्टि आणि या सर्व प्रदेशांतल्या प्रकाशाचा रंग अगदीं एकसारखा अस्पष्ट व सदासर्वदा जलसिक्त. बाहेरचा प्रकाश दाट धुक्यांतून येई, तर तिचे डोळे सदोदित पाण्यानें डबडबलेले असत, त्यामुळें ते अधिकच तेजस्वी दिसत.

कोणी म्हणत ती पश्चात्तापानें पोळणारी पतिता असावी. कोणी आपल्या मनाशीं असें ठरवीत—ती शोकसंतप्त विधवा असावी; कोणी अशीहि कल्पना करीत असत, कीं ती विरहविधुरा विरहिणी असावी. त्या प्रांतांत हर्टेन्शिया हें एक चालतेंबोलतें—न उलगडणारें—कोडें होऊन बसलें होतें. तिची आंतरिक गुप्तव्यथा कोणती, तीं कोणालाच कळली नव्हती. एकाद्या मोठ्या वृक्षाच्या कठीण सालीच्या आंत प्रच्छन्नपणें राहणाऱ्या कीटकाप्रमाणें कोणता तरी दुःखकीटक तिच्या हृदयाला निष्ठुरपणें पोखरून पोखरून खात होता, पण ती आपली मुद्रा निर्विकार ठेवून तें दुःख झांकण्याचा प्रयत्न करी.

१८७० साल आलें. जर्मनी आणि फ्रान्स यांचें युद्ध जुंपलें, खेड्यांतले लोक भयानें पळूं लागले. फ्रेंचांचा लागोपाठ चार लढाईंत पराजय आला. तिला लढाई म्हणण्यापेक्षां एकानें पलायन करावें आणि दुसऱ्यानें पाठलाग करावा—असा पाठशिवणीचा खेळ चालला होता. शेतकरी आपलीं घरेंदारें-जनावरें-मोकाट सोडून पळून गेले. त्या लुटारू जनावरांनीं शेतांतील पकी खाऊन टाकण्याचा सपाटा लावला. प्राणभयानें घाईघाईनें पळणाऱ्या खेडवळांनीं अस्ताव्यस्त व बेसुमार भरलेल्या गाड्या पुष्कळशा वाटेंतच उलटून पडल्या. वगैरें

अग्निकुंड झालें ! जळत्या घरांच्या भिंतींवर अग्निस्फुल्लिंगांचा भीषण नाच चालू झाला !

हर्टेन्‌शियाचा वाडा एका मैदानावर होता. त्याच्या जवळ दोन पहाड होते. त्या दोन पहाडांमध्यें एक लहान टेकडी होती. टेकडीवर फ्रेंचांचा एक किल्ला होता. वाड्याच्या मागच्या अंगाला एक लहानसें खेडें होतें. युद्धशास्त्राच्या दृष्टीनें उभय पक्षांना ही जागा सोयीची होती.

वाड्याजवळच्या मैदानांत फ्रेंचांनीं तळ दिला होता. तो तळ मागें रेटण्याकरतां जर्मनांनीं जोराची चढाई सुरु केली होती.

युद्धाला तोंड लागल्यानंतर हर्टेन्‌शिया आपल्या वाड्याच्या गच्चीवर उभी राहून, ती भीषण मौज पहात असे. मैदानावर सैन्याची मुंग्यांसारखी लांबचलांब अर्धचंद्राकृति रांग पसरली होती ! धुरानें सगळा प्रदेश व्यापून टाकला होता. मधून मधून त्या भागावरचा धूसर पडदा, तोफेंतून सुटणाऱ्या गोळ्यांच्या चकचकाटानें किंचित्‌काल दूर होई.

तीन दिवस तोफांचा धूमधडाका चालू होता. चवथ्या दिवशीं मोठ्या साहसानें व पराक्रमानें प्रशियन सैन्यानें फ्रेंचांनीं धरलेली जागा सर केली. फ्रेंच पळूं लागले.

थोड्याच वेळांत या वाड्याचा तट ओलांडून भयभीत फ्रेंच सैनिक दूर गेले. सर्वस्वाला मुकलेले शेतकरीहि आपलीं घरेंदारें व शत्रूनें लावलेल्या आगीनें जळलेलीं शेतें सोडून देऊन, त्या पलयित सैनिकांचें अनुकरण करीत होते.

संध्यासमय. सारे पराजित फ्रेंच पळून गेले होते. अशा वेळीं हर्टेन्‌शियाला आपल्या वाड्याकडे येणाऱ्या धूसर रस्त्यावर धुळीनें भरलेली अशी एक अस्पष्ट आकृति दिसूं लागली. दोन मोठ्या रेघांत एक लहान काळी रेघ काढावी, तशी ती आकृति दिसत होती. ती हळुहळूं पुढें येऊं लागली. थोड्याच वेळांत मनुष्यांच्या मूर्ति स्पष्ट दिसूं लागल्या. दोन सैनिक एका खाटेवरुन एक जखमी सैनिक घेऊन येत होते.

ते आपल्याच वाड्यांत येत आहेत, हें हर्टेन्‌शियानें अदमासानें ओळखलें. ती गच्चीवरून खालीं आली, व नोकरांना एक स्वच्छ शय्या अंथरून ठेवण्याची आज्ञा केली. हें काम तिनें इतक्या झटपट केलें कीं, ते सैनिक उद्यानाच्या फाटकांत

पाय ठेवतात न ठेवतात तोंच ती त्यांच्या स्वागतासाठीं प्रवेशद्वाराजवळ उपस्थित राहून, त्यांना म्हणाली:—

" या बाजूनें या—"

त्या घायाळ सैनिकामागून क्रमाक्रमानें आणखीहि अनेक जखमी लोक आले. जे प्रथम आले, त्यांना सर्वांपेक्षां चांगल्या खोल्या मिळाल्या. शेवटीं सार्‍या खोल्या भरून गेल्या. उरलेल्या लोकांपैकीं कांहीं लोकांस, नोकरांच्या खोल्यांत, कांहींना व्हरांड्यांत, कांहींना गच्चीखालच्या जागेंत, तर कांहीं जणांना घोड्यांच्या तबेल्यांत ठेवावें लागलें. तो वाडा म्हणजे एक शुश्रूषागृहच झालें.

सैन्याबरोबर असणारा एक डॉक्टर आपल्या शुश्रूषापथका सह तेथें आला, व त्यानें आपले औषधोपचार सुरू केले. त्यावेळीं तोफाबंदुकांचा दुरून ऐकूं येणारा ध्वनि बंद पडला होता, पण या वाड्याच्या आंत जखमी सैनिकांचा गोंगाट व आर्तनाद ऐकूं येऊं लागला.

हर्टेन्‌शियानें आपल्या वस्त्रांच्या कपाटांतून एक साटीनचा शोभिवंत कपडा बाहेर काढून, त्याचे चार तुकडे केले, व त्यांतले दोन तुकडे, एका पांढर्‍या स्वच्छ चादरीवर आडवेउभे शिवून, उपस्थित अधिकार्‍याचे मतानुसार एक निशाण तयार केलें, व तें आपल्या वाड्याच्या उंच भागीं लावण्याची आज्ञा केली.

जर्मनसैन्यानें फ्रेंचांना जरी दूर पिटाळलें होतें, तरी फ्रेंच सैन्यानें या वाड्यापासून किंचित् दूर अंतरावर पुन्हां व्यूह रचून, डोंगरखिंडीचें रक्षण करण्याचा निश्चय केला. जर्मनांनीं जी जागा सर केली होती, त्या जागेवरून खिंडीवर अचूक मारा करतां येत होता. पण ती खिंड व विजयी जर्मन गोलंदाजांची तुकडी या उभयतांच्या मध्यभागीं हर्टेन्‌शियाचा वाडा उभा होता.

हर्टेन्‌शियाच्या वाड्याच्या गच्चीवर 'रेडक्रॉस'ची ध्वजा फडफडत असल्यानें, वाडा खालीं करण्याबद्दल जर्मन सेनापतीनें हुकूम सोडला. हा हुकूम घेऊन एक सैन्याधिकारी आपल्या गोटांतून बाहेर पडला, व अर्ध्या घटकेच्या आंत हर्टेन्‌शियाच्या वाड्यापुढें येऊन पोंहचला.

वाड्याकडे हुकूम घेऊन येतांना, त्या सैन्याधिकाऱ्याची अशी समजूत होती, कीं वाड्यांत गेल्याबरोबर भयभीत झालेला खेडवळ मालक अगदीं नम्रतेनें आपल्या हुकुमाची तामिली करील. पण "तुमचा हुकूम पाळता येत नाहीं" हें हर्टेन्‌शियाचें खडखडीत उत्तर ऐकून, तो आश्चर्यचकित झाला. त्याच्याबरोबर दोन सैनिक होते. त्याच्या मनांत असतें, तर हर्टेन्‌शियाला हुकूम पाळायला त्यानें भाग पाडलें असतें. पण रमणीच्या सौंदर्यानें तो मुग्ध झाला होता. हर्टेन्‌शियानें त्याला आपल्या वाड्यांत नेऊन सर्व जाबते दाखविले. सर्व खोल्या गोळ्यांनीं घायाळ झालेल्या सैनिकांनीं भरून गेल्या होत्या. परत जातांना हर्टेन्‌शिया फाटकापर्यंत बरोबर येऊन त्याला म्हणाली—"मी कधींहि हें घर सोडून जाणार नाहीं. जर या घरावर तोफा डागायच्या असल्या तर खुशाल डागा. माझ्या आश्रयाला आलेल्या जखमी सैनिकांची जी अवस्था होईल, तीच दशा माझी होईल."

हें सडेतोड उत्तर ऐकून, जर्मन सैन्याधिकारी विरक्त होऊन निघून गेला; पण तो हर्टेन्‌शियाच्या सौंदर्यानें इतका मूढ झाला होता कीं, आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्याकडे केलेल्या सर्व हकीगतीच्या रिपोर्टांत जखमी लोक किंवा हुकमाची अमान्यता यांच्या वर्णनापेक्षां हर्टेन्‌शियाच्या असाधारण रूपसौंदर्याचें वर्णनच अधिक होतें. त्यानें हर्टेन्‌शियाच्या रूपाची इतकी ओतप्रोत स्तुति केली होती, कीं ती वाचून, जर्मनांचा तरुण सेनापति—फ्रेंचावर जय मिळवणारा—तो कांहीं मूर्ख नव्हता—या भानगडीचा स्वतः निकाल करण्याचा निश्चय करून, दोन रक्षकांसह घोड्यावर बसून, हर्टेन्‌शियाच्या वाड्याकडे येण्यास निघाला.

विजयी जर्मन सेनापति वाड्याजवळ येऊन पोंहचला, त्यावेळीं संध्याकाळ झाली होती. रस्त्याच्या दोन्हीं बाजूंस वांकलेल्या वृक्षशाखांची काळोखी कमान झाली होती. आकाशांत नारंगी रंगाचे कांहीं मेघ क्रमशः काळे होऊं लागले होते. जलाशयांत वेड्यावांकड्या प्रतिबिंबित झालेल्या वृक्षशाखा वाऱ्यानें आंदोलित होत होत्या. भिंतीवर इतस्ततः सुटलेली 'आय्‌व्ही' लता झोंके खात होती; फुलांच्या ताटव्यांतल्या भिजलेल्या मातीचा वास दूरवर पसरला होता; गवाक्षांत बाहेर पडलेल्या प्रकाशाजवळ कांहीं पाकोळ्या उडत होत्या; याच प्रकाशाचे पीतकिरण, उद्यानांतल्या झुडपांवर पडले होते. जित आणि जेते यांच्या बंदुकांच्या राशी दरवाजाजवळच गवतावर जवळजवळ रचून ठेवल्या होत्या. त्यामुळें वाड्याला एकाद्या शांति-आश्रमाची शोभा आली होती.

पायऱ्यांच्या कठड्यावर हाताचा भार देऊन जिन्याच्या समोर असणाऱ्या प्रवेशद्वारांत हर्टेन्‌शियानें जर्मन सेनापतीचें स्वागत केलें.

सेनापति वयानें तरुण होता. त्याचें उच्चपद त्याच्या लीनपणानें शोभून दिसे. त्याची कोमल पण वीरपुरुषोचित सुंदर मुखश्री, त्याची बोलण्याचालण्यांत सहज व्यक्त होणारी सामरिक वीरवृत्ति, कोणत्याहि स्त्रीला मुग्ध करण्यास समर्थ होती.

ज्यावेळीं त्यानें हर्टेन्‌शियाला पाहिलें, त्यावेळीं आपण एक सैनिक आहों, हें विसरून आपण एक मनुष्य आहों, एवढीच भावना त्याच्या मनांत उरली. त्यानें सभ्यपणानें आपल्या डोक्याची टोपी काढून हातांत घेतली; एकाद्या मोठ्या मजलशीच्या जागेंत प्रवेश करावा—तसा यावेळीं त्याचा रुबाव होता.

बराच वेळ दोघांचीं गमतीदार उत्तरेंप्रत्युत्तरें झालीं, पण सेनापतीच्या स्वरांत उग्र किंवा रुक्ष भाव किंचित्‌सुद्धां व्यक्त झाला नाहीं. फार काय हाताखालच्या अधिकाऱ्याजवळून जें नकारात्मक उत्तर त्यानें ऐकलें होतें, तें स्वतः हर्टेन्‌शियाकडून पुनः समक्ष ऐकूनसुद्धां त्याच्या मुद्रेंत कांहीं फरक पडला नाहीं. त्यानें तें अगदीं शांतपणें ऐकून घेतलें. उत्तर देतांना हर्टेन्‌शिया जिन्याच्या कठड्यावर ओणवी होऊन झोंके घेत होती. पाहणाराला वाटावें—जणूं तरल कल्पनांचेंच आंदोलित रम्य चित्र !

पहिल्या दालनांत जो थोडासा प्रकाश होता,तो हर्टेन्‌शियानें जणुं आपल्याकडे आकर्षून घेतला होता. तिच्या चारी बाजूंना पडलेल्या काळ्याकुट्ट अंधारांत तिची देहलतिका विशेषच खुलून दिसत होती. जवळच्या पुष्करणींतल्या बेडकांनीं आपल्या बेसूर रटरटण्याचा सपाटा लावला होता; मधूनमधून दूर असलेल्या जर्मन सैन्यांतला बिगूल ऐकूं येत होता.

पण यावेळीं जर्मन सेनापतीची स्थिति काय झाली होती ? तो पागल बनला होता ! त्याला कांहीं ऐकूं येत नव्हतें ! नाहीं—ऐकूं येत होतें—पण तो हर्टेन्‌शियाच्या कोमल कंठांतला मधुर स्वर ! त्याच्या दृष्टीला दिसत होतें–केवळ हर्टेन्‌शियाचें सुंदर मुखकमल ! बाकी कांहीं दिसत नव्हतें—कांहीं ऐकूं येत नव्हतें ! तो कर्तव्याला विसरला होता—मातृभूमीला विसरला होता—राजाला विसरला होता–फार काय फ्रेंचांचें वैर विसरला होता ! शेवटीं उत्तर प्रदेशांतला बर्बर ल्याटीन रमणीच्या पदतलीं नम्र झाला ! त्यानें आपला मान—अधिकार—सर्वस्व सौंदर्याला वाहिलें. हर्टेन्‌शियाचे पाय धरून त्यानें हांक मारलीः—

" सुंदरी !– "

या त्याच्या अधिक प्रसंगानें हर्टेन्शिया रुष्ट न होतां, अविचलित चित्तानें त्याचा हात धरून, तिनें त्याला वर उठविलें व आपल्या मधुर स्वरानें म्हणालीः– " जा तुम्हीं आतां. उद्यां तुम्हीं माझ्या वाड्याच्या मागची टेंकडी खात्रीनें सर करणार. त्याबद्दल मी कांहीं म्हणत नाहीं– माझें म्हणणें इतकेंच—त्यावेळीं इथं एकहि गोळा पडला नाहीं–तुमच्या सैन्यांतली एकादीहि गोळी या भिंतीला चाटून गेली नाहीं–जर या विव्हळणाऱ्या घायाळ लोकांच्या वेदना अधिक वाढविणारा कोणताही लष्करी हुकूम तुम्हीं—तुमच्या हाताखालच्या अधिकाऱ्यांनीं सोडला नाहीं, फार काय वाड्यासभोंवतीं असणाऱ्या वृक्षांचें एक पान पडलें नाहीं—तर—संध्याकाळीं इथं या. तुमच्या विजयाचा आनंद द्विगुणित होईल."

थोड्या वेळांत जर्मन सेनापती आपल्या छावणींत परत गेला. व आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्यांना त्यानें सांगितलें— " वाडा खालीं करण्याचें कारण नाहीं."

यावेळीं वाड्यांत जिकडेतिकडे निस्तब्धता पसरली होती. क्वचित् एकाद्या जखमी सैनिकाच्या आर्तनादानें किंवा जवळच्या अरण्यांत तरुकोटरांत लपलेल्या पक्ष्यांच्या कलरवानें, मधूनमधून त्या गंभीर निस्तब्धतेचा भंग होई.

दुसऱ्या दिवशीं जर्मनांनीं फ्रेंचाचें ठाणें काबीज केलें. कांहीं घटका गोळ्यांचा भयंकर वर्षाव झाला व नंतर फ्रेंचांच्या तोफेचें तोंड बंद पडलें—युद्ध संपलें.

जर्मन छावणींतून सहस्त्रावधि गोळे सुटले, पण हर्टेन्शियाच्या वाड्याच्या भिंतीला एकहि गोळा चाटून गेला नाहीं कीं एकहि गोळा उद्यानांत फुटून पडला नाहीं. सर्व गोळे वाड्याच्या गच्चीवरून निघून गेले.

दिवसाच्या लढाईनंतर माळमैदानावर रात्रीची निस्तब्धता व शांति पसरली; दूर क्षितिजाकडे जणूं रक्तरंजित जमिनींतून उठलेला चंद्रमा—आगीच्या गोळ्या सारखा—धीर गंभीर पदक्षेप टाकीत उगवत होता. प्रथम त्याच्या किरणमालांनीं घरें—शेतें–व वनांतील वृक्षलता आलोकित झाल्या. जेव्हां तो आकाशांत वरवर येऊं लागला, तेव्हां त्याची रक्तिमकांति बदलून तो उज्ज्वल

होऊं लागला; शेवटीं आकाशाच्या उंच भागीं येऊन तो आपल्या सुधाधवल चंद्रिकेनें चराचराला स्नान घालूं लागला.

रजततुल्य चंद्रिकेनें आवृत असलेल्या ग्रीष्मरात्रीप्रमाणें प्रशांत असलेली हर्टेन्‌शिया, पूर्व रात्रीप्रमाणें जिन्याच्या त्याच कठड्यावर हात टेकून जर्मन सेनापतीची मार्गप्रतीक्षा करीत होती. उद्यानाकडे तिची दृष्टि एकाग्र झाली होती. कोठें खुट् झालें—कीं तिला वाटे तो घोड्यांच्याच टापांचा शब्द !

एकाएकीं घोड्यांच्या टापांच्या नालांचा शब्द तिच्या कानीं पडला. थोड्या वेळांत घोड्यावरून जर्मन सेनापति उतरला; त्यानें घोड्याचा लगाम आपल्या नोकराच्या हातीं दिला, व तो जिन्याच्या पायऱ्यांकडे येऊं लागला.

हर्टेन्‌शियानें उचित अशा सौजन्यानें त्याचें स्वागत करून, हस्तचुंबनाकरतां आपला हात पुढें केला. नंतर दोघांनीं एका प्रशस्त खोलींत प्रवेश केला.खोलीला दोन दारें होतीं. एका दारानें तळमजल्याकडे जातां येई, व एकांतून दुमजल्याच्या दुसऱ्या दालनांत प्रवेश करतां येई.

हर्टेनशियानें चटकन् हातीं एक कांचेच्या दिव्याची चिमणी घेतली; तिनें आधींपासूनच ती चिमणी एका लोखंडी चौरंगावर तेवत ठेवली होती. त्यानंतर पायानें एक दरवाजा लोटला,त्याबरोबर दाराची एकच फळी उघडली, व जिना उतरायला सुरवात केली. जिन्याच्या मध्यभागींच हर्टेन्‌शियानें हातांतला दिवा जितका उंच धरवेल तितका धरून, त्याच्या प्रकाशानें तीन जर्मन जखमी सैनिक सेनापतीला दाखविले. ते गाद्यांवर घोंगड्या पांघरून झोंपले होते. त्यांतला एक भिंतीला पाठ टेकून बसला होता. त्याच्या कपाळाला पट्टी बांधली होती. त्या पट्टीच्या घडींतून रक्ताचा एक लहानसा ओघळ वाहून दाट मिशांच्या राठ केंसांत तो सांचत होता. झोंपलेला दुसरा जखमी सैनिक मोठ्या कष्टानें श्वासोच्छ्वास सोडीत होता. एकाद्या मोठ्या दगडाचा त्याच्या छातीवर दडपाच पडला आहे—असा भास होत होता. तिसरा जखमी आपल्या डगल्याच्या मुस्कटांत तोंड खुपसून विव्हळत होता. आपल्या आर्तनादानें इतरांना त्रास होऊं नये, म्हणून त्याची एकसारखी धडपड चालली होती.

जर्मन सेनापतीला या दृश्याबद्दल विचार करण्यास हर्टेन्‌शियानें पुष्कळ वेळ दिला. नंतर त्याची तंद्री मोडण्याकरतां आपल्या कोमल हातांचा लहानसा

धक्का देऊन त्याला जिन्यावरून खालीं नेलें, व समोरच्या एका खोलीचें दार उघडलें.

या जागीं एक फ्रेंच सेनानायक, जुन्या दमास्कती कापडानें आच्छादित असलेल्या एका पिंवळ्या रंगाच्या पलंगावर झोंपला होता. पलंगावर असलेल्या गाद्या व उशा यांच्या ढिगावर त्यानें पाय सोडले होते. वेदनांनीं त्याचें मुखमंडळ अगदीं कोमेजून गेलें होतें, पण एकादा अस्फुट आर्तनादहि मुखावाटें न काढण्याचा त्यानें दृढ निश्चय केलेला दिसत होता.

या खोलींत एक लहान दिवा मिणमिण करीत जळत होता. एका मेजावर एक फिकट रंगाचा गालिचा पसरला होता. त्याच्यावर काळ्या पडद्याची छाया पडल्यानें तो काळाच दिसत होता. दिव्याजवळ शस्त्रक्रियेचीं कांहीं हत्यारें व मलमपट्ट्या अस्ताव्यस्त पडल्या होत्या.

आणखी कांहीं जागा दाखवून, हर्टेनशिया जर्मन सेनापतीला घेऊन वरच्या मजल्यावर निघाली.

जिन्यावर चिखलाचे डाग पडले होते, कांहीं कांहीं ठिकाणीं रक्ताच्या मोठमोठ्या ठिपक्यांची रांग दिसत होती. जिन्याच्या पायरीजवळ एका कडेला एक मनुष्य बसला होता. त्याच्या उजव्या हाताला कापडाची पट्टी बांधली होती, व तो डाव्या हातानें पाइपांत तमाखू भरण्याची खटपट करीत होता.

हें दृश्य पहात पहात तीं दुमजल्यावर येऊन पोंहचलीं. एके काळीं जो दिवाणखाना उत्सव व आमोदप्रमोद यांसाठींच उपयोगांत आणला जाई, तोच दिवाणखाना आज जखमी लोकांचें शुश्रूषागृह झाला होता. तेथें एका दगडी टेबलावर बरींच रक्तमिश्रित पाण्यानें भरलेलीं भांडीं ठेवलीं होतीं, त्या पाण्यांत रक्तानें लडबडलेल्या चिंध्या तरंगत होत्या. टेबलामागें रांगेनें साधे तक्के मांडले होते. त्या तक्क्यांना टेकून, अनेक जखमी लोक विव्हळत होते. त्यांत एकाच्या तोंडावर तर प्रेतकळा आली होती. सर्वत्र मलमाची व रक्ताची उग्र दुर्गंधी पसरली होती. समोरासमोर दोन भिंतींना दोन आरसे लावले होते; त्यांत रोग्यांच्या अंथरुणाची रांग प्रतिबिंबित झाल्यामुळें जखमी किती आहेत, याची चटकन अटकळ करतां येत नव्हती. या दृश्यानें मनांत विषाद व भीति यांचा संचार झाल्यावांचून राहत नसे.

त्यांनीं सर्व वाडा अगदीं बारकाईनें पाहिला. गच्चीपासून स्वैंपाकघरापर्यंत सर्व

जागा जखमी लोकांनीं भरून गेली होती. एकहि दरवाजा उघडायचा उरला नाहीं. शेवटीं स्वतःच्या झोंपण्याच्या खोलींत प्रवेश करून हर्टेन्‌शियानें खाटेचे चारी बाजूचे पडदे दूर केले. उत्कृष्ट लीन कपड्यानें सुशोभित केलेल्या उशीवर एका वीर बालकाचें कोमल मुख दृष्टीला पडलें. तें पानाआडून डोकावणाऱ्या एकाद्या पुष्पकलिकेप्रमाणें अर्धें उघडें अर्धें झांकलेलें होतें. त्याचें अंग तापानें फणफणलें होतें, मुख कोमेजून गेलें होतें. तो भयानें पळून गेलेल्या जवळच्या खेड्यांतल्या एका गरीब शेतकऱ्याचा मुलगा होता. आप्तांनीं त्याचें शेवटचें चुंबन घेतलें आणि गांव सोडलें ! जर्मन सैनिक घुसले—त्यांनीं क्रूरपणानें संगीनांनीं त्याला भोंसकून जखमी केलें होतें.

जर्मन सेनापति आपल्या विजयाला लांछनस्वरूप असलेल्या त्या मुमूर्षु बालकाकडे निर्विकारपणें पाहूं लागला. नंतर त्यानें आपली दृष्टि हर्टेन्‌शियाकडे वळविली. त्याच्या त्या दृष्टींत—" ही विरक्तिपूर्ण यात्रा कधीं संपणार ? " असा हर्टेन्‌शियाला मूक प्रश्न होता.

हर्टेन्‌शियानें जखमी सैनिकांच्या आणखीहि कांहीं जागा सेनापतीला दाखविल्या. नंतर प्रथम ज्या जिन्यानें त्यांचा प्रवास सुरू झाला होता त्या जिन्यावर तीं दोघें पुन्हां येऊन पोहोंचलीं.

हर्टेन्‌शियानें आपल्या तोंडाजवळ धरलेला दिवा विझण्याच्या बेतांत होता. जणुं आपल्या जीवनाचें उद्दिष्ट कार्य संपलें—असेंच तो सांगत होता. आपल्या शेवटच्या आलोकच्छटांनीं हर्टेन्‌शियाच्या मुखमंडळाला उज्ज्वल करून दिव्याची ज्योत शांत झाली. याच वेळीं उद्यानाच्या फाटकाकडे हात करून, मृदुमधुर स्मितहास्ययुक्त व रजनीच्या नितांत स्तब्धतेला साजेशा शांत स्वरानें, जर्मन सेनापतीला हर्टेन्‌शियानें निरोप दिला—

" तुम्हीं स्वतः सर्व पाहिलें—पहात आहां—आपणाला कोणतीच जागा नाहीं ! "



एका स्पॅनिश कथानकाधारें.

# सडका माल !

किरात.

नार्वे देशांतील प्रख्यात नाटककार **इब्सन** यानें सामाजिक गोष्टींत क्रांति करणारीं अशीं अनेक नाटकें १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात लिहिल्यापासून व त्याची युरोपमधील इतर भाषांमधून भाषांतरें होऊन त्यांचे प्रयोग फ्रान्स, इंग्लंड, जर्मनी वगैरे देशांतून होऊं लागल्यापासून पाश्चिमात्य राष्ट्रांतील नाटककारांची दृष्टि बदलली व त्यांच्या नाट्यवाङ्मयास निराळेंच नवें वळण लागलें. फ्रान्समधील नाटककारांवरहि याचा परिणाम झाला. आणि फ्रेंच नाटककार मानशिअर **यूजेन ब्र्यू** यानेंहि कांहीं सामाजिक नाटकें लिहिलीं. त्यांत विशेष प्रसिद्ध अशीं तीन नाटकें आहेत. १ लें. Maternity (मातृभाव). ह्याचे प्रसिद्ध ऐरिश नाटककार **बर्नर्ड शॉ** यांचे पत्नीनें–चॉरलॉटी शॉनें–इंग्रजींत भाषांतर केलें आहे; २ रें The three daughters of Mr. Dupont ( ड्यूपांटच्या तीन कन्या ); व ३ रें Damaged goods ( सडका माल !) ह्या नाटकांनीं फ्रान्समध्यें बरीच खळबळ उडवून दिली. २ ऱ्या नाटकाचें इंग्रजींत भाषांतर **सेंट जॉन हँकिन** यानें केलें आहे, व ३ ऱ्याचें मि. **जॉन पोलॉक** यानें केलें आहे.

१९०६–०७ च्या हिंवाळ्यांत ब्र्यूचें '**मॅटर्निटी**' हें नाटक **चारलॉटी**

**शॉ** यांच्या हातीं पडलें. तें त्यांना इतकें आवडलें कीं, त्यांनीं तें एकाच बैठकींत अव्वलपासून अखेरपर्यंत वाचून टाकलें. ह्या नाटकानें त्यांना इतकी मोहिनी घातली कीं, त्याचें इंग्रजीमध्यें भाषांतर करून आपल्या देशांतील पुरुष आणि स्त्रीवर्गाच्या, तें हातीं टाकावें असें त्यांना वाटलें. व त्यांनीं ह्या नाटकाच्या भाषांतरास एकदम हात घालून तें थोड्याच अवधींत संपविलेंहि. आपलें भाषांतर अत्यंत सर्वांगसुंदर व्हावें असा त्यांचा कटाक्ष होता, आणि त्याप्रमाणें तें झालेंहि पण.

हें भाषांतर तयार झाल्यावर इंग्लंडमधील ' स्टेज–सोसायटी ' नें त्याचा प्रयोग करण्याचें ठरवून, प्रयोगाची परवानगी मागण्याकरितां त्याची हस्तलिखित प्रत दण्डप्रणेत्यांचे( Censor )कडे धाडिली. अधिकाऱ्यांकडून–' परवानगी देतां येत नाहीं,' असा ताबडतोब जबाब आला ! या जबाबांत—' या नाटकाच्या प्रयोगास इंग्लंडला कधींही परवानगी दिली जाणार नाहीं ' असेंहि लिहिलें होतें. वरील ' रंग-मंडळा ' च्या सभासदांनीं तर वरील नाटकाच्या तालमी मोठ्या हुरूपानें चालविल्या होत्या. पण उघडपणें तें नाटक करण्यास परवानगीच न मिळाल्यामुळें त्यांना वाममार्गाचा अवलंब करून त्याचे प्रयोग लंडनच्या भिकार वस्तीमध्यें जेथें जेमतेम दिवाबत्ती आहे, अशा जागेंत उरकून घ्यावे लागले. असें असूनहि त्याचे प्रयोग मोठे हातखंडे व नांवाजण्यासारखे झाले. ही १९०६–०७ मधील गोष्ट होय.

याच '**रंग-मंडळानें** ' आदले वर्षी–म्हणजे १९०५मध्यें ' एम् ड्यूमंटच्या तीन कन्या ' हें नाटक बसवून तें रंगभूमीवर आणलें होतें. याच वेळीं ' **सडका मांल** ' या नाटकाचें भाषांतर मि. पोलॉक यांनीं केलें होतें व तें ह्या ' रंगमंडळानें ' बसवून पुढें आणावें म्हणून पोलॉक यांचा एकसारखा आग्रह चालू होता, पण तें हातीं घेण्याचें धैर्य या मंडळांत झालें नाहीं ! '

इंग्लंडांत वरील नाटकास प्रयोग करण्याची बंदी व्हावी, असें जर या नाटकामध्यें कांहीं असेल तर तें एवढेंच होतें कीं, समाजामध्यें डोळ्यावर कातडें ओढून जे कांहीं सामाजिक अनाचार चालले होते, त्या अनाचारांना ह्या नाटकामध्यें तोंड फोडून नाटककारानें ते केवळ समाजसुधारणेच्या व समाजहिताच्या सदिच्छेनेंच चव्हाट्यावर आणले होते. पण असे विषय अशा प्रकारें राजरोसपणें रंगभूमीवर यावेत हें दण्डप्रणेत्यांस रुचलें नाहीं. हेंच या बंदीचें कारण होतें.

**चारलॉटी शॉ** यांना असें वाटलें कीं,वरील तिन्हीहि नाटकें एकत्र छापून

त्यांचा प्रसार झाल्यास मोठेंच कार्य होईल. म्हणून तिनें तीं एकत्र छापण्याची सारी सिद्धता केली. **बर्नार्ड शॉ** यांनीं या तिन्ही नाटकांस प्रस्तावना लिहिण्याचेंहि कबूल केलें. ही सर्व सिद्धता झाली खरी, पण कोणीहि प्रकाशक तीं छापावयास घेण्यास धजेना. कांहीं प्रकाशक पहिलीं दोन नाटकें प्रसिद्ध करण्यास तयार झाले. पण तिसरें नाटक—अर्थात् "**सडका माल**" हें नाटक प्रसिद्ध करण्यास कोणीहि धजेना! अर्थात् हीं नाटकें छापण्याचें काम नाइलाजास्तव तसेंच पडून राहिलें. व तें कायमचेंच पडून राहतें कीं काय असेंच सर्वांस वाटलें. पण चार वर्षांनंतर परिस्थिति बदलली. कारण मा० यूजेन **ब्न्यू हे फ्रेंच अकॅडेमीचे** सभासद झाले. तेव्हां सर्वच मनु पालटला.

इ. स. १९११ मध्यें **बर्नार्ड शॉ**चे अमेरिकेंतील प्रकाशक यांनीं हीं नाटकें प्रसिद्ध करण्याचें अंगीकारिलें. इकडे इंग्लंडमध्येंहि एक प्रकाशक तीं छापण्यास तयार झाला. व अशा प्रकारें एकाच वेळीं तीं दोहोंकडे प्रसिद्ध झालीं. आणि आजवर प्रकाशकांना 'हीं नाटकें खपणार कशीं? म्हणून जी मोठी भीति वाटत होती ती अस्थानीं होती असें ठरलें. कारण केवळ इंग्लंडांतच ह्या नाटकाच्या १९१८ पर्यंत तीन आवृत्त्या काढाव्या लागल्या. अमेरिकेमध्यें आवृत्त्या निघाल्या त्या वेगळ्याच. कारण तेथें ह्या नाटकांना इंग्लंडच्यापेक्षां फारच मोठ्या प्रमाणावर मागणी होत होती.

'Les Avaries' हें मूळ फ्रेंच नांव. यालाच इंग्रजींत "Damaged Goods" (सडका माल!) हें नांव दिलें होतें. या नाटकास नाटककारानें जो विषय घेतला होता तो—विषयासक्त आणि बदफैली स्त्रीपुरुषांमध्यें उद्भवणारे रोग—हा होता. समाजामध्यें हे व्यवहार उजळमाथ्यानें राजरोस जरी चालत नसले तरी ते गुप्तपणें चालत व त्यापासून होणारे दुष्परिणाम लोकांस भोगावेहि लागत. पण समाज हे दुष्परिणाम टाळण्याकरितां कांहीं विशेष उपाययोजना करण्यास तयार नव्हता. प्रत्येक जण असल्या गोष्टी चव्हाट्यावर मांडण्यास कचरत असे. समाजाचा रोग वेशीवर टांगण्याची छाती कोणासच होत नसे. पण एकच कुजकें—सडकें फळ इतर चांगल्या फळांत ठेवल्यास तीं सारींच फळें कशीं नासूं लागतात, या गोष्टीकडे लोकांचें लक्ष जात नसे. एका अपराध्यामुळें अनेक निरपराध्यांना त्याच्या संसर्गापासून किती यातना आणि त्रास भोगावे लागतात याची पूर्ण

जाणीव लोकांना नव्हती. आणि या गोष्टींचा ते विचारहि करीत नसत. कोणी केलाच तर तो निर्भीडपणें जगापुढें मांडण्याची सोय नाहीं असेंच त्याला वाटे. व अशा प्रकारें समाजांतील अनेक व्यक्तींची कुचंबणूक होऊन त्यांना समाजांत रूढ असलेल्या या व्यसनाचे दुष्परिणाम निमूटपणें भोगावे लागत. ही समाजांतील दुरवस्था नाहींशी करावी याच उदात्त हेतूनें कवीनें हें नाटक लिहिलें होतें. आणि याच उदार हेतूनें या व इतर दोन नाटकांचीं भाषांतरें प्रसिद्ध करण्याचें **बर्नार्ड शॉ** व त्याचें कुटुंब यांनीं ठरविलें होतें. या नाटकांना **बर्नार्ड शॉ** यांनीं जी प्रस्तावना लिहिली आहे त्यामध्यें त्यांनीं हा विषय यच्चावत् जनतेपुढें नाट्यप्रयोगाच्या रूपानें कां मांडला गेला पाहिजे, हें अत्यंत साधार आणि मार्मिकपणें मांडलें आहे.

१९११ च्या मे महिन्यांत ह्या तीन नाटकांचें पुस्तक बाहेर पडलें आणि नंतर सप्टेंबर महिन्यामध्यें अमेरिकेंतील ‘ कनेक्टि कट सोसाएटी ऑफ सोशिअल हायजीन ’ या संस्थेचे सेक्रेटरी डॉक्टर **थॉमस** एन् हेपबर्न यांचेकडून शॉच्या कुटुंबास एक पत्र आलें. त्यांतर—“ Damaged Goods ” या नाटकानें आमच्या मनावर फार मोठा परिणाम केला आहे. येल युनिव्हर्सिटीखालीं असणाऱ्या कनेक्टिकच्या सर्व कॉलेजांतील तरुण विद्यार्थ्यांच्या हातांत टाकण्या-करितां या नाटकाच्या पॅम्फ्लेटवजा हजारों प्रती पाहिजे आहेत. हा विषय नाट्यस्वरूपांत मांडलेलाच विद्यार्थ्यांचे हातीं टाकणें जास्त श्रेयस्कर आहे, इत्यादि मजकूर होता. डॉक्टरांच्या इच्छेनुसार ह्या नाटकाच्या १०,००० दहा हजार प्रतींची एक नवी आवृत्ति काढून, त्यांत **बर्नार्ड शॉ** यांच्या प्रस्तावनेंतील कांहीं महत्त्वाचे उतारेहि उद्धृत करून—त्यांचेकडे पाठविली गेली. दोन वर्षांतच ही आवृत्ति खलास झाली; आणि डॉक्टरसाहेबांनीं या नाटकाबद्दल पुन्हां पूर्वी-सारखीच मागणी केली. ‘ अमेरिकन फेडरेशन ऑफ सेक्स हायजीन ’ या संस्थेनें हें नाटक प्रचारकार्यास अत्यंत उपयुक्त असल्याचें ठरविल्यामुळें तर या नाटकाला अधिकाधिकच मागणी होती. यामुळें ‘ **सडका माल** ’ ह्या नाटकाच्या स्वतंत्रपणें आवृत्त्या काढाव्या लागल्या. याशिवाय तिन्हींहि नाटकांच्या एकत्र अशा आवृत्त्या निघतच होत्या. १९१३-१४ सालीं तर यांचा खप विशे-षच वाढला.

अमेरिकेमध्यें 'Damaged Goods' हें नाटक मि. **रिचर्ड बेनेट** यानें रंगभूमीवर आणलें होतें. मोठमोठ्या सर्व शहरीं त्याचे प्रयोग होत. हे प्रयोग नामांकित डॉक्टरांच्या व धर्माधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखालीं होत. प्रयोगास आरंभ होण्यापूर्वी ह्या नाटकाचें वैशिष्ट्य काय तें वरील दोघांपैकीं कोणाकडून तरी सांगितलें जाई.मोठमोठ्या शहरीं तर याचे प्रयोग वारंवार होत असतच. पण इतर छोट्याछोट्या गांवांतूनहि मोठमोठे तंबू ठोकले जाऊन या नाटकाचे प्रयोग केले जात व शेंकडों लोक ते पाहण्यास येत.

इंग्लंडमध्यें मात्र राजरोसपणें असे प्रयोग करण्यास परवानगी मिळाली नाहीं. युनायटेडस्टेट्समधून मि. व मिसेस बॅक्स्टर हीं या नाटकाचे प्रयोग करण्याकरितां म्हणून इंग्लंडला आलीं, व त्यांनीं " ब्र्यू " यांची परवानगीहि मिळविली. पण त्याचे प्रयोग करण्याची परवानगी दण्डप्रणेत्यांचेकडून मिळणें दुर्घट झालें. मि. **बॅक्स्टर** यानें इतर कित्येकांच्या मदतीनें इंग्लंडमध्यें एक 'Authors' Producing Society' म्हणून एक संस्था स्थापिली. व हिच्या विद्यमानें खाजगी स्वरूपाचे प्रयोग होण्यास सुरुवात झाली. पहिला प्रयोग १६ फेब्रुवारी १९१४ रोजीं 'लिटल् थिएटर' मध्यें झाला. यानंतर 'कोर्ट थिएटरमध्यें' त्याचे अनेक प्रयोग झाले.

महायुद्ध सुरू झाल्यानंतर ब्र्यू यांच्या ह्या विषयाकडे इंग्लंडच्या जनतेचें लक्ष अधिकच वेधलें गेलें, व पुस्तकेंहि भराभर खपत गेलीं. याचा परिणाम असा झाला कीं, दण्डप्रणेत्यांनीं ह्या नाटकावर जो बहिष्कार व बंदी घातली होती, ती त्यांना काढून घ्यावी लागली. व १८१७ पासून या नाटकाचे प्रयोग सर्रास प्रतिरात्रीं होऊं लागले.

**ऑस्ट्रेलिआ**मध्यें तर या नाटकाच्या १९१६ मध्यें अवघ्या ६ महिन्यांत ४ आवृत्त्या निघाल्या. प्रत्येक आवृत्ति १० हजारांची होती. अशा रीतीनें तेथें १९१७ पर्यंत ४०,००० प्रती खपल्या. लोकहिताच्या दृष्टीनें पाहतां या नाटकाच्या कथावस्तूंतच जें महत्त्व होतें त्यामुळेंच या नाटकाचा इतका खप व इतका बोलबाला झाला. या नाटकाच्या प्रयोगारंभीं जमलेल्या स्त्रीपुरुष प्रेक्षकांना उद्देशून मॅनेजरानें पुढील आशयाचें प्रास्ताविक भाषण करण्याचा सांप्रदाय पडला आहे:— "या नाटकाचे लेखक आणि व्यवस्थापक मंडळ यांच्यातर्फे मला

एवढेंच सांगून ठेवावयाचें आहे कीं,—उपदंशासारख्या रोगाचे विवाहसंस्थेवर जे दुष्परिणाम घडतात त्यांचें यथार्थ ज्ञान सर्वांना व्हावें, हाच हें नाटक लिहिण्याचा व तें प्रयोगरूपानें दाखविण्याचा हेतु आहे. या नाटकामध्यें एकहि असा प्रवेश नाहीं कीं, ज्यामुळें कुटाळकी करण्यास अवकाश मिळेल अथवा उद्वेग उत्पन्न होईल. आतां स्त्रीवर्गाची सद्गुणसंपन्नता—मूर्खपणा व अज्ञान यांच्या अभावामुळें अपूर्ण होते, असेंच मानावयाचें असेल तर गोष्ट वेगळी, एरवीं हें नाटक प्रत्येकानें पहावें असेंच होय."

या प्रस्तावावरून प्रस्तुत नाटकाचें स्वरूप काय आहे याची वाचकांना अंशतः तरी कल्पना येईल. ही कल्पना वाचकांना अधिक स्पष्टपणें यावी एवढ्याकरितां ह्या नाटकाचें यापुढें आम्हीं त्रोटकसें कथानक देत आहों.

ह्या नाटकाचे एकंदर तीन अंक आहेत. आणि प्रत्येक अंकामध्यें एकेकच प्रवेश आहे. अर्थात् आम्हीं जें त्रोटक कथानक देणार आहों, तें या अंकानुक्रमानेंच देणार आहों.

पहिल्या अंकालाच जी सुरुवात होते ती एका प्रख्यात डॉक्टरच्या दवाखान्यांत. या दवाखान्यामधील रोगी तपासण्याच्या एका खोलीमधून **जॉर्ज डूमॉन्ट** नांवाचा एक २६ वर्षांचा अत्यंत घाबरलेला तरुण बाहेर येतो व डॉक्टरांच्या मेजासमोरील एका कोचावर येऊन बसतो व एक दीर्घ निःश्वास टाकतो. त्याच्या मागोमाग डॉक्टरहि येऊन आपल्या खुर्चीवर बसतात. डॉक्टर येतांच त्या तरुणानें आपल्या कपाळावरील घाम एका हातरुमालानें पुसून डॉक्टरांस विचारिलें:— "मग आपण काय निदान ठरविलेंत?" डॉक्टर म्हणाले:— "दुसरें काय निदान ठरविणार मी? हा निःसंशय **फिरंगरोग** नव्हे; पण हा उपदंशाचा एक प्रकार आहे, एवढें मात्र खरें." असें म्हणून डॉक्टर प्रिस्क्रिप्शन लिहूं लागले. "फिरंग काय आणि उपदंश काय, दोन्हीहि एकच!" असें म्हणून **जॉर्ज**नें अत्यंत हताश होऊन पुन्हां एक दीर्घ निश्वास टाकला! त्याच्या डोळ्यांपुढें वरील रोगांनीं पच्छाडलेल्या अनेक व्यक्ति उभ्या राहून त्या जणूं काय त्याला भेवडावीतच होत्या! तो एकदम उद्गारला:—"तुम्हीं आपलं निदान ठरविलंत, मीहि पण आपलं निदान निश्चित ठरवून टाकलं आहे! डॉक्टर! डॉक्टर!! डॉक्टर!!!" डॉक्टर लिहितां लिहितां एकदम थबकून म्हणाले:—" असं वेड्यासारखं भेदरून जाण्यांत अर्थ काय? तुझ्यासारखा रोग इतरांना होत नाहीं

असें थोडेंच आहे ! तुझ्या वयाचे सात तरुण घेतले तर त्यांत एका इसमाला हा रोग जडला असल्याचें निःसंशय आढळून येतें. म्हणजे शेंकडा सरसहा १५ तरुण या रोगानें पच्छाडलेले असतात; ते औषध घेतात आणि बरेहि पण होतात. तुला भिण्याचें यत्किंचितहि कारण नाहीं. " असें म्हणून त्यांनीं प्रिस्क्रिप्शन पुरें करून त्याच्या हातीं दिलें. हें औषध घे, म्हणजे तूं बरा होशील. " त्यानें तें प्रिस्क्रिप्शन घेऊन आपल्या खिशांत ठेवलें, व म्हणालाः—" मला तरी हा रोग जडायला नको होता. कारण तो न जडावा याबद्दल अगदीं पहिल्यापासून मी फार दक्ष आणि सावध राहिलों होतों. तरी देखील माझें दुर्दैव ओढवलें! माझ्यासारखा दुर्दैवी मीच ! " असें म्हणून त्यानें आपण कसा दक्ष राहिलों होतों, त्याची सारी कहाणी डाक्टरांचे जवळ मोकळ्या मनानें सांगितली. त्यानें कोणतीहि गोष्ट त्यांचेपासून छपवून ठेविली नाहीं. त्यावर डाक्टरांनीं त्याला धीर दिला आणि सांगितलें कीः—यापुढें तीन वर्षेपर्यंत तरी असल्या फंदांत न पडतां ब्रह्मचर्यानें रहा म्हणजे तेवढ्या अवकाशांत ह्या उपदंशाच्या विषाचे दोष पूर्णपणें नाहींसे होतील. आणि त्यापुढें लग्न करून घेऊन एकपत्नीव्रतानें रहा म्हणजे ह्या आज जडलेल्या विकारापासून तुला अथवा तुझ्या संसर्गानें दुसऱ्याला कोणताहि अपाय होणार नाहीं. याबद्दल मी तुला हमी देतों." डॉक्टरांनीं इतकें आश्वासन दिल्यावर त्याचीहि पण खात्री आली कीं, हा आपला रोग कांहीं इतकें भिण्यासारख्या भयंकर स्वरूपाचा नाहीं. त्याला धीर आला, त्याची निराशा मावळली, आणि त्याच्या डोक्यांत उद्भवलेले आत्महत्येचे विचारहि पार ओसरून गेले !

नंतर त्यानें डाक्टरांना आपणांस ५।६ महिन्यांतच त्यांतून बरें करण्याविषयीं विनंति केली. आणि ही विनंति करीत असतां-एका श्रीमंताच्या मुलीशीं आपलें लग्नाचें ठरलें आहे, आपला भावी सासरा मोठा श्रीमंत असून त्याला आपला शब्दहि गेला आहे, तो परत घेणें यापुढें अपमानास्पद आहे, शिवाय आपली आई वृद्ध झाली असून तिला आपली नातवंडें पाहण्याची अनिवार उत्कंठा लागून राहिली आहे, तेव्हां यापुढें लग्न ३।४ वर्षांवर ढकलणें शक्य नाहीं, तेव्हां वाटेल तो खर्च आला तरी पण कसेंहि करून या रोगापासून आपल्याला निदान ५।६ महिन्यांच्या अवधींत बरें करा म्हणून त्यानें त्यांना अत्यंत केविलवाणी प्रार्थना

केली. यावर डॉक्टरांनीं त्याला निक्षून सांगितलें कीं, तूं “ आणखी चार वर्षेपर्यंत तरी या लग्नाचे भानगडींत पडूं नकोस, पडलास तर तूं आपल्या भावी पत्नीचें व आपल्या भावी संततीचेंहि जीवित आपल्या मूर्खपणामुळें फार धोक्याचें करशील ! ” असें म्हणून त्यांनीं एका ग्रंथांतून काढून त्याला दाखविली. त्यांत जणूं काय तो आपलें भावी चित्रच पहात होता ! ती ‘ केस’ वाचून तो डॉक्टरांस म्हणालाः—“ पण अशी केस म्हणजे हजारांमध्यें एकादीच कीं नाहीं ? मग त्यांत भिण्यासारखें असें काय आहे ? ” त्यावर डॉक्टर त्यास म्हणाले “ अरे, दुर्दैवानें तूंच जर ह्या हजारांपैकीं असा एकटाच निघालास तर तुझ्या भावी पत्नीचें व तुला होण्याऱ्या संततीचें काय होईल, याची कल्पना कर आणि चार वर्षेपर्यंत तरी आपलें लग्न न करण्याचें निश्चित कर. भलतेंच साहस करून विषाची परीक्षा घेऊं नकोस. ” यावर जॉर्ज डॉक्टरांस म्हणाला “ आपण मला या रोगाचे खरे दुष्परिणाम सांगितलेच आहेत; आपण सांगितल्याचा मी विचार करीन. ” असें म्हणून तो जावयास उठलाहि. डॉक्टरांनीं त्याचा हात धरून त्याला पुन्हां बसवून घेतलें आणि नाना प्रकारें त्याला समजून सांगून ते म्हणाले “नुसतें ‘विचार करीन’ असें म्हणूं नकोस, तर लग्नाचे भानगडींत पडणार नाहींस, असें मला आश्वासन दे. ” त्यावर जॉर्ज किंचित् हंसत हंसत म्हणालाः– ‘डॉक्टरसाहेब, तुमच्या सल्ल्याचा मी पूर्ण विचार करून मगच काय करायचें तें करीन,”–असें म्हणून तो डॉक्टरांचा निरोप घेऊन तेथून निघून गेला. [ येथें पहिला अंक समाप्त होतो. ]

पहिला अंक व दुसरा अंक यांमध्यें दीड वर्षाचा काल व्यतीत झालेला असतो. याचे दरम्यान जॉर्ज हा सहा महिनेपर्यंत औषध वगैरे घेऊन नंतर लॅाचेस नांवाच्या एका प्रख्यात डेप्यूटीच्या हेन्रीटे नांवाच्या एकुलत्या एक असलेल्या सुंदर कन्येशीं लग्न करितो. लग्नानंतर ९।१० महिने लोटतात न लोटतात तोंच त्यांस एक कन्या होते. आणि त्याला कायद्याची परीक्षा उत्तीर्ण झाल्यामुळें ‘ नोटरी पब्लिक ऑफिसर’ ची अधिकाराची जागाहि मिळाली होती, त्यामुळें तीं नवरा बायको मोठ्या आनंदांत रहात होतीं. त्यांना झालेली मुलगी त्याचा सासरा डेप्युटी लॅाचेस हा पॅरिस येथें रहावयास गेला होता तेथें मुद्दाम हवा पालटण्याकरितां म्हणून गेली होती. आजानें पॅरिसची उष्ण हवा तिला चांगली मानवेल म्हणून मुद्दाम नेली होती. तिच्याकरितां एक दाईहि तिला दूध पाजण्याकरितां म्हणून ठेविली होती. जॉर्जची वृद्ध आई आपल्या नातीला

भेटण्याकरितां ४।८ दिवशीं पॅरिसला जाऊन भेटून येत असे. तिचा त्या मुलीवर अगदीं जीव कीं प्राण असे. मुलीच्या खुशालीचीं पत्रें त्यांना दोनचार दिवशीं येत असत. पण गेल्या आठ दिवसांत मुलीची कांहींच खुशाली न कळल्यामुळें हेनरीटे जरा अस्वस्थ होती. मुलीची दाई फार सुस्वभावी असल्यामुळें ती तिला कांहीं एक कमी पडूं देणार नाहीं अशी त्या दोघांचीहि खात्री होती. म्हणून तीं थोडीं निर्धास्त होतीं. शिवाय हेन्रीटेची सासू वारंवार पॅरिसला जाऊन येत असल्यामुळें त्यांना मुलीची तितकीशी काळजी वाटलीहि पण नाहीं. तीं दोघें एकमेकांची थट्टामस्करी आणि विनोद करीत मोठ्या आनंदांत होतीं. हेन्रीटेनें आपल्या मुलीकरतां एक टोपी विणण्यास घेतली होती. ही टोपी आपल्या मुलीला किती छान दिसेल याचीं मनश्चित्रें काढीत ती बसली होती. जॉर्ज आपल्या आईचें आपल्या कन्येवर किती प्रेम आहे, याचीं चित्रें तो आपल्या पत्नीपुढें आपल्या रसाळ वाणीनें चितारीत होता. तसेंच आपली मुलगी जर्मेन–ही मोठी झाली म्हणजे तिच्या लग्नाला किती लोक बोलवायचे याचींहि काल्पनिक चित्रें तीं दोघें काढीत होतीं. बसबसून कंटाळा आला म्हणून हेन्रीटे आपल्या मैत्रीणीकडे परत भेटी देण्याकरितां म्हणून नवऱ्याच्या संमतीनेंच निघून गेली. जॉर्जहि एक सिगारेट पेटवून एका इझिचेअरवर धुराचे फवारे सोडीत पाय पसरून बसला. इतक्यांत त्यांची आई लेडी–मॅडम ड्यूमॉन्ट तेथें आली. आणि तिनें जर्मेन आजारी असल्याचें त्याला सांगितलें. व नातीला तिच्या दाईसह आपण पॅरिसहून घेऊन आल्याचेंहि सांगितलें. पॅरिस येथील डॉक्टराच्या सल्ल्यावरून जर्मेनेला आपण त्यानें नांव लिहून दिलेल्या येथील एका स्पेशॅलिस्ट डॉक्टरला दाखवूनच घराकडे आले व तो डॉक्टरहि इतक्यांत येथें येईल. मुलीच्या बापाची प्रत्यक्ष गांठ घेतल्याशिवाय आपल्यास त्या मुलीची औषधयोजना करितां येणार नाहीं असें तो म्हणाला. असें म्हणून तिनें त्या डॉक्टरच्या पत्त्याचा कागद जॉर्जचे हातीं टाकला. तो कागद पाहतांच तो मनांतल्या मनांत चरकला; व कांहीं वेळ अगदीं निस्तब्ध राहिला. इतक्यांत एका दासीनें डॉक्टर आल्याची वर्दी दिली. त्या बरोबर मॅडम ड्यूमांट घरांत निघून गेली. जॉर्जनें डॉक्टरांना आंत घेऊन येण्यास सांगितलें. डॉक्टर आंत येतां येतां त्या दासीला म्हणाला—
" मुलगी जागी होतांच मला वर्दी दे म्हणजे मी लगेच तिला तपासण्यास येईन," असें म्हणून तो आंत आला. डॉक्टरांचें स्वागत करून जॉर्ज त्यांस म्हणाला—

" आपण मला ओळखलं नाहीं वाटतं ? " डॉक्टर थोडे विषण्ण होऊन म्हणाले, " लग्न न करण्याविषयीं ज्याला मीं सल्ला दिला होता, तेच आपण नव्हे काय ?— आणि आतां आपल्याला हें अपत्यहि लाधलें आहे !—पाजी मनुष्य नाहीं तर ! " जॉर्ज विरमून जाऊन अगदीं गयावया येऊन म्हणाला; " माझें ऐकून तर घ्याल ! "

" मला ऐकण्याजोगें असें कांहीं आतां उरलेंलेंच नाहीं ! " डॉक्टर उद्गारले ! जॉर्ज त्यांना आपणास लग्नाला कसें उद्युक्त व्हावें लागलें तें सांगूं लागला, पण डॉक्टरनें तें कांहीं एक ऐकून न घेतां ते त्यास म्हणाले:—" मागच्या गोष्टींशी मला कांहीं कर्तव्य नाहीं. माझ्यापुढें सध्यां जो प्रश्न आहे तो या तुझ्या मुलीचा आणि तिच्या दाईचा." जॉर्जनें उत्कंठेनें विचारिलें—" मुलीला कांहीं धोका नाहीं ना ? " " मुलीला नसला तरी तिच्या दाईला आहे ! मुलीचीं चिन्हें अद्यापपर्यंत तरी विशेष चिंताजनक नाहींत." डॉक्टराचे हे शब्द ऐकून जॉर्जला थोडा धीर आला व त्यानें डॉक्टरचे आभारहि मानले. नंतर तो त्यांस म्हणाला —"नर्सच्या संबंधानें मला कांहीं समजत नाहीं, आपण सांगाल तर मी माझ्या आईला बोलावतों" डॉक्टरनें तसें करण्यास आपली हरकत नसल्याचें सांगितलें. त्यावर जॉर्ज डोळ्यांत आंसवें आणून म्हणाला, " डॉक्टरसाहेब मला आपल्याला एक विनंति करायची आहे, आणि ती हीच कीं—" माझ्या पत्नीला आणि आईलाहि पण माझ्या मुलीच्या प्रस्तुतच्या रोगाचें कारण मी आहें, हें कळतां कामा नये. कारण ती अत्यंत हळव्या मनाची आहे; आणि मलाहि पण हें लज्जास्पद होईल असें वाटत आहे ! " त्यावर डॉक्टर त्याला म्हणाले:—" तुझ्या मुलीच्या रोगाचें कारण तूं आहेस हें तुझ्या आईला यापूर्वींच कळून चुकलेलें आहे. पण तूं म्हणतोसच तर तुझ्या पत्नीला मी आपणाकडून होतां होईं तों कळूं देणार नाहीं."जॉर्जनें डॉक्टरचे पुन्हां एक वेळ आभार मानले, आणि मग त्यानें दरवाजापर्यंत जाऊन आपल्या आईस तेथें बोलावून घेतलें. मॅडम ड्यूमांट आंत येतांच डॉक्टर तिला म्हणाले:—" तुमच्या नातीकरितां मीं औषधयोजना केली आहे. त्यानें तिला बरें वाटेल, यापुढें प्रकृति अधिक न बिघडतां ती सुधरतच जाईल. पण तुमच्या दाईचा प्रश्न मात्र फार नाजुक आहे. तिला यापुढें मुलीला अंगावर पाजतां येणार नाहीं." " तर मग दुसरी एखादी दाई ठेवून देऊं."मुलीची

आजी उद्गारली. त्यावर डॉक्टर म्हणाले:—"यापुढें कोणचीहि दाई तिला वर्ज्यच केली पाहिजे. कारण मुलीला अंगावर पिण्यास घेण्यानें कोणत्याहि दाईला तें धोक्याचेंच आहे. इतकें धोक्याचें कीं तिला त्यायोगें भयंकर विषप्रयोगच व्हावयाचा !" मुलीची आजी म्हणाली– " बाटलींतून बाहेरचें दूध दिल्यास मुलगी जगणार कशी ? तें केवळ अशक्य ! ती खास मरेल !" आईचे हे शब्द ऐकून—या सगळ्याचें कारण आपण–ही कल्पना मनांत येऊन जॉर्ज अत्यंत भेदरून गेला आणि हुंदक्यावर हुंदके देत उद्गारला:—"आतां माझ्या लाडक्या जर्मेनचें कसें होणार ? देवा ! देवा ! देवा ! मीच–मीच याचें कारण !" त्यावर आजी म्हणाली:–" डॉक्टर ! ही तीन महिन्यांची अशी अशक्त मुलगी बाटलीचें दूध शोषून तरी कशी घेणार ? तिचा अंगावरच्या दुधाशिवाय कसा निभाव लागेल, तुम्हीच सांगा." डॉक्टर म्हणाले:—" तें खरं, पण—" त्यांना पुढें बोलूं न देतां आजी म्हणाली— " मुलीच्या प्राणापुढें दाईच्या प्राणाची मला किंमत नाहीं !" जॉर्ज अधिकाधिक स्फुंदूं लागला. त्यानंतर डॉक्टर म्हणाले—" मुलीच्या प्रेमामुळें तुम्हांला असं वाटणं अगदीं साहाजिक आहे. पण एका जीवाकरितां दुसऱ्याचा जीव धोक्यांत घालणं हें केव्हांहि न्याय्य होणार नाहीं; एवढेंच नव्हें, पण उलट हा गुन्हा होईल !" त्यावर आजीनें डॉक्टरांचे जवळ "आपल्याला किती तरी मुलें होऊन त्यांतला एकच एक वांचला व त्याला कोठें आतां मुलगी झालेली मी पहिल्यानेंच पाहतें आहें" असें सांगून–" तिला उघड्या डोळ्यांनीं मी कशी मरूं देऊं ?" असें म्हणून शोकाकुल झाली. जॉर्जहि—" मीच नीच ! हा सारा माझाच अपराध !" असें म्हणून हुंदक्यावर हुंदके देऊं लागला. नंतर आजी डॉक्टरास म्हणाली:—" त्या दाईला ती मागेल तें देण्याचें करून आम्हीं ठेवून घेऊं. मग याला काय तुमची हरकत ?" त्यावर डॉक्टर म्हणाले:—" ही गोष्ट शक्यच नाहीं. कारण ही दाई जरी खेडवळ असली, तरी पुढेंमागें ती आपल्या जातीवर जाईल. कोर्टांत फिर्याद मांडून तुमच्याकडून ती वाटेल तितके पैसे ओढील ! ती भोळी असली तरी जगांत चिथावून देणारे लोक थोडे नसतात. शिवाय अशी फिर्यादअर्याद झाल्यानें पुन्हां वर्तमानपत्रांतूनहि अशा गोष्टींचा बोभाटा होऊन, मनुष्य जी गोष्ट बाहेर येऊं नये म्हणून प्रयत्न करीत असतो ती आपोआप दुर्दैवानें चव्हाट्यावर येते; " असें अनेक प्रकारें डॉक्टरांनीं त्या दोघांना समजावून सांगितलें. इतक्यामध्यें मुलगी उठल्याचें कळ-

विण्याकरितां तिची दाईच तेथें आली. डॉक्टर मुलीला पुन्हां एकवार नीट तपासण्याकारितां तिच्या खोलीकडे निघून गेले. ती दाई तेथेंच उभी राहिली. मेडमनें दाईजवळ हलकेंच गोष्ट काढली. ती म्हणाली:–"जर्मेन थोडी आजारी आहे, तिच्या अंगावर अन् गालांवर फोड्या बिड्या आल्या आहेत. तोंड लाल झालें आहे. तेव्हां तूं जरा संभाळून रहा;" हे शब्द ऐकतांच ती दाई म्हणाली –"मग यांत माझा काय अन्याय? आम्ही खेड्यांतलीं माणसं." ती पुढें कांहीं म्हणणार होती. पण इतक्यांत आजी तिला म्हणाली:—"अगं तुला कांहीं दोष द्यावा, यांत तुझा कांहीं अन्याय आहे, म्हणून नाहीं तुला आम्हीं हें सांगत. तर मुलीच्या फोड्यापासून तुला त्रास होऊं नये–तिला प्यायला घेतल्यानं तुलाहि फोड्या बिड्या येण्याचा संभव, म्हणून तुला बजावून ठेवावं, इतक्याच-करितां मीं तुला जरा उभी रहा म्हणून सांगितलं. मुलगी आजारी असल्यामुळें तुझ्यावरच तिला पाजण्याचा, वेळेवर औषधपाणी देण्याचा, जाग्रण करण्याचा, –अशा अनेक तऱ्हेनं खस्ता खाव्या लागतील; तुला त्रास पडेल; आणि अशा वेळीं जर तूं आम्हांला एकदम सोडून गेलीस तर मोठीच पंचाईत होईल. हें असें होऊं नये एवढ्याकरितांच मुलगी चांगली बरी झाली म्हणजे तुला एक हजार फ्रांक देण्याची व्यवस्था आम्हीं केली आहे !" "अस्सं अस्सं ! एकून मी मध्येंच सोडून जाऊं नये म्हणून तुम्ही मला ही देणगी देणार ? मग याला माझी कुठं ना आहे ?" त्यावर जॉर्ज तिला म्हणाला, "तर मग असें एक करारपत्र आपण करूं व त्याच्यावर आमच्या आणि तुझ्या–दोघांच्याहि सह्या करून, त्याची प्रत्येकाकडे एकेक नक्कल ठेवून देऊं. म्हणजे तें दोघांनाहि बरें." दाई खुशालून म्हणाली:–" तुम्हीं जसं सांगाल तसं, माझी याला मुळींच हरकत नाहीं."

असें दाई म्हणत आहे तोंच मुलीला तपासून डॉक्टर परत आले. आजीबाईनें त्या दाईला तेथून जावयास सांगितलें. जातां जातां ती स्वतःशींच उद्गारली:– "अबब ! एक हजार फ्रँक्स ! म्हणजे केवढी रक्कम ? ही एवढी रक्कम यांनीं मला कां बरं देऊं केली ? मुलीला कांहीं भलता सलता रोग तर जडला नसेल ना?"

इकडे डॉक्टर येऊन मेजाशीं बसले व त्यांनीं एक औषधयोजना खरडली, आणि ते म्हणाले:–" मुलींत अधिक असा बिघाड कांहींच झालेला नाहीं. भिण्याचें यत्किंचितहि कारण नाहीं. मात्र ह्या दाईला अगर दुसऱ्या कोणत्याहि दाईला मुलीला अंगावर पाजूं देऊं नका. त्यामुळें ती स्वतः लंगडीकेंगडी होऊन

बसेल, तिच्या नवऱ्याला आणि मुलांना देखील तिचा रोग जडेल, आणि शिवाय तिला यापुढें संततीहि होणार नाहीं ! या सगळ्या गोष्टींचा विचार करितां मुलीला बाहेरचें दूध देणें हेंच उत्तम." यावर आजी उद्गारली: —"एकूण माझी नात जगली काय मेली काय याची तुम्हांला फिकीर नाहीं; तुम्ही ह्या दाईच्या जीवाकरितां पाहतां ? ती जर पाजायला कबूल आहे तर—" मध्येंच डॉक्टर म्हणाले:—"तिला या रोगाचें स्वरूप कळलें तर ती केव्हांहि या गोष्टीस राजी होणार नाहीं. एका मुलाचे प्राण बचावण्याकरितां दुसऱ्या दहा गरिबांचे प्राण घ्यावयाचे—आणि ते पैशाच्या बळावर, आणि दुसऱ्याच्या अज्ञानाचा फायदा घेऊन—हें केव्हांहि न्याय्य होणार नाहीं. देवाच्या घरीं हा गुन्हा होईल;व्यवहारांत तर हा मोठाच गुन्हा आणि अपराध होईल. या गोष्टीला मी केव्हांहि संमति देणार नाहीं. उलट त्या दाईला मी सारी खरी हकीगत सांगेन व तिला सावध करीन. मुलीला बाहेरचेंच दूध घालण्याचें ठरवा. मी माझ्याकडून तिला वांचविण्याचा कसून प्रयत्न करीन. त्याबद्दल तुम्ही यत्किंचित्‌हि काळजी करूं नका !" डॉक्टरचे हे शब्द ऐकून तीं दोघेंहि अगदीं हताश झालीं; तीं गळा काढून मोठमोठ्यानें रडूं लागलीं. डॉक्टरनें त्यांना धीर दिला, व सांगितलें कीं, "आपण ह्या मुलीला हरप्रयत्नानें काळाच्या जबड्यांतून ओढून काढूं. मात्र तिला दासीच्या अंगावर पाजायचें एकदम बंद करा. मुलीला संभाळण्याकरितां म्हणून तिला ठेवा. मी उद्यां पुन्हां येऊन मुलीची प्रकृति तपाशीन. तुम्ही कांहीं काळजी करूं नका." असें सांगून डॉक्टर निघून गेले. जॉर्ज त्यांना पोंचवावयाला दरवाजापर्यंत गेला.नंतर परत आला तेव्हां त्याची आई उद्गारली:—" हे सारे तुझ्याच पापाचे प्रताप आहेत. आणि ते त्या अर्भकाला भोगावे लागत आहेत! आईचे हे शब्द ऐकून जॉर्ज अत्यंत खिन्न झाला! इतक्यांत मुलीची दाई तेथें आली. व यापुढें आपल्याला राहतां येत नाहीं, आपल्याला आपल्या गांवीं गेलें पाहिजे, असें म्हणूं लागली. यावरून त्यांची व तिची बरीच बाचाबाची झाली. शेवटीं तिला हाताला धरून घरांतून बाहेर काढण्याची पाळी आली. तिनें आपल्या पगाराची, आणि ५०० फ्रांकांची मागणी केली. जॉर्ज चिरडला गेला व म्हणाला:—" तुला ५०० फ्रांक कशाबद्दल द्यायचे ? मुलीची प्रकृति बरी होई तों तूं राहि लीस तर ना ? जा, तूं ज्याअर्थी आम्हांला असा दगा देऊन जातो आहेस त्याअर्थी तुला या महिन्याचा पगारहि मिळणार नाहीं, अथवा रेल्वेचें भाडेंहि मिळणार नाहीं." त्या

दोघांनींहि तिला असें एकदम जातें म्हणण्याचें कारण काय म्हणून विचारिलें; पण ती कांहींच बोलेना. पण बरीच वाचाबाची झाल्यावर ती म्हणाली:-"माझ्या जाण्याचें कारण पाहिजे ना तुम्हांला ? ऐका तर-" याच वेळीं हेन्रीटे बाहेर गेली होती ती परत आली, तिच्या कानावर ही सारी वाचाबाची गेली. म्हणून ती जागच्याजागीं एका पडद्याच्या आड थबकून उभी राहिली. तोंच त्या दाईचे पुढील शब्द तिच्या कानीं पडले. दाई म्हणाली " नीट ऐका माझें जाण्याचें कारण; तुमचे हे भलते सलते रोग मला बाधूं नयेत, इतक्याचकरितां मी इथून आपली पाय काढणार. तुमच्या दासीनं डॉक्टरांचं सारं बोलणं आडून ऐकलं आणि तें तिनं मला सांगितलं आहे. यापुढें इथें मी एक क्षणभरहि राहणार नाहीं. माझे पैसे टाका, मी ही चाललेंच. ' ते तिला ' चुप्प रहा, ' म्हणून सांगत होते. पण ती कसली आवरतें घेणार ? ती म्हणाली:—" यापुढं तुमची मुलगी कांहीं फार दिवस जगत नाहीं, हें खास. कारण मुलीच्या बापाचं वीष तिला बाधलं आहे; आंत बाहेर सारं त्या विषानं तिला पोखरून टाकिलीं आहे ! कोणातरी बाजारबसवीशीं कुकर्म केलंत त्याचं हें सारं पाप आहे. आणि तें त्या पोरीला भोंवतं आहे !"

हेन्रीटे पडद्याचे आड उभी होती. तिनें दाईचे ते शब्द ऐकले, आणि तिनें एकदम किंकाळीच ठोकली. तिच्या सर्वांगाला कंप सुटला, आणि हुंदके देत देत ती जमिनीवर पडली ! हें पाहून जॉर्ज भेदरून जाऊन तिच्याकडे धांवतच गेला. पण त्याला जवळ आलेला पाहतांच तिनें त्याच्याकडे क्रोधानें व तिरस्कारानें पाहिलें आणि ती शहारली. वेड लागून एखादा किंकाळी ठोकतो त्याप्रमाणें तिनें एक किंकाळी ठोकली. आणि जॉर्ज पुढें येत असल्याचें पाहून ओरडून म्हणाली:—"नको, नको मला तुमचा स्पर्शहि नको !"

येथें २ रा अंक समाप्त झाला. दुसरा अंक व तिसरा अंक यांमध्यें फार काळ गेलेला नसतो. दुसऱ्या अंकांत घडलेल्या प्रकारानंतरचा हा दुसराच दिवस होता. हेन्रीटे आपल्या मुलीस घेऊन आपल्या बापाकडे रहावयास गेली होती. तिचा बाप-डेप्युटी लॅचेस यानें डॉक्टरांची गांठ घेण्याकरितां तांतडीनें आपला मोर्चा दवाखान्याकडे वळविला होता. त्याचें कार्ड पाहतांच डॉक्टरांनीं त्यांना आंत बोलाविलें व आपल्या जवळ असणाऱ्या विद्यार्थ्यांस बाहेर लावून दिलें. डेप्युटी लॅचेस आंत आले व त्यांनीं आपल्या दवाखान्याचे कामाचे वेळीं आपणास

मुलाखत दिल्याबद्दल त्यांचे आभार मानून नंतर ते म्हणाले:—" मी आज जो आपल्याला इथें भेटायला आलों आहें तो एका अत्यंत उद्वेगजनक प्रसंगामुळें. मी जॉर्ज ड्यूमांटचा सासरा. कालचा तो भयंकर प्रकार उघडकीस आल्यानंतर माझी मुलगी आपल्या आजारी मुलीसह माझ्या घरीं रहावयास आली आहे. तेव्हां यापुढें मुलीची प्रकृति पहायला तुम्हीं आमचे घरीं यावें. ही विनंति करण्याकरितांच मी आज इथं आपल्या भेटीला आलों आहें." यावर डॉक्टरांनीं त्याला "ठीक आहे," म्हणून उत्तर दिलें. त्यानंतर लॅंचेस अत्यंत क्रोधसंतप्त होऊन म्हणाला:—" आतां ह्या साऱ्या आपत्तींचं जो कारण त्या नराधमाला "—पुढें तो कांहीं म्हणणार तोंच डॉक्टर अत्यंत शांतपणें म्हणाले:–"क्षमा करा मला या विषयावर मला कांहींच बोलतां येणार नाहीं." डॉक्टरच्या नात्यानं माझं जें काम आहे तेवढ्याच संबंधानें बोला." लॅंचेस सर्द आवाजांत कोणच्या परिस्थितीमध्यें आपली मुलगी आपल्या घरीं आली तें सांगून म्हणाला:— "माझ्या सध्यांच्या मनस्थितीची आपल्यास कल्पना करतां येईल. पण त्या नराधमाच्या पशुतुल्य आचरणानें माझ्या मनोवृत्ति क्षुब्ध होऊन गेल्यामुळें मला हें तुमच्यापुढें ओकावें लागत आहे. त्याच्यावर कसा सूड उगवायचा हें मीं काल रात्रींच निश्चित केलं आहे. कालची सबंध रात्र मला झोंप नाहीं!"—डॉक्टर त्यास मध्येंच थांबवून म्हणाले:—"आपल्या मनोवृत्ती अशा क्षुब्ध व्हाव्यात हें अगदीं साहजिक आहे आणि तें योग्यहि पण आहे. पण ह्या घटकेला या बाबतींत निश्चितपणें कसें वागायचं हें ठरविण्याला उचित अशा मनःस्थितींत मात्र तुम्ही नाहीं असें मला वाटतें." यावर–" तुम्हीं म्हणतां तें खरं आहे. पण सबंध रात्रभर मी व माझ्या मुलीनें याचा विचार केला आणि ठरविलें कीं शक्य तितक्या लवकर घटस्फोट करावयाचा आणि याचकरितां आपलें सर्टिफिकेट घ्यावें म्हणून मीं आलों आहें. आपलें सर्टिफिकेट हजर करून कोर्टाकडून घटस्फोटाची परवानगी मी मिळविणार आहें." " असें सर्टिफिकेट मला देतां येणार नाहीं. कारण कोणत्याहि रोग्याचं रहस्य न फोडण्याबद्दल माझ्या धंद्यानं मी पूर्णपणें बांधला गेलों आहे." यावर लॅंचेस " एकूण गुन्हेगाराला पाठीशीं घालून त्याचा तुम्हीं बचाव करणार?" असें एकदम उसळून म्हणाला. पण डॉक्टरानें अत्यंत शांतपणानें त्यास सांगितलें कीं, " मला जरी असें बंधन नसतें तरी देखील मीं आपल्याला असें सर्टिफिकेट देण्याचें नाकारलेंच असतें. कारण अशा प्रकारचा

घटस्फोट माझ्या साहाय्यानें व्हावा, ही गोष्ट मला केव्हांहि रुचली नसती." लॉचेसनें कारण विचारतां डॉक्टर म्हणालेः– " तुमच्या कन्येच्याच हिताहिताकडे पाहतां असें करणें अत्यंत अनुचित आणि घातुक आहे, हेंच याचें कारण. आतां हें घातुक कसें तें पहाः– तुमच्या जांवयाला ' सिफीलिस ' ( उपदंशाचा रोग ) जडला असल्याबद्दलचें माझें सर्टिफिकेट तुम्हीं कोर्टांत हजर करून तुमच्या कन्येलाहि संसर्गानें हा रोग जडल्याचें तुम्हीं जगजाहीर करणार. अशानें तिला दुसरा कोणी तरी पत्करील काय ? तिचें पुन्हां लग्न ! होणें केवळ दुरापास्त होईल. मला ठाऊक आहे कीं मीं तुम्हांला असें सर्टिफिकेट दिलें नाहीं तर तुम्हीं आपल्या अर्भक नातीला एखाद्या डॉक्टरास दाखवून असें सर्टिफिकेट मिळवूं शकाल. पण याचा परिणाम काय होईल ? ती सांसर्गिक उपदंशापासून झालेली मुलगी आहे,हाच शिक्का मोठा गाजावाजा करून तिच्या डोक्यावर मारणार ! एकूण तिचें भावी जीवित तुम्हीं कडेलोटाचें दुःखमय करून सोडणार ! असाच याचा अर्थ नव्हे काय ? "

डॉक्टरांचे वरील शब्द ऐकून लॉचेस अधिकच संतापून म्हणालाः—" तर मग ज्यानें माझ्या कुटुंबावरहि अशी आग पाखडली त्याला–अशा पाप्याला–त्यापुढें गोळी घालून ठारच केलें पाहिजेः त्याला ह्या जगांतून हुसकून लावलें पाहिजे. याशिवाय दुसरा मार्ग नाहीं ! "

यावर डॉक्टर म्हणालेः—" ह्यायोगें तुम्हांला मात्र फांसावर जावें लागेल ! यदाकदाचित् त्यांतून निर्दोषी म्हणून तुम्हीं सुटलांत तरी काय ? समजा, पुढें मागें–तुमच्या मुलीचेंच मन पालटलें,व तुम्हीं क्रोधावेशामुळें आपल्या पतीचा नाहक खून केलांत असें तिला वाटलें, तर मग तुम्हीं काय करणार ? तिच्या नवऱ्याचा आपल्या अनाथ अर्भकाच्या जन्मदात्याचा खून करण्याचा हक्क तुम्हाला कसा पोंचतो, म्हणून तिनें तुम्हांला प्रश्न टाकला,—अथवा मोठी झाल्यावर तुमच्या नातीनेंच तुम्हाला हा प्रश्न टाकला, तर त्याचें तुम्हीं काय उत्तर द्याल ? "

डॉक्टरांनीं लॉचेसपुढें अत्यंत शांतपणानें वरीलप्रश्न टाकतांच तो अत्यंत निस्तब्ध होऊन सचिंत झाला. व कांहीं वेळानें एक दीर्घ निःश्वास टाकून त्यांना म्हणालाः—" तर मग मीं काय करावें म्हणतां आपण ? " डॉक्टर प्रत्युत्तरलेः– " क्षमा. " " हें तर केव्हांहि शक्य नाहीं !–" लॉचेस उद्गारला. " इतकें निष्ठुर

होणं माणुसकीला धरून आहे काय ? आपल्या कन्येवरील ही आपत्ति टाळण्याकरितां योग्य वेळीं जर तुम्हीं दक्ष राहिला असतां तर ही आपत्ति तुम्हांला टाळतां आली असती !" लॉचेस म्हणाला:-" तर या आपत्तिबद्दलची सारी जबाबदारी माझ्यावर आहे असं आपलं म्हणणं ?"

**डॉक्टरः**—हं या, तुमच्यावरच.

**लॉचेसः**—ती कशी ?

**डॉक्टरः**—कशी तें ऐका. लग्नापूर्वी भावी जांवयाची सांपत्तिक स्थिति काय आहे, त्याचं कुलशील कसं आहे, त्याचा विद्याभ्यास कोठपर्यंत झाला आहे, तो बुद्धिवान्, तरुण आहे का नाहीं, इत्यादि गोष्टी तुम्हीं पाहिल्यांत; पण एकच अत्यंत मुद्याच्या–नव्हे अगदीं जिव्हाळयाच्या गोष्टीकडे तुम्हीं पूर्ण दुर्लक्ष केलें. ती गोष्ट म्हणजे त्याच्या प्रकृतिसंबंधानें अजीबात चौकशी केली नाहींत.

**लॉचेसः**—हो, नाहीं खरी.

**डॉक्टरः**—कां नाहीं केलीत ?

**लॉचेसः**—कारण तशी चाल नाहीं. तसं करणं लोकरूढीविरुद्ध झालं असतं.

**डॉक्टरः**—पण आपल्या मुलीच्या कल्याणार्थ तिचं लग्न करण्यापूर्वी आपण भावी जांवई प्रकृतीनें निरोगी आणि धट्टाकट्टा आहे हें पाहणं आवश्यक आहे कीं नाहीं ?

**लॉचेसः**—हो–हो, अत्यंत आवश्यक आहे. इतकंच नव्हे, पण तसं करणं एखादा नवा कायदा करून, कायद्यानंच भाग पाडलं पाहिजे !

**डॉक्टरः**—छत् ! नव्या कायद्याची काय आवश्यकता ? अगोदरच भाराभर कायदे आहेत ! कायद्याची मुळींच आवश्यकता नाहीं. आवश्यकता आहे ती ही: यच्चयावत् लोकांनाच या रोगाचें स्वरूप बरोबर कळलें पाहिजे. त्यापासून होणाऱ्या दुष्परिणामाची अचुक कल्पना आली पाहिजे. म्हणजेच लोकरूढि आपोआप बदलून मी म्हणतों अशी चाल न सांगतांना पडेल. आणि मग साहाजिकपणेंच असले दुर्धर प्रसंग टळतील. स्वतःच्या पोटच्या गोळयाच्या कल्याणार्थ ज्या एका महत्त्वाच्या गोष्टीकडे तुम्हीं लक्ष द्यावयाला पाहिजे होतें तिकडे तुम्हीं तें दिलें नाहींत हा कोणाचा अपराध ! आणि याबद्दल तुम्हीं एका अजाण–गैरसावध–तरुणाला शासन करूं पाहतां ! त्याला क्षमा करणार नाहीं म्हणतां, म्हणजे हें नवल नव्हे का ?

**लॉचेस**:—छे: छे: त्याला मी कधींही क्षमा करणार नाहीं ! त्यानें तसाच घोर अपराध केला आहे.

**डॉक्टर**:—एकूण तुम्हीं इतके निष्ठुर आहांत तर, तुम्हांला दयामाया कांहीं एक नाहीं ? इतक्यावरच ज्याअर्थी गोष्ट आली आहे आणि तुम्ही, आपल्या स्वतःच्या जांवयालाहि क्षमा करायला तयार नाहीं त्याअर्थी–ओघानंच प्राप्त झाल्यामुळें आतां तुम्हांला विचारतों : तुम्हीं स्वतः धुतल्या तांदळासारखे अगदीं निर्धूत आहां काय ? तुमच्या हातून केव्हांहि असलें पाप घडलें नाहीं ?

**लॉचेस**:—असला **सडका रोग** मला केव्हांहि जडला नाहीं !

**डॉक्टर**:—तें तुम्हांला मीं मुळींच विचारलें नव्हतें. माझा हें विचारण्यांत हा आशय होता कीं,–त्या पापमार्गाकडे कधीं काळीं तरी तुमचें पाऊल–चुकून का होईना–पडलें होतें का नाहीं ?

**लॉचेस**:— ( घोटाळून कांहींच उत्तर देत नाहीं. )

**डॉक्टर**:—पडलं होतं, आणि त्यांतून दैवयोगानें तुम्हीं बचावून निघालांत असंच ना ? आपल्या सद्‌गुणानं तुम्हीं बचावलांत असं नव्हे ? होय ना ' ( **लॉचेस** लाचार होऊन मूक होतो ). मग ह्या असल्या रोगाला ' सडका रोग ' म्हणून इतक्या तुच्छतेनें लेखण्यांत काय अर्थ ? दुसरे इतर रोग आहेत, हाहि त्यासारखाच एक रोग. या रोगाला ' सडका रोग ' म्हणून नांवें ठेवणारे असे किती सोवळे लोक निघतील सांगा पाहूं ? हजारांत २।४ तरी निघतील काय ? ज्यांचें वांकडें पाऊल पडूनहि ते दैवानें बचावले गेले, त्यांना काय निष्पाप समजावयाचें ? आणि ज्यांना दुर्दैवानें त्याची झळ लागली ते तेवढे पापी आणि अपराधी ? माझ्या मतें तरी हे दोघेहि सारखेच गुन्हेगार–सारखेच अपराधी आहेत. एवढच नव्हे, पण ज्यांना ह्या रोगाची झळ लागली आहे त्यांना आपल्या पापाबद्दल प्रायश्चित्त मिळून ते अंशतः शुद्ध तरी झालेले आहेत; तसं प्रायश्चित्त या रोगाची ज्यांना झळच लागली नाहीं त्यांनीं कोणचं घेतलं आहे ? दोघेहि सारखेच गुन्हेगार नव्हेत काय ? मग एका गुन्हेगारानें दुसऱ्या गुन्हेगाराशीं त्याला क्षमा न करण्याइतकं कठोर कां व्हावं ? त्याला असं कठोर होण्याचा नैतिक अधिकार तरी काय आहे ?

**लॉचेस**:—( विचारमग्न होऊन कांहीं वेळानें एक दीर्घ निश्वास टाकून ) डॉक्टरसाहेब, तुम्हीं आपली बाजू अशी कांहीं मांडली आहेत कीं—

**डॉक्टरः**—मग ती गैर का आहे ?

**लॉचेसः**—गैर कोण म्हणेल ? डॉक्टर, तुम्हीं सांगितलेल्या गोष्टी मी माझ्या मुलीला चांगल्या प्रकारें समजावून सांगेन, आणि पुनः आपल्या नवऱ्याकडे जाऊन राहण्याविषयीं मी तिचें मन वळवीन. पण या सगळ्याच गोष्टी मला तिला सांगवणार नाहींत.

**डॉक्टरः**—सगळ्याच गोष्टी नका सांगूं. पण महत्त्वाच्या आहेत तेवढ्या तरी सांगू शकाल ना ? (होकार मिळाल्यानंतर) तिच्या मनावर मीं सांगितलेल्या महत्त्वाच्या गोष्टी तर बिंबवाल ना ? त्यांतच घटस्फोट केल्यानें नवरा व बायको या दोघांवरहि कशी आपत्ति कोसळेल, दोघांनाहि त्यांचें जीवित कसें कष्टमय होईल, जर्मेनला या रोगांतून बचावण्याची जबाबदारी तिच्या प्रत्यक्ष बापाशिवाय दुसऱ्या कोणाला आणि कशी अधिक वाटेल, इत्यादि गोष्टी नीट समजावून सांगा आणि अशा प्रकारें आपल्या पतीच्या हातून घडलेल्या पापासंबंधानें त्याला क्षमा केल्यानें तो आपलें पूर्ववृत्त टाकून देऊन किती प्रेमळ आणि पत्निनिष्ठ पति होईल व मग त्या जोडप्यास वैवाहिक सुखाचा किती निर्मळ आनंद भोगावयास सांपडेल याचीहि पण बरोबर कल्पना आणून द्या. या योगानें तो आपल्या पत्नीच्या क्षमाशील आचरणानें तिचा सर्वस्वीं दास होऊन राहील. आणि मग त्या दोघांचाहि संसार अत्यंत सुखाचा होईल. याशिवाय तुम्हांलाहि आणखी जें कांहीं सांगावेंसें सुचेल तेंहि सांगा. अशा प्रकारें त्यांचा पुनः संगम होऊन ते जर सुखानें राहिले तर यापुढें होणारी त्यांची संतति मोठी जोरदार आणि सशक्त होईल, याबद्दल मी निर्वाळा देतों.

डॉक्टरांचें वरील भाषण ऐकून डेप्यूटी लॅचेस यांचा सारा संताप शमला, त्यांची सूडाची कल्पना मावळली, आणि त्यांनीं डॉक्टरच्या उपदेशानुसार आपल्या मुलीचें मन वळविण्याचें कबूल केलें. तेव्हां त्यास डॉक्टर म्हणाले:— "एका मुलीच्या लग्नाचे संबंधांत जी घोडचूक केलीत, तशीच दुसऱ्या मुलीच्या लग्नाचे बाबतींत न करण्याची दक्षता ठेवा. प्रत्येक मुलीच्या बापाकडून तिच्या लग्नाचे बाबतींत हीच घोडचूक होत असते. ज्ञानतः होते अथवा अज्ञानतः होते. समाजांत उघड्या डोळ्यानें चाललेले प्रकार चांगल्या प्रकारें माहीत असूनहि ते त्याकडे डोळेझांक करितात; उघड बोलण्याची त्यांना चोरी वाटते. रूढि बदलण्याचें त्यांना सामर्थ्य नसतें. कारण कमी अधिक प्रमाणानें बहुशः सगळेच

या सडक्या मालांतलेच डाग असतात ! सुदैवामुळें डागळण्यापासून बचावलेले असतात, इतकेंच. हा ' फिरंगी रोग ' अथवा ' उपदंश, ' यासारख्या समाजाला अत्यंत हानिकारक अशा अन्यहि गोष्टी आहेत. उदाहरणार्थ—क्षयरोगाचा प्रसार, आणि विषारी मद्यार्कांच्या निपजींचे कारखाने. ह्या तीन राक्षसी सैतानांचा समाजांत कसा नंगानाच चालला आहे, तो तुम्ही पाहात नाहीं काय ? पण त्याकडे समाजांतील जबाबदार नेत्यांची पूर्ण डोळेझांक आहे; तुम्हांला देखील असेंच वाटत नाहीं काय ? फार लांब कशाला. आज तुमच्या नांवाची जेव्हां चिठी आली तेव्हां मला वाटलें कीं—पंधरा वर्षांपूर्वी ' अकॅडमी ऑफ मेडिसन ' पुढें समाजांत अविरतपणें वावरत असणाऱ्या ह्या उपदंशाच्या गुप्त रोगाबद्दल विचारणा करून त्याला आळा घालण्याकरितां कांहीं योजना करावी—म्हणून एकमतानें ठरलें होतें; त्याच बाबतींत तुम्ही मला आज भेटायला आला आहांत, म्हणून या रोगानें पछाडलेले कांहीं रोगी तुम्हांला प्रत्यक्ष दाखवावे म्हणून माझ्या विद्यार्थ्यांस मीं तशी व्यवस्थाहि करण्यास सांगितलें होतें. पण तुम्ही आलांत तें तुमचें स्वतःचेंच गाऱ्हाणें घेऊन ! पण आपल्या समाजामध्यें हा सैतान प्रच्छन्नपणें इतका धुडगुस घालीत आहे कीं त्यामुळें हजारों कुटुंबें नाश पावत आहेत; आणि तींहि केवळ या रोगाच्या अज्ञानामुळें ! या रोगापासून होणाऱ्या दुष्परिणामांची त्यांना पूर्ण कल्पना नसल्यामुळें ! तर ज्याअर्थी आपण आज येथें आलांच आहांत, त्याअर्थी अज्ञानामुळें या रोगाला किती पुरुष आणि स्त्रिया—कसकशा बळी पडत आहेत, त्याचीं कांहीं प्रत्यक्ष उदाहरणें दाखवितों तें पहा. " असें म्हणून डॉक्टरांनीं दरवाजापर्यंत जाऊन प्रथम एका तरुण स्त्रीला हांक मारिली. डॉक्टरांनीं विचारल्यावर तिनें आपल्या मृतपतीपासून हा रोग जडल्याची करुण काहणी सांगितली. " मध्यें तीन महिने औषधाला कां आली नाहींस, म्हणून विचारतां तिनें—आपण कामाला जातों तेथून दवाखान्याच्या वेळेला येण्यास आपली सुटका होत नाहीं, आलें तर तासन्तास तिष्ठत राहून नोकरीहि गमावण्याची पाळी येईल, इत्यादि अनेक गोष्टी सांगितल्या. त्या ऐकून लॅाचेसला गहिंवर आला. नंतर एक गृहस्थ आला. त्यानें कॉलेजमध्यें असणाऱ्या एका १८ वर्षांच्या आपल्या मुलाची हकीगत सांगितली. तो म्हणाला—" माझा मुलगा पंधरावे वर्षी कॉलेजांत गेला. तेथें असणाऱ्या एका वदचालीच्या स्त्रीनें त्याला घेरलें आणि आज तो अर्धमुर्धे

अंग गेल्यासारखें होऊन पडला आहे! त्याच्या यातना पाहिल्या म्हणजे तो यांतून लवकर मरेल तर बरं असं वाटतं! कॉलेजचे दारांत हे प्रकार चालतात; याला सरकार अथवा इतर अधिकारी कसे आळा घालीत नाहींत?" "मग त्याला हा रोग जडतांच तुम्हीं का इकडे घेऊन आला नाहींत," म्हणून डॉक्टरांनीं त्याला विचारितां तो म्हणालाः– "साहेब, प्रथम प्रथम आपणास काय झालें हें त्याला कळलेंच नाहीं. सहन होईना तेव्हां लाजेमुळें मला न कळवितां कोणा नाकाडोळ्याच्या वैद्याला भेटला; त्यानें पैसे उपटून बरा केला नाहीं तो नाहींच! असल्या वैद्यांचा धंदा सरकार कसा चालूं देतें? माझ्या मुलाची तर मीं आतां आशा सोडलेलीच आहे; पण इतर तरुण विद्यार्थ्यांवर अशा प्रकारची आपत्ति कोसळूं नये म्हणून आपल्या कानावर ही गोष्ट घालण्याकरितां मी मुद्दाम आलों आहें." त्यावर डॉक्टर त्यास म्हणालेः–"तुम्हीं आपल्या मुलासंबंधानें असें निराश होण्याचें कारण नाहीं. जा त्याला घेऊन या जा इथं. तो खास बरा होईल." हे आशावादाचे शब्द ऐकतांच तो मनुष्य मुलास घेऊन येण्याकरितां निघून गेला.

तो गेल्यावर डॉक्टर लॅचिसला म्हणालेः—"पहा, त्या मुलाला या गोष्टीचें अज्ञान असल्यामुळें त्याचा कसा कोंडमारा झाला– कशी कुचंबणूक झाली! हें अज्ञान काढून टाकायला नको का?"

लॅचेस म्हणालाः—"पण असल्या गोष्टींचें अल्पवयी मुलांना ज्ञान करून देणें घातुक नाहीं का?" याला उत्तरादाखल डॉक्टर म्हणालेः—"समाज मुलांमुलींना नाचण्यागाण्याच्या बैठकींना, नाटकांना व रस्तोरस्तीं आढळणारे अश्लील प्रकार पाहूं देण्याला, त्यांना मना करीत नाहीं. या द्वारांनीं त्यांना तें ज्ञान होतेंच होतें. मग ह्या विषयाच्या दुष्परिणामाचें ज्ञान आपणच त्यांना दिल्यास त्यापासून हानि होईल कीं तारण होईल! याचा विचार समाजानें करायला नको का?"

लॅचेस म्हणालाः–"हा व्यभिचाराचा प्रसार समूळ नष्ट करून टाकायचा तर त्याच्या मूळावरच घाव घातला पाहिजे. त्याशिवाय समाजांत होत असणारा ह्या भयंकर विषाचा फैलाव थांबणार नाहीं. याचें मूळ कारण या बदफैली स्त्रियाच आहेत!" डॉक्टर उद्गारलेः—याचें मूळ कारण पुरुषच आहेत. केवळ स्त्रियाच आहेत असें नाहीं." असें म्हणून डाक्टरांनीं एका २० वर्षें वयाच्या तरुणीस आंत येण्याला खुणावलें. ती सुंदर असून मोठी आनंदी आणि रंगेल दिसत

होती. तिला डॉक्टरनीं सांगितलें, हे गृहस्थ नाटकगृहाच्या मालकाचे स्नेही आहेत. तेथें नोकरी मिळवून देण्याकरितां हे त्या मालकाला चिठी देतील, म्हणजे ते तुला ठेवून घेतील. यांना तूं आपलें सारें पूर्ववृत्त सांग. असें म्हणतांच तिनें आपलें सारें पूर्ववृत्त त्याचेपुढें कांहीं एक चोरून न ठेवतां उभें केलें. तें ऐकून लॉचेसचा सर्व संदेह मावळला व त्याच्या डोक्यांत पूर्ण प्रकाश पडला. या तिच्या पूर्ववृत्तकथनांत समाजांत हरघडी वावरणाऱ्या अनेक पापाचरणांचा सहजासहजीं उलगडा झाला. त्या मुलीची ती करुण कहाणी संपल्यावर डॉक्टर लॉचेसला म्हणाले—" पाहिलेंत, या सैतानी रोगाचा उद्भव कसा होतो व मग त्याचा हलकें हलकें प्रसार होत जाऊन, सारा समाजचा समाज या सैतानाच्या जबड्यांत कसा जाऊन पडतो तें. तेव्हां यापुढें तरी समाजाला अत्यंत घातुक अशा या प्रश्नाचा घरीं जाऊन शांतपणें विचार करा आणि यापुढें डोळेझांक न करितां या बाबतींत काय केलें पाहिजे, तें निश्चित ठरवा. तुमच्यासारख्या जबाबदार व अधिकारी पुरुषांनीं या गोष्टीचा विचार करावा, याकरितांच मीं आपला इतका वेळ घेतला आणि माझाहि पण वेंचला."

येथें ३ रा अंक संपतो व त्याबरोबर नाटकहि संपतें.

वर दिल्याप्रमाणें या नाटकाचें कथानक आहे. हें वाचलें म्हणजे 'ब्र्यू' याच्या नाटकाचें महत्त्व केवढें आहे तें वाचकांच्या ध्यानीं येऊन, प्रस्तुत लेखकानें तरी हाच विषय आपल्या लेखनाकरितां कां स्वीकारिला याचें मर्महि चाणाक्ष वाचकांच्या लक्षांत आल्याशिवाय राहणार नाहीं. तेव्हां यापुढें त्यासंबंधानें अधिक विस्तार न करणेंच बरें. एवढें सांगून आम्ही आमच्या वाचकांची रजा घेतों.*



* फ्रेंच नाटककार मॉनाशिअर 'युजेन ब्र्यू' यांचें सामाजिक नाटक. 'Damaged Goods' अर्थात् सडका माल.

# गाडलेली तलवार

लेखक—**किरात**

## अंक १ ला.

### प्रवेश १ ला.

**स्थळ—दीनार**राजाचे वाड्यानजीकच्या शेतवाडींतलि खणलेली माळ जमीन.

**प्रवेश**—[ जिकडे तिकडे कुदळी, फावडीं, टोपल्या पडलेल्या आहेत. व सगळे कामकरी–गुलाम–एकत्र जमले आहेत. त्यांत राजा वीरभूषणसिंह अंगावर फाटके तुटके कपडे घातलेला, अंगावर मळी चढलेला, खालीं मान घातलेला, असा जमिनीवर बसला आहे. त्याच्या केसाच्या जटा झाल्या आहेत, हजामत वाढली असून दाढीचे केस धुळीनें भरले आहेत; कांहीं गुलाम कोंडाळें घालून लाकडासारख्या जून भेंड्या आणि सडके कांदे खात बसले आहेत, व त्यांच्यापुढें कणसांचीं बुरखुंडें पडलेलीं आहेत. ]

**वीरभूषणसिंह**—( हातांत कणसाचें एक बुरखुंड घेऊन ) हें बुरखुंड—नव्हें हाडूक–फार कवळं आहे! हें चघळलं कीं रसच रस!

**गुलाब**—वीरभूषणराज! आपल्या ठिकाणीं मी असतों, तर–

**वीरभूषण**—तर काय ?–ती कशाला इच्छा ? आतां मजजवळ शिल्लक काय उरलं आहे ? स्वतःचीं हाडं मात्र चघळायचीं राहिलीं आहेत !

**गुलाब**—ती इच्छा एवढ्याचकरितां कीं आपण एकवेळ राजे होतां. आपल्या पायावर शेंकडों लोकांनीं लोटांगणं घातलीं आहेत. आपण एकवेळ घोड्यावर, रथांत, अंबारींत बसत होता; डोक्यावर राजमुकुट धारण करीत होता, आणि सर्व लोक आपल्याला महाराज, सरकार, म्हणून म्हणत होते.

**वीरभूषण**—होय, म्हणत होते. ती स्मृति झाली म्हणजे मी फार बेताल आणि अनावर होतों !

**गुलाब**—आपण भाग्याचें–म्हणूनच आपल्याला ही स्मृति तरी होते. पण अशी स्मृति व्हायला माझ्याजवळ काय आहे ? माझी सगळी स्मृति आणि आठवण म्हटली म्हणजे ही कीं,–अमुक एक दिवसांत आपल्या पाठीवर कोरडे उडाले नाहींत ! आणि ते चुकवावयाला आपल्याला काय काय क्लृप्त्या लढवायला लागल्या आणि कसकसं राबावं लागलं ! याशिवाय आमच्यासारख्यांना दुसऱ्या आठवणी तरी कोणच्या असणार ? कारण जन्मतःच मी गुलाम; अथवा त्याच्या-हि अगोदरपासून कां म्हणाना—

**वीरभूषण**—खरोखरच आपण राजा होतों, अशी स्मृति असणं फारच भयंकर !

**गुलाब**—पण आमच्यासारख्यांना मागच्या जर कांहीं चांगल्या आठवणीच नाहींत, तर आम्हांला त्याचं काय ? कांहींच नाहीं. यापुढें चांगले दिवस येतील, या आशेला तिथं मग जागा तरी कुठली ?

**वीरभूषण**—कायरे, पण तुम्हांला कांहीं देव बीव तरी आहे कीं नाहीं ?

**गुलाब**—देव ! आम्हांला कुठला आला आहे देव ? देतो कोण लेकाचा आम्हांला देव ? आणि तो दिला,–आणि त्यानं आमच्या हातांत तरवारी, खांडा, भाले टाकले,–तर ? मग कसं व्हायचं ? मग आमच्यावरचे हे शिपाई जिवंत कसे राहावयाचे ? त्यांचे मुडदेच पडायचे कीं एखादवेळ ! खंडोबा तर भाला फेकण्यांत आणि खांडा चालविण्यांत मोठा पटाईत देव ! तो आम्हांला लाभला तर कांहीं आशा असती.

**वीरभूषण**—तर मग आतां तुला कांहीं आशा नाहीं एकून ?

**गुलाब**—आहे; थोडी अंधुकशी आहे. पण जाऊं दे. हें पहा मी तुम्हांला एक गुपित सांगतों. महाराजांचा काळूराम कुत्रा—नव्हे कुत्ते—ते सध्यां बेमार आहेत जरा. आणि या बेमारींत ते बहुतेक रामच म्हणतील ! त्यांनीं राम म्हटलं, कीं मग त्यांना आमच्या स्वाधीन करण्यांत येईल; मग काय ह्या बुरखुंडाऐवजीं हाडंच हाडं !

**भूषण**—काय हाडं ?

**गुलाब**—हो. आमच्या वांट्याला हाडंच, त्यांशिवाय दुसरं काय यायचं आहे तर ?

**भूषण**—हो, हाडकंच ! हाडकंच यापुढं आमच्या वांट्याला !

**गुलाब**—काय, तर मग तुम्हांला देखील दुसरी कांहीं आशा नाहीं ? एखाद दिवशीं तुमची प्रजा-तुमचं राष्ट्र-खडबडून उठून तुमची मुक्तता करील, ह्या राजाला पालथा घालून त्याचं मुंडकं त्याच्याच वाड्याच्या हत्ती-दरवाजावर टांगून देईल, अशी आशा नाहीं वाटत तुम्हांला बिलकुल ?

**भूषण**—छेः छेः ती गोष्ट कशाला ? ती आशा करायची कशी ? मी निद्रित असतां एकाएकीं येऊन ह्या राजा दनिारनं जेव्हां मला कैद केलं तेव्हांच त्यानं आमच्या कुलदैवताच्या मूर्तीचीं तीन खांडं पाडलीं ! तेव्हांच तो ग्रंथ आटपला ! तेव्हांपासून आमच्या वांट्याला ( बुरखुंडें दाखवून ) हीं हाडकंच ! हो ! पण त्या काळूरामाला ते खरंच कां आमच्या स्वाधीन करतील ? मग काय ? हाडकंच हाडकं ! पण खुद्द राजेसाहेबांचा एवढा सन्माननीय आणि प्यार कुत्रा तो, ते आम्हांला देतील म्हणतोस ?

**गुलाब**—हो. सन्माननीय—सन्माननीयच ! पण त्यानं राम म्हटला कीं मग त्याचा सारा सन्मान मातीमोल ! खुद्द राजेसाहेब चचले तरी तेदेखील कृमि-कीटकांच्याच भक्ष्यस्थानीं पडायचे ! असं जर आहे तर मग त्यांचे कुत्ते चचले म्हणजे ते कां बरं नाहीं आमच्या वांट्याला येणार ?

**वीरभूषण**—पण आपण कांहीं कृमिकीटक नाहीं.

**गुलाब**—पण मी काय म्हणतों तें ध्यानांत नाहीं आलं आपल्या, महाराज! ते कृमिकीटक जरी क्षुद्र प्राणी आहेत, तरी ते स्वतंत्र आहेत. आणि आम्ही बडे बुद्धिसंपन्न मनुष्यप्राणी असलों तरी दास्यत्वांत जखडून गेलों आहोंत ! मीं असं

केव्हां म्हटलं कीं आम्ही क्षुद्र कृमिकीटक आहोंत म्हणून ? पण आमचा दर्जा त्यांच्यासारखाच ! हे राजेसाहेब मेल्यावर जर त्यांच्या स्वाधीन व्हायचें, तर मग—

**वीरभूषण**—हो. त्या काळूरामाच्याबद्दल काय सांगत होतास ? त्याचीं हाडकं चांगलीं पुष्ट आणि रसभरित आहेत म्हणतोस ? पण कायरे, त्याचं नांव हें काळूराम कसं काय पडलं ?

**गुलाब**—हः हः हः हः तो काळा आहे म्हणून काळूराम ! वाः त्याचीं हाडं किती लठ्ठ आणि रसभरित असतील म्हणून सांगूं !

**वीरभूषण**—तर मग तूं पाहिला आहेस त्याला ?

**गुलाब**—हो नुसता पाहिलाच काय ? पण त्याची आणि माझी पक्की ओळख ! कारण त्याच्याच पायांत माझी पाठ एकदां रक्तबंबाळ होऊन तिचं धिरडं झालं आहे ! तनिवादी चाबकाच्या कोरड्यांनीं दोघां इसमांच्याकडून माझ्या पाठीवर पन्नास कोरडे बसले आहेत !

**वीरभूषण**—त्या कुत्र्याच्या पायांत ? राजेसाहेबांच्या कुत्र्याच्या ?

**गुलाब**—हो, हो; त्यांच्याच. हें असं व्हायला माझ्याकडून दोन मोठ्ठे गुन्हे घडले ! एकदां ह्या कुत्तेसाहेबांची स्वारी एकटीच ह्या गुलामांच्या माळावर बागडत बागडत येत होती. तेव्हां मीं त्याला लवून मुजरा करायला चुकलों; तो आमच्या रोजच्या सलगीनं आमचा बडा दोस्त झाला होता,—म्हणून मीं त्याला, 'काळ्या' म्हणून हांक मारली आणि तो जवळ येतांच त्याला आंजारून गोंजारून त्याची पाठपाठ जरा थोपटली. हा माझा गुन्हा !

**वीरभूषण**—असं करतांना तुला कोणीं पाहिलं कीं काय ?

**गुलाब**—हो, त्या कुत्तेवाल्या शुनिपालानं आणि त्याच्या एका साथीदारानं. मीं त्याची पाठ थोपटली मात्र, तोंच ते दोघे कुत्र्यासारखे चवताळून माझ्या अंगावर धांवून आले आणि त्यांनीं एकदम मला चतुर्भुज केलें ! त्या काळ्याच्या त्या वेळच्या मुद्रेवरून असं दिसलं कीं मीं त्याला काळ्या पुन्हां म्हणून हांक मारावी अन् गोंजारावं, पण त्यांनीं मला पकडून एकसारख्या लाथा देत देतच तिथून नेलें !

**वीरभूषण**—तर मग तूं त्याला मुजरा केला नाहींस आणि त्याच्याशीं इतकी लगट केलीस ही तुझीच चूक.

**गुलाब**—पण तो कुत्रा माझ्या इतका कांहीं संवयीचा झाला होता कीं तो आपल्या राजेसाहेबांचा कुत्रा आहे, हें भान त्याला अन् मला दोघांनाहि राहिलं नाहीं. काळ्या मोठा उमदा कुत्रा.

**वीरभूषण**—पण आतां अगोदर हें सांग कीं त्याला कांहीं खटबीट पडलं आहे कां कांहीं दुसऱ्याच आजारानं तो इतका बेमार झाला आहे ?

**गुलाब**—खटबीट कांहीं नाहीं पडलं त्याला. त्याला दुसराच कांहीं आजार झाला आहे म्हणतात.

**वीरभूषण**—तर मग तो झटपट न मरतां जर असाच खितपत पडला, तर त्याचं सारं मांस झडून जाऊन त्याची अगदीं लकडी वळून जाईल! खटबीट असतं तर निराळी गोष्ट होती! पण जाऊं दे ते. गुलामगिरीचा छाप बसल्यावर मग ही चरफड आणि कुरकूर काय कामाची ? पण हें पहा, लहानपणापासून मूग गिळून बसायची मला संवय नसल्यामुळं तुझ्यापेक्षां मी जास्त चरफडतों !

**गुलाब**—पूर्वीच्या आठवणीनं जर मनुष्याचं समाधान होत नसेल, तरच त्याला अधिक आशा करायला जागा; एरवीं नाहीं. तुम्हांला तशा आठवणी होतात, म्हणून तुम्ही अधिक आशा करतां. मला जर अशा आठवणी असत्या, तर मी मग खास कसलीच अधिक आशा धरतोंना. कारण अशा आशेवर दिवस कंठणं फार वाईट !

**वीरभूषण**—हें पहा गुलाब ! त्या कुत्र्याला आपण एकदां गट्ट करून टाकला म्हणजे मग आठवण आणि आशा दोन्हीहि बंद. अजीबात बंद !

**गुलाब**—असं कां म्हणतां ? समजा हा माळ—हें माळरान हें एकवेळ रणांगण होतं—हें खणतां खणतां तुम्हांला कांहीं सोन्यामोत्यांचे दागिने सांपडले. मग काय ? मग एका निमिषांत आपल्यावरील पहारेकऱ्यांच्या मुख्य नायकाला तुम्ही लाळ घोटायला लावाल ! तो तुम्हांला सोन्यामोत्याच्या लालचीनं एखादी तरवार नाहींतर खांड देखील देईल ! आणि तुमच्या हातांत तरवार आली कीं आम्ही सगळे गुलाम तुमच्या मागें धांवत येऊं आणि मग या जुलमी दीनाराला रश्शीनं खेचून चतुर्भुज करून, त्याची गठडी करून त्याला इथंच या माळरानच्या मातींत माती खात खितपत पडायला लाऊं ! आणि तो असा पडला म्हणजे मग त्याच्या जिभलीला कांटे टोंचून ती त्याच्या तोंडाबाहेर लोंबती ठेवूं; आणि

तिच्यावर त्या झाडावरील मधमाशांच्या पोळ्यांतून ठिबकणारा मध देऊं सोडून म्हणजे सगळंच गोड ! मग धांवऱ्या मुंग्यांचं वारूळच वारूळ तिथं गोळा होईल ! महाराज, माझ्या बापाला ह्याच माळावर इथं खणत असतां एकदां कांहीं सोन्याचे डाग सांपडले होते.

**वीरभूषण**—तर मग तुझ्या बापानं दास्यांतून आपली सुटका करून घेतलीन् कां ?

**गुलाब**—छत्.

**वीरभूषण**—तर ?

**गुलाब**—तर काय ? ते सोन्याचे डाग माझ्या बापाच्या हातीं पाहिल्या-बरोबर गुलामांवर देखरेख करणाऱ्या वरिष्ठ अधिकाऱ्यानं माझ्या बाबांचा एकदम खूनच केलान्. त्यांना आपल्यावरील पहारेकऱ्यांना फितूर करण्याची संधि मिळती, तर खास त्यांनीं आपली सुटका करून घेतली असती.

[ इतक्यांत बुद्धतारक नांवाचा भविष्यवादी दोन पहारेकऱ्यांसह येतो.]

**इतर गुलाम**—हे बुद्धतारक राजेसाहेबांच्याकडे चालले आहेत राजेसाहेबां-च्याकडे !

**गुलाब**—होय, ते महाराजांच्याकडेच जाताहेत.

**वीरभूषण**—राजाला सुखाचे दिवस येतील, म्हणून भविष्य कथन करायला तो जात असेल. राजाला अशीं शुभ भविष्यें सांगणं फार सोपं काम ! कारण असलीं भविष्यें खोटीं होण्याचा संभवच नसतो. आणि तीं खरीं ठरलीं म्हणंजे मग बिदागीहि भरपूर ! राजाला शुभ भविष्याशिवाय दुसरं कोण काय कथन करणार ? नांव काय ह्या भविष्यवाद्याचं ?

**गुलाब**—बुद्धतारक.

**वीरभूषण**—बुद्धतारक ! बुद्धतारक ! म्हणजे तारकांचं ज्ञान असणारा. वाः रे बुद्धतारक !

( इतक्यांत घंटा बडवते. व सर्व गुलाम उठून आपापलीं खोरीं, कुदळीं व फावडीं वगैरे घेऊन सज्ज होतात. **राजा वीरभूषण** खणूं लागतो. )

**वीरभूषण**—गुलाब ! आपण खणत असतानां नेहमीं जें गाणं म्हणतों त्याला काय म्हणतात रे ? कसलं गाणं म्हणून म्हणतात त्याला ? फार गोड गाणं आहे बुवा तें.

**गुलाब**—त्याला नांव-बीव कांहीं नाहीं ! तें आमचं गाणं. दुसरं गाणंच नाहीं आमचं !

**वीरभूषण**—पण त्याला म्हणतात काय ?

**गुलाब**—म्हणतात काय ! 'गुलामगीत' म्हणा पाहिजे तर !

**वीरभूषण**—पूर्वीं अशींच गीतं मी ऐकत होतों पण त्यांना नांवें असत. तर काय, ह्या गाण्याला नांवच नाहीं कांहीं म्हणतोस ?

**गुलाब**—छत्, झुंजार लढवय्ये शिपाई मोहिमेवर जाऊं लागले म्हणजे गाणीं गातात. त्या गीतांना कांहीं नांवें असतात ?

**वीरभूषण**—हो, हो ! त्यांना रणगीतं आणि वीरगीतं असं म्हणतात.

**गुलाब**—झुंजार मर्द शिपाई एक पोवाडाहि म्हणत असतात. पण तो गांवढळ आणि खेडवळ लोकांचा आहे. तरी पण तो मोठा बरिश्रीचा आहे !

**वीरभूषण**—हो, तोच-तोच मी म्हणतों. पण त्याला ते कसला पोवाडा म्हणतात ?

**गुलाब**—' **मानकापी** 'चा पोवाडा !

**वीरभूषण**—हो. मानकापीचा-मानकापीचाच ! त्याच्यासारखा दुसरा सुंदर पोवाडाच नाहीं ! मी तर त्याशिवाय दुसरं गाणं यापुढं म्हणणारच नाहीं.

**गुलाब**—तर आपल्याला तो पोवाडा येतो ?

**वीरभूषण**—हो, येतो म्हणजे ? आमच्या लाख्यापूरच्या विजयप्रसंगीं **लाख्या**शाहिरानं तो पहिल्यानं माझ्यासमोर डफावर म्हटलान्. आणि त्याबद्दल मीं त्याला जवाहिराचा तोडा बिदागीदाखल देऊन, पोषाख वगैरे दिला आहे.

**गुलाब**—काय, त्याचा आरंभ काय आहे ?

**वीरभूषण**—त्याचा आरंभ ? तो मी कसा विसरेन ? ऐक, गुलाब ! ऐक. ( दोघेहीं खणूं लागतात. खणत असतां **वीरभूषण** गातो. )

' अव मर्द ! अव मर्द ! चला उठा ! चला उठा !

करा गारद झाडुन समदा दुस्मान्,

समशेरीनं तोडून मान, घाला इस्नान ॥ अवमर्द० चला उठा !

[ एकीकडे गाणें म्हणत असतां व दुसरीकडे कुदळीनें खणीत असतां कुदळींच्या टोंकास कांहीं धातूसारखें लागलेसें पाहून ] खचित, ही कांहीं तरी धातूच असली

पाहिजे ! [ कुदळीनें ओढून घेऊन वर खालीं करून ] कदाचित् हे सोन्याचे अलंकारहि असतील ! पण इथं यांचा काय उपयोग ? ( हळू हळू माती दूर करून, निरखून पाहूं लागतो. तों त्यास ती एक दिव्य तरवार असल्याचें आढळून येतें. माती दूर करून तिला तो हलके हलके बाहेर काढतो. प्रथम आडवीच दोन्ही हातांत घेतो. नंतर तिची मूठ धरून सरळ धरून पाहतो. नंतर तिला दुसऱ्या हाताच्या आधारानें पुन्हां आडवी करितो व हलकेच तिच्यावरील म्यान काढून तिजकडे पहात ) अहाहा ! हे दिव्य आणि पवित्र शस्त्र ! या दिनारानें माझं राज्य हरण करून, उद्यां बरोबर तीन वर्षे होतील. पहिल्या वर्षाच्या मुदतींत पाठीवर कोरडे मारून घेण्याचे तीनदां प्रसंग आले. एकदां बारा, एकदां सतरा आणि एकदां वीस कोरडे ! आज एक वर्ष आणि अकरा महिने अन् कांहीं दिवस झाले; कोजागिरी पौर्णिमा होती, दीनारच्या मुख्य देखरेख करणाऱ्या अंमलदारानं माझ्या श्रीमुखांत भडकाविली होतीन्; आणि मला 'कुता; कुता' असं तो अकरा वेळ म्हणाला ! सुमारें दीड महिना—दीड महिना का—दीड महिना आणखी एक दिवस वर—इतके दिवस रस्त्यावरील ? खडी दडपायच्या गाड्याला एका बैलाच्या जोडीनं मला जुंपून सगळे रस्ते मला तुडवायला लावले ! विश्रांति काय ती तुकडे मोडायच्या—नाहीं, हाडकं चघळायच्या वेळीं ! ह्या वर्षी कोरडे खाण्याची पाळी दोनदां आली. एकदां अठरा आणि एकदां दहा ! दोन वर्षं गुलामांच्या छपऱ्या तरी होत्या. त्या यंदा तर पडून गेल्या. त्या पुन्हां कोण बांधतो अन् कोण जातो ? पांच आठवडे झाले, गुलामांच्या शेतार्डीतून दीनाराची एक राणी जात असतां माझ्याकडे पाहून फिदफिदी करून खदखद हंसली ! ह्या वर्षी तेरा कोरडे खाऊन एकदांच पाठ लाल करून घ्यावी लागली ! पण ' गद्धा ! कुता ! ' असं सतरा वेळां म्हणून घ्यावं लागलं ! आणि हें सारं कुणाला ? तर एक वेळ जो राजा होता त्याला ! आणि तोही उच्च इष्वाकु वंशातला ! हो ! पण तो राजा हरिश्चंद्र कोणच्या वंशातला बरं ? ह्या गुलामगिरीनें माझी स्मृति नष्ट होत चालल्यासारखी वाटते !

[ चाहूल ऐकून चारीकडे पाहतो; व तें शस्त्र म्यान बंद करून जमिनीवर ठेवून, त्यास वंदन करून त्यावर पुन्हां माती लोटतो; व पुन्हां खणणें सुरूं करतो. बुड्ढे गुलाम त्याजकडे पहात नाहींत;ते जमिनीकडे पाहून खणीत राहतात. इतक्यांत

हातांत कोरडा घेऊन वरिष्ठ कामगार येतो; त्यास सर्व गुलाम गुढगे टेंकून लवून मुजरे करितात. व तो निघून जातो. ]

**वीरभूषण**—( आदरपूर्वक ) हें शस्त्र धारण करणाऱ्या हे वीरश्रेष्ठा ! हे वीर विभूते ! आज तुझा आत्मा कोठेंहि भटकत असो, तुझें आराध्य-दैवत कोणतेंहि असो, तें तुजवर अनुग्रह करीत असो, अथवा तुझा निग्रह करीत असो, ज्या तूं हें दिव्य शस्त्र येथें ठेवलेंस, त्या तुला-त्या तुझ्या राजतेजाला-मी अत्यंत प्रेमपुरःसर प्रणाम करितों ! कारण माझें आराध्यदैवत—माझी राष्ट्रदेवता-दुभंग होऊन, नव्हे त्रिभंग होऊन-तिचे जेव्हां तीन तुकडे झाले तेव्हांपासून आज तीन वर्षे मी या गुलामगिरींत सतत खितपत पडलों आहें ! मला आतां माझें असें कोणतेंहि दैवत उरलेलें नाहीं ! वीरांना उचित अशीं शस्त्रं धरण्याचें मी बहुतेक ह्या तीन वर्षांत पार विसरून गेलों आहें. तर हे वीर-विभूते ! माझ्यावर तूं आपला अनुग्रह कर आणि या शस्त्राला मला यशस्वी करण्याविषयीं आज्ञा कर. तुझें कृपाछत्र मजवर असूं दे आणि या स्वातंत्र्यप्राप्तीच्या कार्यांत मला यश येऊं दे. म्हणजे मग हे वीर-विभूते ! मी प्रतिवर्षी तुझ्या नांवानें शंभर पुष्ट बैल बळी देईन आणि खुद्द माझ्या राजधानींत तुझ्या नांवानें एक छत्री बांधून त्यांत तुझी मूर्ति स्थापन करीन. म्हणजे तिथें येणाऱ्या प्रत्येकाला सदोदित तुझी स्मृति राहील. इतर मृत आत्म्यांना तुझा हा सन्मान पाहून या गोष्टीचा हेवाच वाटला पाहिजे ! मृतांना आपल्या मागें राहणाऱ्या लोकांनीं आपली सदैव स्मृति ठेवीत असावें, अशी फार इच्छा असते ! मग तूं जरी अत्यंत निंद्य रीतीनें घोर नरहत्त्या करणारा कोणी दरोडेखोर होता,—असशील तरी त्याचीहि मी पर्वा करणार नाहीं. तुझ्या देवळांत नाना-प्रकारचे सुगंधी धूप जळत राहतील आणि तिथें लहान लहान कुवारी मुलींचे मेळे फेर धरून तुझ्या यशाचीं गीतें गाऊन, तुझ्यावर फुलें उधळून, सर्वत्र एकच घमघमाट करून सोडतील. तशाच या तुझ्या देवळांत तुझ्या मूर्तीपुढें सुंदर आवा-जांच्या घंटा बांधल्या जातील व जाणारेयेणारे लोक त्या वाजवून तुझ्या नांवाचा एकच जयजयकार करतील. आणि हा गोड नाद ऐकून तुझा आत्मा जेथें असेल तेथें तो आनंदानें डोलतच राहील ! (पुन्हां शस्त्र काढून त्याजकडे निरखून पाहून) हें शस्त्र इतकें जुनेंपुराणें आहे तरी देखील याचें हें पातें किती तरी पाणीदार आहे ! याची धारहि फारच तीव्र दिसते. मला वाटतें हें शस्त्र चालविलं तर याचं हें पातं मासांत घुसून हाडांनांहि दुखंड करून बाहेर पडेल ! पण हे वीर-विभूते !

ज्याच्यावर मी हें उचलीन त्याच्यावर हें चाललें पाहिजे. माझा नेम चुकून केवळ पोकळ हवेवर याचा वृथा वार न होईल एवढ्याबद्दल मात्र मला तुझें साहाय्य असूं दे. ( शस्त्र वर उचलून ) हे दिव्य शस्त्रा ! चल, तूं आतां माझ्या हातांत ये. हे वायुरूपी महाभागा ! हे गूढ वीर–विभूते ! तूं वायुरूपानें आतां माझ्या अंतःकरणांत प्रवेश कर. आणि तुला जर देववाणींत बोलण्याचं सामर्थ्य असेल, अथवा देवांची भाषा येत असेल, तर तिथून राजा दीनाराच्या कुलदैवतावर आपल्या शापांचा यथेच्छ भडिमार कर !

( इतक्यांत दीनार राजाचा देखरेख करणारा वरिष्ठ कामदार पुन्हां येतो, असें पाहतांच वीरभूषण शस्त्रम्यान बंद करून त्यावर माती लोटतो. )

**कामदार**—काय–इतका वेळ तूं देवाची प्रार्थना करण्यांत मग्न होतास ?

**वीरभूषण**—नाहीं धनी.

**कामदार**—( वेडावून ) 'नाहीं धनी !' तुझ्या बापानं–त्या गुलाम पहारेकऱ्यानं–प्रार्थना करितांना तुला प्रत्यक्ष पाहिलं आहेन् आणि नाहीं म्हणतोस ? ( त्याला ठोसा लगावतो. ) गुलामड्यांनीं देवाची प्रार्थना करणें बेकायदेशीर आहे ! बोल ! करीत होतास कीं नाहीं प्रार्थना ? खरं बोल.

**वीरभूषण**—होय, प्रार्थना केली; पण ती दीनार महाराजांच्या कुलदेवतेची केली.

**कामदार**—अस्सं ! काय प्रार्थना केलीस ?

**वीरभूषण**—मी इमानी गुलाम व्हावं, मला चांगलं खणण्याचं आणि दगडगोडे ओढण्याचं सामर्थ्य द्यावं, थोडक्या अन्नावरहि मला काम करण्याची कुवत द्यावी; आणि धन्याला सुखी राखावं, ही माझी प्रार्थना होती.

**कामदार**—दीनारमहाराजांच्या कुलदेवतेची प्रार्थना करण्याचा तुला काय अधिकार ? कोण तूं असा ? देव अमर आहेत. त्यांची प्रार्थना तुझ्यासारख्या कुत्र्यांनीं करायची ? याद राख, पुन्हां अशी गोष्ट माझ्या कानावर येतां कामा नये. चल, मुकाट्यानं खणूं लाग. [ जातो. ] ( वीरभूषण खणूं लागतो, इतक्यांत गुलाब हलकेंच भूषण राजाजवळ येतो. ]

**वीरभूषण**—( खणीत असतां वळून ) कोण ? गुलाब ?

**गुलाब**—( खणण्याचें मीष करून ) हं ! कुदळ थांबवूं नकोस. आणि

माझ्याशीं बोलतांना माझ्याकडे आपली नजर टाकूं नकोस. कारण त्या पहारेकऱ्यांची आपल्या दोघांवर पुरी नजर आहे. हं, खणूं लाग. इकडेतिकडे पाहूं नकोस.

**वीरभूषण**—आपण एकमेकांकडे नुसतं पाहिलं एवढ्यावरून आपण बोलत आहोंत हें कसं त्यांना समजतें ?

**गुलाब**—तुम्हांला अगदींच तर्क नाहीं. त्यांना कळतं ह्यांत संशय नाहीं.

**वीरभूषण**—बरं. पण गुलाब, हें पहा—

**गुलाब**—काय, काय म्हणतां ?

**वीरभूषण**—सध्यां आमच्यावर देखरेख करायला किती पाहरेकरी आहेत ?

**गुलाब**—सहाजण आहेत. आणि त्यांची आपल्यावर करडी नजर आहे.

**वीरभूषण**—बरं पण ह्या सहाशिवाय दुसरे आणखी कोणी पहारेकरी त्यांच्या मदतीला धांवून येतील, असे कोणी त्यांच्या जवळपास आहेत का ?

**गुलाब**—कोणी नाहींत.

**वीरभूषण**—नाहींत असं कशावरून म्हणतोस तूं ?

**गुलाब**—ते असते तर खालीं—जमिनीवर—बसून ते आमच्यापासून फार लांब नाहीं असे जवळच कुठें तरी जुवे खेळत बसते ! देखरेख करणाऱ्या अधिकाऱ्यानं पाठ फिरवायचा अवकाश, कीं मग त्यांचा हरहमेश हाच क्रम सुरू होत असतो.

**वीरभूषण**—पण यावरून तूं हें कसं ताडलंस कीं ह्या सहा पहारेकऱ्यांच्या नजरेच्या व हांकेच्या टप्प्यांत दुसरे आणखी सहाजण नाहींत हें ?

**गुलाब**—भूषणमहाराज !

**वीरभूषण**—भू-षणमहाराज म्हण ! मी आतां जमीन खणणारा आहे. त्यांतला महाराज-म्हणजे मोठा गुलाम ! पण हें जाऊं दे. काय, तुझं म्हणणं काय आहे ?

**गुलाब**—माझं म्हणणं इतकंच कीं तुम्हांला धोरण जरा कमी आहे. कारण मी जें म्हणतों कीं आणखी दुसरे कोणी पाहरेकरी यांच्या टप्प्यांत नाहींत म्हणून, ते उगीच नाहीं म्हणत. कारण ते तसे असते तर त्या सहाजणांच्यावर देखरेख करणारा कामदार तिथं खास येता. आणि त्यानं मग त्या जुवेबाजांच्या हातांचे आंगठेच छाटून टाकले असते.

**वीरभूषण**—असं ! (कांहीं वेळ स्तब्ध राहून) गुलाब. ( पुन्हां स्तब्ध )

**गुलाब**—काय म्हणतां महाराज ?

**वीरभूषण**—हें पहा, गुलाब ! मला असं सांग, कीं मी जर ह्या सहाहि पहारेकऱ्यांचे मुडदे पाडायला पुढें सरसावलों, तर आपले हे सारे गुलाम माझ्या मदतीला माझ्या पाठोपाठ-धांवत येतील कां ?

**गुलाब**—छत्, ते नांव नका घेऊं.

**वीरभूषण**—कां बरं नाहीं येणार तें ?

**गुलाब**—कारण एवढंच कीं सध्यां तरी तुम्ही जातिवंत गुलामासारखे दिसतां आहां म्हणून ! ते स्वतःच गुलामगिरींत पिढयान्पिढया खितपत पडले असल्यामुळें, एखाद्या गुलामाच्या मदतीला धांवून जाण्याची त्यांना छातीच व्हायची नाहीं. कारण गुलाम हा प्राणी किती दुबळा, बुळा आणि हीन असतो ह्याची प्रत्यक्ष अनुभवानं त्यांना पुरी जाणीव झालेली आहे. तुम्हीं जर राजासारखे दिसाल तर मात्र ते मोठ्या खुषीनं तुमची पाठ राखायला धांवून येतील.

**वीरभूषण**—पण मी राजा आहेंच कीं. आणखी ही गोष्ट त्या सर्वांना ऐकून ठाऊकहि पण आहे.

**गुलाब**—तें नुसतं ठाऊक असून काय उपयोग ? ती नुसती ऐकीव गोष्ट झाली ! तुम्हीं राजे आहांत असं त्यांना दिसून आलं पाहिजे. प्रत्यक्ष दिसून आलं पाहिजे. अशा प्रकारें जर कांहीं दिसून आलं, तरच त्यांची खात्री होईल. आणि त्यांना मग हें सारें पटेल.अन् मग ते तुमचे अगदीं बंदे होतील.

**वीरभूषण**—मी हातीं शस्त्र धरलं आहें, असं त्यांनीं मला पाहिलं तर येतील कां ते माझ्या मदतीला ?

**गुलाब**—( साश्चर्य ) काय शस्त्र !

**वीरभूषण**—हो शस्त्र. चांगली जातिवंत लांब सडक पल्लेदार तरवार !

**गुलाब**—पल्लेदार तलवार ! वाः वाः ! अशा कल्पना माझ्या डोक्यांत येत्या तर किती बहार होती ? तुम्हीं एकदां राजे होतां म्हणूनच तुमच्या डोक्यांत अशा पल्लेदार तरवारीची कल्पना येते. ह्या पहारेकऱ्यांशीं दोन हात करावेत अशी कल्पना एक वेळ माझ्या डोक्यांतहि खेळत होती; पण ही तरवारीची कल्पना मात्र माझ्या डोक्यांत कधींच खेळली नाहीं ! अशा वेळीं तीन वाद्यांचा कोरडा मात्र माझ्या डोळ्यांपुढें खेळत उभा राही !

**वीरभूषण**—गुलाब ! हें पहा-जरा माझ्याजवळ येऊन खण पाहूं. ( तो तसें करतो ) हें पहा-मला इथं एक फार जुनी पुराणी तलवार सांपडली आहे. ती कांहीं अशी तशी उगीच सामान्य तलवार नाहीं. ती पूर्वीं कोणातरी एखाद्या भाग्यशाली राजाची अथवा महाराजांचीच असली पाहिजे. कारण ती सामान्य शिपायांच्या तरवारीसारखी भिकार नाहीं ! ती कोणातरी एखाद्या महान् क्रुद्ध अशा राजाची असावी ! तिनं यापूर्वी प्रचंड आणि भीषण असे पराक्रम केले असले पाहिजेत ! कारण मधून मधून तिच्या पात्याला खंड पडले आहेत. मला वाटतं आपण खणत आहों ह्या जागेवर पूर्वीं केव्हांतरी एखादं मोठ्ठं—महा घनघोर—महायुद्ध होऊन बराचसा मनुष्यसंहार झाला असला पाहिजे. आणि त्यांत—मी म्हणतों तसा कोणीतरी राजा असून तो एकटाच शेवटपर्यंत लढला असला पाहिजे ! आणि त्यानं आपला देह ठेवण्यापूर्वीं आपल्या दिव्य हत्याराला ह्या ठिकाणीं समाधि दिली असली पाहिजे. त्याशिवाय इतकं दिव्य हत्यार इथं कसं गाडलं जावं ? आणि मला वाटतं तो रणांगणांत मरून पडल्यावर त्याच्या शरीरावर रणगिधाडांनीं मनसोक्त ताव मारला असावा ! कारण त्याला अशा स्थितींत मूठमाती मिळणं अशक्यच झालं असलं पाहिजे !

**गुलाब**—वीरभूषणसिंहमहाराज ! मला वाटतं दीनारमहाराजांचा मरायला घातलेला काळूराम कुत्रा तुमच्या डोक्यांत घोळतो आहे, त्याचा हा परिणाम आहे ! आणि असं होण्याला दुसरं कारण तुमची ही उपासमार ! ह्या दोन्हीं गोष्टींमुळं तुमचं डोकं कांहीं भानावर नाहीं. तुम्ही हें सारं वेडांत कांहींतरी भकतां आहांत झालं. खास मला तर हें वेडच दिसतं तुमचं.

**वीरभूषण**—गुलाब ! अरे वेड्या ! हें वेड नव्हें. खरोखरीच मला इतक्यांत खणतां खणतां अशी एक दिव्य तरवार इथं सांपडली आहे. ( कांहीं वेळ स्तब्ध )

**गुलाब**—अस्सं ! तर मग मी तुमचा बुद्धतारक होऊन भविष्य वर्तवितों. ऐका-ऐका ! तुमच्या डोक्यावर पुन्हां एकदां राजमुकूट चढेल. नवीन कटिबंधानं तुम्हांला पुन्हां कंबर कसावी लागेल, आणि पुन्हां एकदां सिंहासनावर चढावं लागेल, हें अगदी ठाम समजा. आणि असं झालं म्हणजे मग आम्ही तुम्हांला लवून मुजरे करून ' महाराज ' म्हणूनच म्हणूं.

**वीरभूषण**—यापुढं हा भुई खणणारा भूखन नव्हे; मी साऱ्या राष्ट्राचा राजा वीरभूषण होईन ! आतां पहिल्या प्रथम मी आपल्या उपासांचं पारणं

फेडतों. आणि यथेच्छ पाणी पिऊन थोडी झोंप काढतों. आणि मग—पण काय रे— हे गुलाम माझ्या मदतीला धांवून येतील का रे ?

**गुलाब**—तुम्ही आपल्या हातांत नंगी तरवार धरलीत कीं मग तीच त्यांना तशी बुद्धि देईल. ह्या दीनाराचं आराध्य-दैवत मोठं जागृत आहे म्हणतात. मी असं ऐकलेलं आहे कीं जोंपर्यंत ह्या दीनारवंशाच्या आराध्यदेवतेची ती श्याममूर्ति त्यांच्या सिंहासनाच्या मागें त्यांची पाठ राखत उभी आहे, तोंपर्यंत त्यांच्या वंशाचा उच्छेद करून आपला वंश स्थापण्याला आजपर्यंत कोणीहि राजा समर्थ झालेला नाहीं ! मात्र एक वेळ अशी गोष्ट घडल्याचं माझ्या ऐकिवांत आहे कीं पीलकेतू राजानं ह्या राज्यावर स्वारी करून ही मूर्ति नदींत फेंकून दिली; तेव्हांच काय तो दीनारवंशांत खंड पडला. पण पुढें एका धीवराला मासे धरीत असतां ही मूर्ति सांपडली. आणि त्यानें ती आणून राजाला नजर केली. त्या वेळीं पीलकेतूचा नातू गादीवर होता म्हणे, त्यानें ही मूर्ति, त्या मूर्तीचा प्रभाव काय आहे हें ठाऊक नसल्यामुळें पुन्हां जेथली तेथें स्थापन केली. त्याबरोबर त्याचें राज्य जाऊन, पुन्हां दीनारवंश गादीवर आला !

**वीरभूषण**—माझ्या आराध्यदेवतेच्या मूर्तीचे तुकडे करून मी निद्रिस्थ असतांना मला जसें कैद केलें, तसेंच ह्या दीनाराच्या त्या मूर्तीचा जर मला भंग करतां आला तर त्यालाहि मग मला पालथा घालतां येईल ! नव्हे ?

**गुलाब**—हो त्या मूर्तीचे शतखंड तुकडे झाले, तर मग इथले सर्वच लोक भीतीनं गांगरून जाऊन बेदिल होऊन त्यांच्या काळजांत एकच धडकी भरून ते किंकाळी ठोकून एकदम सुंबाल्या करतील ! कारण दीनारच्या आराध्य-दैवताच्या मूर्तीचा असा भंग होणं म्हणजेच भयंकर दुश्चिन्ह असंच त्यांस वाटेल.

**वीरभूषण**—ठीक. पण गुलाब ! राजवाड्यांतल्या शस्त्रागारावर रक्षणार्थ कितीसे लोक असतातरे ? तुला ठाऊक आहे यांतलं कांहीं ?

**गुलाब**—हो तर. शस्त्रागारावरील गुलामांतून नेमलेले पहारेकरी आपला पहारा संपवून निघून गेले म्हणजे मग त्या शस्त्रागाराच्या रक्षणार्थ फक्त दहाच हत्यारबंद लोक तिथं शिल्लक असतात.

( नंतर कांहीं वेळ ते दोघेहि मुकाट्यानें खणतात. )

**गुलाब**—ह्या गुलाम पहारेकऱ्यांवरचा अधिकारी सध्यां इथून निघून गेलेला

दिसतो. आणि म्हणूनच आतां त्यांचे फासे खिळाखिळूं लागले असून त्यांचा जुगार सुरू झाला आहे! ( कुदळ खालीं टाकून हात प्रशस्तपणें पसरतो. ) पहा त्या मोठ्या लांब दाढीच्या माणसानं पुन्हां डाव जिंकला. दान टाकण्यांत तो फार पटाईत आहे. तें पहा पुन्हां खेळूं लागले. पण आतां काळोख पडूं लागल्यामुळें मला इथून चांगलंसं स्पष्ट असं दिसत नाहींसं झालं आहे.

[ भूषण हलकेंच ती तरवार वर काढून, उचलून हातांत घेतो व तिच्या मुठीस हात घालतो. ]

**वीरभूषण**—गुलाब !

**गुलाब**—( दिपून जाऊन ) महाराज !

[ भूषणमहाराज लपत छपत गुलाम पहारेकऱ्यांच्या रोखें जातात. ]

**गुलाब**—( इतर गुलामांजवळ जाऊन त्यांस ) भूषणमहाराजांना एक दिव्य हत्यार-एक भव्य तरवार-सांपडली आहे; आणि ते त्या गुलामपहारेकऱ्यांचे मुडदे पाडायला म्हणून धांवून गेले आहेत.

**इतर गुलाम**—काय तरवार सांपडली आहे ?

**गुलाब**—हो आणि ती कांहीं अशी तशी सामान्य तरवार नाहीं. ती खास कोणातरी एखाद्या मोठ्या भाग्यशाली राजाचीच असली पाहिजे !

**वृद्ध गुलाम**—एकूण भूषणाच्या पाठीचं आज पुन्हां धिरडें होणार ! ह्या कारागाराच्या पुढल्या मैदानांत त्याला चाबकाचा मार मिळणार आणि रात्रभर त्याच्या रडण्या-ओरडण्याचा एकच हाहाःकार होणार ! आणि त्यामुळं आम्हांला घडकी भरून आम्ही होणार बेजार; अन् मग झोपेला कुठला मिळणार थार !

**गुलाब**—काका ! काका ! ही तुमची चरपटपंजरी आतां पुरे करा. हे पहारेकरी दीनदुबळ्या गुलामांना चाबकाखालीं झोडपून काढतील; पण मर्द मनुष्यावर त्यांचे हात उगारणार नाहींत; ते लुलेच पडतील ! भूषणमहाराजांनीं आज मोठें उग्र आणि भीषणरूप धारण केलें आहे. त्यांची मुद्राच आज इतकी क्रूर दिसते आहे कीं त्यांच्याकडे वर डोळा करून हे पहारेकरी पाहूंच शकणार नाहींत. शिवाय त्यांच्या हातांत एक प्रचंड दिव्य खडतर खड्ग आहे ! केवढी जंगी तरवार होती त्यांच्या हातीं ! आणि ती हातांत घेतल्यावर तर ते फारच भयंकर दिसूं लागले. आतां इतक्यांत ते त्या गुलाम पहारेकऱ्यांच्या हातांतल्या तरवारी आपणांस आणून देतील. त्या मुकाट्यानं तुम्ही उचलून त्यांच्या पायापुढें

लोटांगण घातलं पाहिजे. नाहींतर तुमच्यावर ते क्रुद्ध होतील! संभाळा, अगोदरच मी तुम्हांला बजाऊन ठेवतों आहें.

**वृद्ध गुलाम**—काय वीरभूषणसिंह मला देखील एक तरवार देतील?

**एक गुलाम**—काय? तरवार! छेः छेः आपण नाहीं तरवारीला शिवणार! कारण माझ्याजवळ तरवार असल्याचं जर दीनारमहाराजांना आढळून आलं तर ते माझा शिरच्छेद करतील!

**२ रा गुलाम**—(हलके विचार करीत करीत) माझ्याजवळ तरवार आहे असं जर कां आमच्या राजेसाहेबांनीं पाहिलं तर त्यांची घडी भरली असंच त्यांस वाटेल!

(सर्व गुलाम आपल्या डावीकडे पाहतात.)

**गुलाब**—मला वाटतं ते पहारेकरी पुन्हां फाशांचं दान टाकूं लागले.

**१ ला गुलाम**—पण तिथं राजे भूषणसिंह कुठें दिसत नाहींत ते?

**गुलाब**—ते दिसायचे नाहींत कारण ते तिकडे लपत छपत गेले आहेत. ते गुलाम पहारेकरी मात्र जमिनीला जिथं आकाश भिडलेलं दिसतं तिथं बसलेले दिसताहेत.

**२ रा गुलाम**—पण त्या पहारेकऱ्यांच्या मागं जी गडद सावली दिसते आहे ती कसली?

**गुलाब**—ती भूषणसिंहमहाराजांची खास नाहीं. कारण तिच्यांत कांहीं हालचाल नाहीं; ती अगदीं स्थिर आहे.

**२ रा गुलाम**—छत्! ती पहा हलते आहे!

**गुलाब**—संध्याकाळ होऊन गडद काळोख पडत चालल्यामुळें मला कांहींच दिसेनासं झालं आहे.

(ते सर्व त्या काळोखाकडे टक लावून पाहूं लागतात. गुडघ्यावर राहून माना वर करून निमूटपणें न्याहाळूं लागतात. नंतर त्यांच्या व इतरांच्या तोंडून "ओहो, ओहो! तें पहा—तें पहा वीरभूषण आपलें हत्यार सपासप चालवीत आहेत." असा एकच ध्वनि निघतो.)

(पडदा पडतो)

**अंक १ ला समाप्त.**



# अंक २ रा.



**स्थळ—दीनारचें राजसभागृह.**

**प्रवेश**—[ राजा दीनार सिंहासनावर बसला आहे. त्याच्या पार्श्वभागीं त्याच्या आराध्य दैवताची एक कृष्णवर्णमूर्ति आहे. त्याच्या राण्या त्याच्या सभोंवार आहेत. सर्वांच्या डोकीवर मुकूट आहे ! त्या मूर्तिपुढें एक हत्यारबंद शिपाई पाहारा करीत उभा आहे. इतक्यांत गुलामांच्या शेताडीकडून 'मानकापी' पोवाड्याचे सूर अस्पष्टपणें ऐकूं येतात. ]

**महाराणी अंगारवती**—दाखवाच गडे आम्हांला ते नवीन आलेले भविष्यवादी. दाखिवतांना महाराज ? (इतर राण्यांस) त्यांचं नांव म्हणे बुद्धतारक! किती तरी गोड आहे बाई हें नांव, नाहीं का ?

**दीनार**—जरूर, जरूर. ( सभोंवार पाहून ) कोण आहे रे तिथं ?

[ इतक्यांत एक परिचारक येतो. तो राजा पुढून त्या मूर्तीकडे जातो, व तिच्यापुढें लोटांगण घालून पुन्हां परतून दीनार राजापुढें दूर अंतरावर उभा राहून त्यास आदबीनें मुजरे करितो. ]

**परिचारक**—आज्ञा महाराज !

**दीनार**—[ त्यास ] अरे, तूं जा अन् बुद्धतारकांना इकडं घेऊन ये. [ तो जातो. दरम्यान गुलामांवर देखरेख करणारा कामदार हातांत एक कागदाची सुरळी घेऊन येतो. तो त्या परिचारकाप्रमाणेंच पहिल्यानें त्या मूर्तीपुढें जाऊन तिजपुढें लोटांगण घालतो व नंतर राजासमोर येऊन मुजरे करून गुडघे मोडून नम्र शिर करून बसतो. इकडे दीनार त्याच्या उजवीकडे असणाऱ्या राणीशीं बोलत असतो. ]

**दीनार**—( राणीस ) अंगारवती ! ह्या मोठ्या बगीच्याच्या कोंपऱ्यावर नदीच्या अगदीं किनाऱ्यावर तुमच्याकरितां एक सुंदर लताकुंज आणि एक छोटीशी स्वतंत्र बाग करण्याचं आम्हीं ठरविलं आहे. आणि या बागेच्या एका भागांत तर तुमच्या आवडीचा एकजात निशीगंधच लावून घ्यायचा आहे ! आणि दुसरीकडे मग इतर फुलझाडं आणि फळझाडं. ह्या ठिकाणीं नदीचा प्रवाहहि

थोडा अरुंद होऊन वळसा घेत आहे. हा नवा बगीचा पाहून तुम्हांला तुमच्या माहेरचीच स्मृति झाली पाहिजे. आणखी मीं असंहि पण ठरीवलं आहे कीं, डोंगरांतून आणखी एक प्रवाह निराळ्याच एका नव्या मार्गानें आणून इथं दुसऱ्या बाजूला सोडवा यचा, समजलांत? ( ऊर्वशीकडे वळून ) आणखी हें पहा प्रिय ऊर्वशी ! तुझ्याकरितां मी एक कृत्रिम डोंगर करविणार आहें. खाणींतून चित्रविचित्र असे भिन्न भिन्न प्रकारचे दगड आणवून त्यांचे खडक मी माझ्या सुस्त गुलामांकडून त्या डोंगरांत उभे करवीन आणि त्यावर डोंगरी झाडंझुडपं आणून लाव्वीन. मग त्याला तूं आपला ‘ क्रीडापर्वत ’ करून, तिथं खुशाल विहार कर. मग भर हिंवाळ्यांत देखील तूं आपल्या पित्याच्या उत्तर–जांगलांत आहेस असंच तुला वाटेल, समजलीस? ( सन्निध बसलेल्या कामगारास ) काय? हातांत भेंडोळं कसलं दिसतंय तुमच्या?

**कामदार**—महाराजांच्या नवीन बागेचे नकाशे आहेत हे सरकार ! आज पांच वर्षं सगळ्या गुलामांनीं खपून सारी जमीन खणून काढून, बगीचांत फिरण्यासाठीं खडी टाकून सुंदर मार्ग मधूनमधून बनविले आहेत.

**दीनार**—पाहूं, पाहूं, तुमचे नकाशे. [ नकाशे हातीं घेतो ] कायहो? त्या रावणराजाच्या लंकेमध्यें अशोकवन नांवाचा एक बाग होता नाहीं का?

**कामगार**—होय महाराज, तो मोठा प्रचंड बाग होता.

**दीनार**—तर आमचा बाग त्याहिपेक्षां प्रचंड झाला पाहिजे ! असा कीं तो पाहून सगळ्या जगानं थक्क होऊन गेलं पाहिजे ! (नकाशा निरखून पाहूं लागतो.)

**कामगार**—महाराजांच्या इच्छेप्रमाणंच सगळं होईल !

**दीनार**—( नकाशा दाखवून ) हें पहा, हें टेंकाड नको आहे इथं. त्या टेंकाडाची दरड आणि ही चढण फार उंचच उंच आहे.

**कामगार**—तसं नाहीं महाराज !

**दीनार**—( खेंकसून ) काढून टाका ही, एकदम काढून टाका.

**कामगार**—होय, काढतो महाराज.

**दीनार**—राणीवशाला फिरतां येण्यासारखा हा बाग केव्हां तयार होईल?

**कामगार**—सध्यां काम जरा धीरे धीरे चाललं आहे महाराज ! कारण ह्या दिवसांत रानावनांतून व डोंगरांच्या कपारींतून मुबलकशा सदा हिरवळी आणि

वेली उपटून आणायला मिळत नाहींत. जंगलांत फिरून फिरून गुलामलोक थकून जातात आणि खायला न मिळाल्यामुळं थोडं उद्धट आणि दिमाखखोर होतात.

**राणी कमलावती**—( कामगारास ) मग त्यांना मारे चाबकाखालीं फोडून कां नाहीं काढीत ? ( राणी ताम्रलेखेस ) नाहीं का बाई, हा अगदीं सोपा तोडगा आहे त्यांचा दिमाख उतरून त्यांना ताळ्यावर आणायला ! नुसते चार कोरडे उडविले म्हणजे झालं. पण ह्या कामगारांना हें वेळेवर सुचेल तर ना ? ही नंवी बाग केव्हां तयार होईल आणि हिच्यामधून आपल्याला केव्हां सहल करायला सांपडेल अशी मला कितीतरी उत्कंठा लागून राहिली आहे; आणि हे सांगतात कीं—' ती अजून तयारच नाहीं, महाराज ! ' ( वेडावून ) " ती अजून तयारच नाहीं, महाराज ! " ती इतके दिवस लागून, अजून तयार होऊं नये म्हणजे नवलच नव्हे कां ? ती तयार न व्हायला काय अशीं कारणं तरी काय आहेत ?

**राणी उर्वशी**—खरंच, हे कामगार लोकच नादान आणि कामचुकारू आहेत !

**दीनार**—( कामगारास ) काय वाटेल तें करा. दिवसाची रात्र आणि रात्रीचा दिवस करून बाग एकदम तयार करा—समजलांत ! हे घ्या नकाशे.

**कामगार**—जशी महाराजांची आज्ञा.

[ राजा दीनार कामगाराकडे नकाशे देतो व तो निघून जातो. परिचारक बुद्धतारकास घेऊन येतो. बुद्धतारक त्या मूर्तीपुढें व राजापुढें अनुक्रमें शिर वांकवितो व कांहीं न बोलतां उभा राहतो. सेवकहि त्याचप्रमाणें करून द्वाराशीं उभा राहतो. इकडे राजा दीनार राण्यांशीं बोलत आहे. ]

**दीनार**—( अंगारवतीस ) हें पहा, तो प्रवाह असा वळवून आणला म्हणजे मग त्यांत निरनिराळ्या प्रकारचीं बदकं आणून सोडून देऊं. म्हणजे तीं पाण्यांतून तरंगत पोहत जाऊं लागलीं म्हणजे फारच सुंदर देखावा दिसेल ! मग तुम्हांला वाटेल कीं आपण आपल्या पितृगृहींच आहों. अहो, बुद्धतारक ! आतां तुम्ही आपलें भाविष्य वर्तवून सांगा पाहूं आम्हांला.

**बुद्धतारक**—( कांहीं वेळ त्या मूर्तीवर दृष्टि खिळवून मग एकदम केस व अंग झाडून मोठ्यानें खड्या आवाजांत ) ऐका, ऐका ! भविष्य ऐका. एकदां

एक राजा होता. त्याच्या पदरीं असंख्य गुलाम होते. त्याच्याकरितां रात्रंदिवस त्यांना राबावं लागे, म्हणून ते सर्वजण त्याचा द्वेष करीत; त्याला शत्रुसारखा लेखीत. त्याच्या पदरीं त्याचे खास शरीररक्षक असून ते त्याच्याकरितां मरायलाहि तयार होणारे असे ते खंदे शिपाई होते. पण ह्या सर्व मर्द खंद्या शिपायांची संख्या—त्याचा द्वेष करणाऱ्या त्याच्या गुलामांच्या संख्येच्या मानानें फारच अल्प होती. त्यामुळें त्यांनीं शंभर वर्षें खऱ्या मुदतीच्या आंतच कितीतरी अगोदरच मरली ! आणि हे राजा ! तुझा द्वेष करणाऱ्या तुझ्या गुलामांच्या, आणि तुझ्या रक्षक शिपायांच्या संख्येकडे पाहिलं तर तुझ्या गुलामांची संख्याच कितीतरी अधिक आहे असं दिसून येतं !

**राणी कमलावती**—( एकीकडे ताम्रलेखेस ) हें पहा, ताम्रलेखा राणीसाहेब ! त्या माणकांच्या मध्यें तीं मोठीं पांच जडवलेला तो राजमहिषीचा मुगूट जेव्हां मी धारण केला, तेव्हां परराज्यांतून आलेला तो राजपुत्र दिपून गेला. आणि त्या वेळचे त्याच्या तोंडचे—" हा मुंगुट राणीसाहेबांना फारच खुलून दिसतो ! " असे उद्गार होते !

[ राजा दीनार अंगारवतीशीं बोलत असतां मधून मधून स्मित करीत असतां बुद्धतारकाचें भविष्यकथन संपलेसें पाहून, ऐटीनें मान तुकावितो. राण्या हें पाहून टाळ्या वाजवून स्मित करून भविष्य न ऐकतांच त्या भविष्यवाद्याचा गौरव कारतात. ]

**राणी उर्वशी**—वाः ! वाः ! हे भविष्यवादी फारच मोठे गुणी आहेत ! यांना महाराजांनीं आणखी एखादें भविष्य सांगायची अनुज्ञा करावी. अग बाई ! कितीतरी बुद्धिवान् आणि हुषार दिसतात पण हे ! यांच्या डोळ्यांतलं पाणीच कांहीं विलक्षण दिसतं !

**दीनार**—आमच्या राणीसाहेबांचा हुकूम होत आहे. वर्तवा, दुसरं भविष्य वर्तवा.

**बुद्धतारक**—(अंग हिसडून व डोळ्यांवरून हात फिरवून ) विलक्षण दृश्य ! फारच विलक्षण दृश्य ! पहा, पहा—तुमच्या डोंगरी किल्ल्यावरून जें सैन्य आहे त्यांना मैदानावर असलेलं लांबचं शत्रूचं सैन्य दिसत नाहीं. ज्याला तुझ्या शत्रूचा माग काढणारे तुझे गुप्त टेहळे सरहद्दीच्या कान्याकोपऱ्यांतून गुपचूप शोध

करांत फिरताहेत, तो तुझा शत्रु तर तुझ्या नगरवेशीच्या आंतच अगदीं गुपचिप निर्धास्तपणें वावरतो आहे ! ह्या वेळीं माझ्या दृष्टीपुढून जात असणारे–गूढ स्वरूपांत जात असणारे–हे सूचक अपशकून मला देखील भिववून टाकीत आहेत ! पण अजून देखील थोडा अवकाश आहे; फारच थोडा अवकाश आहे ! हा पहा, माझ्या अंतरंगांत कसा एकदम सर्वत्र काळोख पसरला ! मला भीति वाटते,–आणि हें लक्षण तुझ्या राज्यनाशाचं दर्शक आहे !

**राणी कमलावती**—( ताम्रलेखेस ) ह्या बुद्धतारकांचे हे चमत्कारिक केश मला नाहीं आवडत ! मानेच्या हिसड्याबरोबर हे पिंजारले जाऊन यांच्या भेसूर तोंडावर ते पसरतात !

**ताम्रलेखा**—त्यापेक्षां त्यांनीं ते जर कापून टाकवले तर वरं नाहीं का ?

**दीनार**—( डोकें हालवून ) ठीक, ठीक आहे. फार गमतीदार भविष्य वर्तवलंत !

**ताम्रलेखा**—हो, फारच गमतीदार भविष्य. कितीतरी हुषार आहेत पण हे बुद्धकारक ! ह्यांना हें असं कसं भविष्य सांगतां येतं आणि यांना हें सगळं कसं दिसतं ह्याचंच बाई मला मोठ्ठं नवल वाटतं !

**राणी कमलावती**—ते हुषार आहेत ही गोष्ट खरी. पण मनुष्याला आपल्या हुषारीची फार घमेंड आहे असं पाहिलं म्हणजे मग मला नाहीं आवडत तो मनुष्य. तें बघ, त्यांनीं आपले केस पिंजारून आपलें तोंड कसं केसांनींच आच्छादून टाकलं आहे अगदीं !

**राणी ताम्रलेखा**—खरंच कीं हो, त्यांचा चेहरा ह्या अशा केसांच्या जाळ्यामुळं फारच उग्र आणि भेसूर दिसतो !

**राणी कमलावती**—भविष्य वर्तविण्यांत तो एक हुषार असेल, हें मी नाहीं म्हणत नाहीं. पण तेवढ्यामुळं त्यानं हे मुलुखावेगळे विचित्र केस ठेवावेत असं कुठं काय आहे ? चार चौघे इतर लोक ठेवतात तसे ठेवले म्हणून कुठं बिघडतं ? पण दुसऱ्यापेक्षां आपल्यांत कांहीं विशेष आहे, ही घमेंड आहेना यांना !

**राणी ताम्रलेखा**—खरंच बाई ! मला देखील फाजील घमेंडखोर माणसं मुळींच आवडत नाहींत. तीं माझ्या दृष्टिसमोर सुद्धां असूं नयेत असं वाटतं मला. पण त्या मूर्तीकडे हे टक लावून पाहूं लागले म्हणजेच ह्यांना हें सारं दिसतं हें कसं ?

[ एक राजसेवक येतो व त्या मूर्तीपुढें डोकें टेकून नंतर तो राजास प्रणाम करितो. ]

**राजसेवक**—( हात जोडून नम्रपणें ) भोजन मंदिरांत झाडून सारी पाहुणे मंडळी केव्हांच येऊन बसली. ( सर्वजण उठतात, व दोघी राण्या हातांत हात घालून मिळून जातात. )

**अंगारवती**—( जातां जातां उर्वशीस एकीकडे ), काय हो उर्वशीताई ! तो तारक कसले इतके तारे तोंडांत होता ?

**उर्वशी**—सरहद्दीवरलि सैन्यासंबंधानं त्याची कायशीशी चरपटपंजरी चालली होती.

**अंगावरती**—अगबाई, असं कां ? या गोष्टींवरून खास शिबंदींतला तो पिवळ्या पगडीचा राऊत माझ्या डोळ्यापुढं दिसूं लागतो ! त्याचं म्हणे त्या ललितेवर मन जडलं आहे.

**ऊर्वशी**—म्हणजे त्या लक्ष्मण देवाचंच कीं नाहीं ? ललिता देखील असंच कायससं म्हणत असल्याचं मला अंधुकसं स्मरतं खरं.

[ दरवाजापाशीं पोंचल्यावर राण्या तेथेंच थबकतात; व दरवाजाच्या दोन्ही बाजूस दोघी दोघी रांगेनें उभ्या राहतात. नंतर राजे दीनार सिंहासनावरून उठून त्यांच्यामधून जातात व त्या त्याचें अभिनंदन करितात, आणि नंतर त्याचे मागोमाग जातात. त्यांच्यामागून राजसेवक जातात, व नंतर आंतून गायन चालत असल्याचें ऐकूं येतें. इकडे त्या पाषाणाच्या मूर्तीपुढें नेमणुकीचा देवळ्या नांवाचा पहारेकरी पहारा करीत उभा राहतो.

**देवळ्या**—त्या वुद्धतारकांनीं वर्तविलेलं तें भविष्य माझ्याच्यानं तर स्वस्थ मनानं ऐकवेना देखील. तें जर खरं झालं तर फारच भयंकर ! पण खोटं ठरलं तरी देखील त्याहून भयंकर ! कारण हें ह्या आराध्य दैवतेच्या कृपेंतल्या भगतानं वर्तिवलं आहे ! ( कानोसा घेऊन ) अरे, पण हे कर्णमधुर सूर कुठून आले ? अहाहा ! किती तरी मधुर गायन आहे हें ! कसली बरं चीज चालली आहे ही ? ( ऐकून ) " मदिराऽमदिरा ! प्राशि, प्राशि, मदिराक्षि ! ही मदिरा !" हें तर मदिरागीत दिसतंय ! आमच्या महाराजांचं आवडतं—अत्यंत आवडतं-गीत आहे हें. ( डोकावून पाहून ) आमचे महाराज, सगळा राणीवसा, आणि शेलके शेलके

मानकरी, सगळे कसे रंगून गेलेले दिसतां आहेत ! मधून मधून राण्याहि सूर देत आहेत, किती आनंदांत निमग्न झाले आहेत सगळे जण ! खरंच, मी देखील जर एखादा मानकरी असतों तर मला देखील ह्या रंगांत मिसळतां आलं असतं आणि मग मी ह्या राणीवशांतलि झाडून सगळ्या राण्यांचे चांदमुखडे न्याहाळीत मोठ्या खुषींत बसलों असतों ! ( गाणें ऐकून आपणहि गाऊं लागतो. )

" प्राशि, प्राशि, मदिराक्षिऽऽ ! ही ऽऽ मदिराऽऽऽ ॥मदिराऽऽऽ ॥ मदिरा, म–दि–रा ! मऽदिऽराऽ !

[ आंतून–"पाहरा उठवा" ! असे एकच ठांसून उच्चारलेले शब्द एका नव्याच पहारेकऱ्याचे तोंडून द्विवार त्रिवार ऐकूं येतात. व दुसरीकडून मदिरा–गीताचे शब्द कानीं पडतात. ]

**एक अधिकारयुक्त आवाज**—ह्या नवख्या सशस्त्र पहारेकऱ्याला हांकलून द्या इथून. उठा, बसलांत काय डुकरासारखे स्वस्थ ?

[ एकीकडे मदिरागीत चालू आहेच, दुसरीकडून तरवारींचा खणखणाट अस्पष्टसा ऐकूं येतो. ]

**एक मोठा आवाज**—चला ! शस्त्रागाराकडे चला ! एकदम शस्त्रागाराचा रस्ता सुधरा. सगळे जण तिकडे चला. तिथली अगोदर एकदम बळकटी केली पाहिजे. कारण–सगळ्या गुलामांचा सारा तांडाचा तांडा शस्त्रागाराकडे लोटला आहे. ( अनेक शस्त्री येत असल्याचें पाहून ) अरे बापरे ! आतां यांच्यापासून कोण रक्षण करणार ? ( कांहीं वेळ सामसूम दिसते; नंतर दरवाजाचे मध्यभागीं वीरभूषणमहाराज प्रवेश करितात. )

**वीरभूषण**—( एका हत्यारबंद गुलामास ) तूं गुलामांच्या शेताडींत जा - आणि तिथल्या झाडून साऱ्या मंडळींना कळीव कीं राजवाड्यावरील सारी शिबंदी ठार झाली, आणि तिथला खास हत्यारखाना आमच्या कबजांत आला.

**१ ला गुलाम**—जशी आज्ञा. [ जातो. ]

**वीरभूषण**—( इतर गुलामांस ) तुमच्यापैकीं दहा जणांनीं काबीज केलेल्या ह्या शस्त्रागाराचें रक्षण करावें. शेताडीकडून आमचे लोक आले, म्हणजे त्यांची नेमणूक तिथं होईल. आणि तुम्हांला दुसरी कामगिरी सांगितली जाईल. जा, सावधगिरीनं हत्यारें सरसावून अगदीं सज्ज असा. ( कांहीं हत्यारबंद गुलामांसह

राजवाड्याच्या मुख्य सभागृहांत जातो. ) [ गुलामांस ] अगोदर ती मूर्ति तिथून उखडून टाका.

**देवळया**—( सावेश ) पहिल्यानं इथं माझा मुडदा पाडल्याशिवाय त्या पवित्र मूर्तीला कोणालाहि स्पर्श करितां येणार नाहीं.

**१ ला गुलाम**—तुझा मुडदा कोणाला पाहिजे आहे ? तूं आपल्या हातांतलं तें शस्त्र मुकाट्यानं खालीं ठेव म्हणजे झालं. [सर्व गुलाम त्याचेवर धाऊन जाऊन त्याला पकडतात व त्याच्या हातांतील शस्त्र काढून घेतात. व ते ती मूर्ति खालीं पाडून तिचे तुकडे तुकडे करितात. तिचे सात तुकडे होतात. ]

**वीरभूषण**—एकूण ह्या कृष्णमूर्तीचें उच्चाटन होऊन हिचा भंग झाला तर!

**गुलाब**—( भेदरून ) काय ? ही कृष्णमूर्ति अभंग असतां हिचाहि अखेर भंग झाला तर ?

**वीरभूषण**—माझ्या आराध्य दैवताचे तीन तुकडे झाले होते. आतां दीनारच्या ह्या कृष्णमूर्तीचे सात झाले आहेत ! आतां दीनारच्या नशीबाची सद्दी खास संपली ! ( एक गुलाम राजसिंहासनाचा एक हात मोडतो, तो सोनेरी हात उचलून एका गुलामापुढें करून ) अरे, तूं पुढें ये, शस्त्राऐवजीं हा सिंहाचा हातच तूं घे. आमचे सगळे गुलाम शस्त्रधारी झाले पाहिजेत. चला, या सारे जण माझ्या मागोमाग. सर्व. जातात.

[ राजा दीनार सर्व लवाजम्यासह येतो. ]

**दीनार**—( सभय साश्चर्य ) अरे, आमच्या सिंहासनाचा एक हात काय झाला ? कोणाचं काम हें ? आमच्या आराध्य देवतेचा आमच्यावर कोप तर नाहीं झाला ?

**सेवक**—महाराजांची आराध्यमूर्ति कोसळून खालीं पडलेली दिसते.

**सर्वजण**—काय मूर्ति खालीं पडली ? ( सर्वांच्या हातांतील शस्त्रें गळून पडतात. )

**दीनार**—काय मूर्त पडली ? हो खरंच पडली ! ( देवळ्यास ) देवळ्या ! तूं इथं पाहऱ्यावर होतास ना ?

**देवळया**—( चाचरत ) होय, महाराज !

**दीनार**—मग असं कोणचं प्रबळ दैवत इथं आलं—अथवा अशी कोणची अद्भुत शक्ती इथं इतक्यांत अवतीर्ण झाली आणि तिनं हें भयंकर कर्म केलन् ?

**देवळ्या**--( चांचरत ) ती शाममूर्ति पडली.

**दीनार**--इथं कोणी दुसरीं तिसरीं माणसं आलीं होतीं काय ?

**देवळ्या**--पडली महाराज !

**दीनार**--बोल, ते कुणीकडून गेले ? ( स्वगत ) हा तर गांगरलेला दिसतो !

**देवळ्या**—ती कृष्णमूर्ति कडाडली अन् कोसळून पडली ! तिचे हातपाय लुले होऊन गळून पडले !

**दीनार**--हा भ्यालेला आहे. (आपल्या लोकांस) या असे पुढें या. उगीच गांगरून जाऊन मागें मागें सरूं नका. ज्यांनीं हें अघोर कृत्य केलं असेल त्यांना पकडून आणून त्यांचे ह्या आराध्य देवतेपुढें हाल हाल करूं, त्यांचे डोळे काढून ते एका सरांत ओवून ती माळ ह्या मूर्तीच्या या अवशेषावरच अर्पण करूं. या म्हणजे ही मूर्ती आम्ही सूड उगविल्याचं डोळा भरून पाहील; आणि मग हिला पुन्हां हात पाय फुटतील ! मग आपण त्या अघोरकर्म्यांच्या हाडांच्या चवुतऱ्यावर ह्या मूर्तीची पुन्हां स्थापना करूं ! [ ज्यांचे ज्यांचे हातांतून भाले गळून पडले होते ते ते पुन्हां वर उचलून घेतात. ] चला, या माझे पाठोपाठ [ ते निरुत्साहानें दीनारचे मागोमाग जातात. लांबून शोकध्वनि ऐकूं येतो.व मधून मधून 'आराध्य दैवत पडलें ! ती शाममूर्ती पडली ! अभंग श्याममूर्ती भंगली ! असे शब्द एकसारखे कानावर येतात. दुसऱ्या बाजूनें तेच शब्द थोडे बदलून ' श्याममूर्ती भंगली ! मूर्ति छिन्नभिन्न झाली ! मूर्तीचे तुकडे तुकडे झाले ! अभंग मूर्तीचा भंग झाला ! ' त्यानंतर तरवारींचा खणखणाट व युद्धाच्या आरोळ्या ऐकूं येतात. ]

**देवळ्या**--(त्या भंग पावलेल्या मूर्तीचा वरील भाग बसता करून त्यापुढें नम्र होऊन) अरे, अरे ! काय ही ह्या श्याममूर्तीची तोड फोड ! त्यांनीं ही मूर्ती अशी छिन्नभिन्न केली एकून हाय, हाय ! दुर्दैव—दुर्दैवच ओढवलं हें ? ह्या मूर्तीचा हा असा भंग करून त्यांनीं तारकांच्या गतीचे मार्ग मोठे संकटप्रद आणि भयंकर करून ठेवले आहेत ! मला वाटतं यापुढं तो चंद्र काळा ठिक्कर पडणार ! नाहीं तर आकाशांतून गळून पडून या रात्रीं कायमचा घटस्फोट करणार ! त्याचप्रमाणें तो सूर्य देखील या पुढें उगवणार नाहीं. सगळ्या जगाचा आपण कसा विध्वंस केला—याची या अघोरकर्म्यांना कल्पनाच नाहीं !

[ वीरभूषणमहाराज सशस्त्र लोकांसह पुन्हां येतात. ]

**वीरभूषण**--( कांहीं वृद्ध गुलामांस ) तुम्ही आजच्या आज भूषणावतीला जाण्याकरितां निघा. आणि माझ्या सगळ्या लोकांना सांगा कीं, मी आणि माझी भूषणावली आज शत्रूच्या दास्यांतून मुक्त झालों आहों. ( दुसऱ्या एकांस ) आणि तुम्ही शंभर हत्यारबंद लोक घेऊन सरहद्दीवर जा. आणि तिथल्या आडदांड लोकांपुढें सिंहासनाचा तो सुवर्ण-हस्त टाका, आणि त्यांना विचारा कीं ' तुम्हांला हा सुवर्णहस्त पाहिजे कीं मरण पाहिजे? ' त्यांना विश्वासांत घेऊन असाहि पण दिलदिलासा द्या कीं हा सुवर्णहस्त तुम्हां सर्वांमध्यें मिळून वांटला जाईल. दोन्हींपैकीं कोणची गोष्ट पत्करायची हें त्यांच्या मर्जीवर सोंपवा. निमूटपणें ते वश झाले तर ठीकच आहे. नाहीं तर त्यांची एकसहा कत्तल करा. ( हत्यारी शिपाई सिंहासनाचे दोन्ही बाजूस दुतर्फा ओळीनें उभे राहतात.) हे दिव्य राजतेजा! हे दिव्य शस्त्रा! तूं आतां आपल्या सिंहासनावर विराजमान हो! [ असें म्हणून राजा वीरभूषण प्रेक्षकांकडे तोंड करून उभा राहतो व धीरे धीरे तें दिव्य शस्त्र उचलून आपल्या दोन्ही हातावर आडवें ठेवितो व आपल्या डोक्याहूनहि थोडे उंच होतील अशा बेतानें हात वर उचलतो. ] ज्या अज्ञात आणि मृत वीरश्रेष्ठाचें हें दिव्य शस्त्र आहे त्या वीराचा-त्या वीरसिंहाचा विजय असो. या दिव्य शस्त्राला आणि याच्या रक्षक देवतांना मी शतशः प्रणाम करितो. ( तें शस्त्र तो आपल्या मस्तकास लावतो; व नंतर तें आपल्या मस्तकावर उचलून धरतो. नंतर सिंहासनावर तें हत्यार ठेऊन त्या सिंहासनास तीन प्रदक्षिणा घालून त्याला अभिवादन करून, मग आपणहि त्याच्याच जवळ बसतो.

**गुलाब**—महाराजांना हा गुलाब प्रणाम करीत आहे. [ असें म्हणून वीरभूषण महाराजांपुढें लोटांगण घालून नंतर त्यांचे पायांवर नम्रपणें मस्तक ठेऊन बसला राहतो. व मधूनमधून " महाराज! महाराज! " असा उच्चार करितो. इतक्यांत एक हत्यारी गुलाम-दीनाराच्या नव्या बागेवरील मुख्य कामगाराला फरफटत ओढीत आणतो. राजा वीरभूषण त्याजकडे निरखून पाहतो. त्याला सिंहासनासमोर आणतात. त्याचे हातांत कागदाची एक सुरळी असते. कांहीं काल राजा अगदीं स्तब्ध असतो. ]

**वीरभूषण**—( त्या कामगारास ) तुमच्या हातांत काय आहे? ती सुरळी कसली?

**कामगार**—( लवून मुजरा करून ) महाराज ! दीनारराजांनीं योजलेल्या मोठ्या बगीच्याचा हा नकाशा आहे. आश्चर्यानें सगळं जग थक्क होईल असा हा बाग व्हायचा होता ( नकाशा वर उचलतो ) लंकेश्वर रावणाच्या अशोक वनिकेहून देखील मोठा.

**वीरभूषण**—( तिरस्कारानें ) सबंध तीन वर्षेंपर्यंत मीं जी जमीन खणली ती यांत कुठं आहे ती दाखवा.

**कामगार**—ही-ही ती जमीन. [ तो कामगार कांपत कांपत ती दाखवितो. त्याच्या हाताबरोबर तो कागदहि हालतो. ]

**वीरभूषण**—यापुढें ह्या भूमीवर एका अज्ञात आणि दिवंगत वीराकरितां एक प्रचंड छत्री नाहींतर मंदीर उभारा; आणि त्यांत एक रम्य चबुतरा बांधून त्यावर ह्या दिव्य शस्त्राची शाश्वतची स्थापना करा. उद्देश एवढाच कीं, मृत विभूतींचे आत्मे रात्रीच्या वेळीं या अंतरिक्षाच्या पोकळींतून इतस्ततःसंचार करीत असतात असें सांगतात. हें जर खरं असेल, तर ज्या वीर विभूतीचें हें दिव्य शस्त्र असेल, तो वायुरूपानें रात्रीचा येथें संचार करीत असतां हें दिव्य शस्त्र त्याच्या पुन्हां एकवार दृष्टीला पडावं. आणि यापुढं या मंदिरांत येऊन त्यानं आमच्या वीरपूजेचा स्वीकार करावा ! आमचा हा आजचा राज्यारोहणाचा दिवस आणि हा विभूतिपूजनाचा दिवस पुढल्या वर्षीं एकच महोत्सवदिन होऊन साजरा झाला पाहिजे. वर्षाचे आंत हें मंदिर उभारलं गेलं पाहिजे. आणि तिथं ह्या दिव्य शस्त्राची स्थापना झाली पाहिजे. कारण हें दिव्य शस्त्र म्हणजे परमेश्वरी तेजाच्या अंशापासून निर्माण झालेलं आहे. कारण प्रत्यक्ष भगवंतानींच म्हटलं आहे कीं-यत् यत् विभूतिमत् सत्त्वं मम तेजोऽशसंभवम् । तेव्हां हें मंदिर उभारण्यास एकदम आरंभ करा. विभूतिपूजनाकरितां तेथें येण्याला सर्वांना पूर्ण मोकळिक राहील. लहानमोठा हा भेद येथें राहाणार नाहीं. इतर सगळ्या बड्या लोकांना माझा असा हुकूम फर्मावा कीं त्यांनींहि ह्या गुप्त वीराचा योग्य सन्मान करण्याकरितां तिथं हजर राहिलंच पाहिजे. चुकता कामा नये. [ इतक्यांत दीनार राजाकडील एक खासगींतला नोकर येतो व वीरभूषणसिंहास सिंहासनावर पाहून दचकतो व शून्य दृष्टि होऊन उभा राहतो. ]

**वीरभूषणसिंह**—( त्यास ) कोण आहेस रे तूं ?

**शुनीपाल**—( मुजरा करून ) मी दीनाररराजांच्या कुत्र्याचा कुत्तेवाला शुनिपाल आहे महाराज.

**भूपण**—मग तूं इथं का आलास ?

**शुनिपाल**—राजांचे काळूराम कुत्ते समाधिस्थ झाले ! ते मेले !

**वीरभूषण**—( बेभान होऊन) मेला ?—आणि त्याचीं हाडकं-हाडकं कुठं आहेत ! ( शुद्धीवर येऊन ) काळूराम मेला ? तर त्यांना त्या कुत्र्याला-त्याच्या जुन्या राजाबरोबरच मातीमध्यें गाडून टाकून पुरून टाका जा. त्या दोघांची ताटातूट होऊं देऊं नका !

**गुलाब**—हें भलतंच काय महाराज ! ( ऐकल्यासारखें करून ) हा आवाज ऐकलांत ? किती खोलांतून येतो आहे हा ! [ प्रचण्डनाद-" युद्धपर्व संपलं आतां शांतिपर्व सुरूं झालं !" ]

**वीरभूषणसिंह**—तर हें पहा,-मीं देखील हें दिव्य शस्त्र आतां म्यानबंद केलं.

ॐ शांतिः शांतिः शांतिः

[ सर्व " शांतिः शांतिः " असा एकच गजर करितात. ]

**[ पडदा पडतो. ]**



# हृदयाची जखम !

लेखक—श्रीयुत **सां. घ. कंटक.**

"अगदीं अशी गुणी बायको हवी होती मला ग्यानबा ! मौज तरी पहा गड्या ! नवऱ्यानें दारु पायीं सगळ्या संसाराची राख-रांगोळी केली तर ही सुधाकर 'बामनांची' सिंधूताई त्याचे लाड करतेच कीं नाहीं पाहा ! हिलां म्हणावें बायको ! नाहीं तर आमच्या——"

"सांवळ्या, असली लक्ष्मी लाभायला लेका पूर्वजन्मीं पुण्याईची कमाई करावी लागते ! खरंच ! ह्या सिंधूताईचें कौतुक करावं तितकं थोडंच ! नवऱ्यानें हिला मारली, लाथाडली, निर्दयपणानें छळली, अंगावरील सोनें सुद्धां नाहींसं केलं तरी पण नवऱ्याची कशी तरफदारी करते पाहा ! काय सांगूं गड्या ? सिंधूताई माझी बायको असती तर, मी उद्यांच तुला घरीं नेऊन उंची दारूचा आणि डब्बल टीचा बेत ठरवून मजाच मजा केली असती !" आंवडा गिळीत ग्यानबानें म्हटलें.

श्रीमंगेश थिएटरांत 'एकच प्याला' नाटकाचा प्रयोग पाहण्यांत सांवळ्या आणि ग्यानबा पूर्णपणें रमून गेले होते. पडदा पडून रंगभूमीवर स्तब्धता झाली

कीं हे दोघेही वरच्याप्रमाणें बडबड सुरू करून शांतताभंग करीत होते. मागचे व पुढचे प्रेक्षक यांच्या ह्या अर्थहीन कटकटीला कंटाळून गप्प राहण्याविषयीं ह्यांना खुणावीत होते, पण नाटकांतील आर्यमदिरामंडळांतील मेंबराइतकीच ह्याही जोडीनें ढोंसलेली असल्यानें ते बेपर्वाईनें बडबड करीतच होते.

आज आठ वर्षांनीं ह्या उभयतांची भेट थिएटरांत पिटावरच घडून आली होती. गेल्या आठ वर्षांत घडून आलेल्या घडामोडींविषयीं विस्तारानें बोलणें जरी ह्या गर्दीच्या प्रसंगीं त्यांना शक्य नव्हतें, तरी पण बोलण्याची आतुरता अनावर झाली कीं ते कांहीं तरी बोलून नाटकांत रंगून गेलेल्या प्रेक्षकांचा बेरंग केल्याशिवाय राहातच नसत !

" अरेरे ! काय हा अनर्थ ! एकदम तीन जीवांच्या तीनपरी झाल्या ! मूल मेलं, सिंधु मेली, सुधाकर गेला ! " असें अरे दुःखातिरेकानें रामलालनें म्हटलें व शेवटचा पडदाहि पडला.

प्रेक्षकवर्ग आपआपल्या जाग्यांवरून उठून मोठ्या दरवाजानें बाहेर पडला. धनिक लोक मोटार गाड्यांतून गेले. बाकीच्यांनीं आपल्या पायांचीच गाडी चालू करून घरचा मार्ग धरण्यास सुरवात केली.

ग्यानबा आणि सांवळ्या ह्यांनीं पुन्हां आणखी थोडी घेऊन ते इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत बोलत आपल्या घरीं चालते झाले.

दारूचे दुष्परिणाम पूर्णत्वानें दाखविणारें 'एकच प्याल्या' सारखें परिणामकारक नाटक पाहून त्यांस पिल्याअंतीं आपणांस त्रास करणाऱ्या आपल्या बायकाच काय त्या वाईट, ह्यापलीकडे ह्यांना अन्य बोधच झाला नाहीं हें त्यांच्याच तोंडून निघालेल्या वरील उद्गारांवरून सहजच समजण्यासारखें आहे.

ग्यानबा हा ब्ल्यू ब्रदर्स कंपनींत मार्करचें काम करीत होता. परदेशी फर्ममध्यें ब्ल्यु ब्रदर्सचें स्थान बरेंच वरचें असल्यामुळें ही कंपनी आपल्या नोकरवर्गाला भरपूर पगार देत होती. ग्यानबा हा कंपनीच्या निर्गत होणाऱ्या कापसांच्या गठ्ठ्यांवर बंदरचा मार्क घालणारा कामगार असला तरी त्याला कंपनी दरमहा पन्नास रुपये पगार देत होती. ह्या पगारांत हात संभाळून खर्च करणारा इसम असतां तर त्यानें साधारण पुंजीहि जमविली असती, पण ग्यानबाची गोष्ट मात्र तशी नव्हती. आपला घरखर्च सांभाळून राहिलेल्या दहा पंधरा रुपयांची दारूपायीं उधळपट्टी करून पैशांबरोबरच आपल्या आरोग्याची आणि अब्रूची तो खराबी

करीत होता. एका बायकोशिवाय मायेचें असें दुसरें माणूस त्याला नव्हतें. पण तिचाहि तो ममतेनें सांभाळ करीत नव्हता. बायकोच्या प्रीतीपेक्षां मदिरताईची ममता त्याला जास्त वाटत असल्यानें बायकोनें दारू न घेण्याबद्दल सांगितल्यास तो तें ऐकत तर नव्हताच, पण तिनें पुनः पुन्हां दारूविषयीं गोष्ट काढल्यास तो तिला मारण्यासहि कमी करीत नसे.

बिचारी सगुणा! हिंदु स्त्री!! मूक रुदन करून देवानें दिलेल्या स्थितींतच समाधान मानण्याशिवाय तिला अधिक तें काय करणें शक्य आहे ?

वारंवार सगुणेचें दारु सोडण्याविषयींचें सांगणें ऐकून ग्यानबाला अलीकडे कंटाळा आला होता. 'क्षणभर तुलाच सोडीन पण दारूला मात्र मी जन्मांजन्मांतरीं सोडणार नाहीं असें त्यानें एकदां निश्चयात्मक स्वरांत सांगून टाकल्यानें सगुणेनें या बाबतींत जास्त बोलण्याचें टाळूनच टाकलें होतें.

ग्यानबा हा सांवळ्याचा लंगोटियार मित्र होता. सांवळ्या हा खेडेगांवांतील शेतकरी असला तरी त्याचें विलासी मन शहरी संवयीला सवकलेलें असल्यानें कधीं कधीं नाटकें–सिनेमा पाहण्याची त्याला हौस उत्पन्न होई व अशाच हौसेमुळें तो 'एकच प्याला' पाहण्यासाठीं ग्यानबाच्या गांवीं आला होता. ग्यानबानें मोठ्या प्रेमानें सांवळ्याला आपणाकडे दोन दिवस राहवून घेतलें. ग्यानबाच्या घरांतील थाटमाट, ग्रामोफोन, सायकल, आणि चैनीच्या आणि सुखसोयींच्या वस्तू, त्याचा युरोपियन पद्धतीचा फॅशनेबल पोषाख, याचें अवलोकन केल्यांअंतीं सांवळ्याचें मनहि त्या सुखाला जास्तच आसावलें. ग्यानबाची नोकरी जर आपणाला मिळाली असती, तर आपणाला किती मौजेंत दिवस घालविण्यास सांपडले असते यांचीं सुखस्वप्नें कल्पून तो मनांतल्यामनांत आनंद मानूं लागला.

सांवळ्याच्या मनांतील चलबिचल समजूनच कीं काय ग्यानबानें स्मित हास्यपूर्वक म्हटलें "काय सांवळ्या ? कसं वाटतें तुला आमचं घर ?"

"मजा आहे बुवा तुझी इकडे! चीफ रेंजरपेक्षांहि तुझा भपका मला बरा दिसतो ग्यानबा! बाबा सुख भोगायलाहि नशीब असावं लागतं! नाहीं तर आमच्या चुडामणी शेटला पाहा! लाखाचा आसामी आहे, पण फाटकी पैरण

वापरणार!” सांवळ्याला यापुढें बोलण्यास संधि न देतां ग्यानबानें आपलें पुराण सुरू केलेंच.

“लाखाचा असो किंवा कोटीचाहि असो! पण शेवटीं मरूनच जाणार कीं नाहीं! सुखासाठीं तळमळून दारिद्र्यावस्था भोगून मरण्यापेक्षां सुख भोगून मरणें वाईट नाहीं ना? झालं तर! चार दिवस मजेंत काढायाचे हें आमच्या फूलसाहेबाचें तत्त्व मीं पूर्णपणें आचरणांत आणलें आहे खरें! कोणी म्हणतात ग्यानबाचा हा गाढवपणा आहे! पण मी कुणांला देणं नाहीं ना? संपलं तर! स्वतःच्या हिंमतीनें कमावणार व स्वतःच खाऊन सुखी राहणार!” ह्याप्रकारें ग्यानबानें आपल्या वैभवाचें आणि शहाणपणाचे पाढे वाचलेले ऐकून सांवळ्याच्या तोंडाला पुन्हां पाणी सुटलें व स्नेहपूर्ण अशा विनवणीच्या स्वरांत तो म्हणाला, “ग्यानबा! आहे कां एखादी सुखाची नोकरी तुझ्या लक्षांत? मलाहि पण त्या भिकार शेतकी धंद्याचा पुरा वीटच आला आहे. वाटतें, इकडे यावें आणि तुझ्या संगें मौजेनें दिवस घालवावे!”

सांवळ्याच्या या करुणाजनक याचनेमुळें ग्यानबाला आपल्या अधिकाराची जास्तच जाणीव झाली. जराशा अहंकारी स्वरांत तो म्हणाला, “अरे सांवळ्या, तूं आहेस कुठं! ह्या कंपनींत इकडची काडी तिकडे करायाला एवढा मोठा फूल साहेब सुद्धां ह्या शहाण्याचा सल्ला घेत असतो बरं कां? तुझी इकडे राहण्याची तयारी आहे ना? मग असा घुटमळतोस कां? पाहिजे तेव्हां ये हा ग्यानबा मार्कर तुला चांगली नोकरी देणार ही खात्री बाळग!”

ग्यानबाचें वरील शब्दरूपी आश्वासन ऐकूनच सांवळ्याला अस्मान ठेंगणें वाटूं लागलें. त्यानें मनांतल्या मनांत भावी सौख्यसंसाराचे मनोहर मनोरेहि रचले; आपली अधिकाऱ्याच्या जाग्यावर नेमणुक घेऊन आपण इकडे आल्यावर अगदीं ग्यानबासारखा साहेबी ऐटदार पोषाख करणार, एस् फ्येस् करून इंग्रजी बोलणार, सायकलचा स्वार होणार, तुळतुळीत संन्यासी स्वरूपाची हजामत न करतां विंचरल्यावर वाकडा भांग येण्यास पुरेल अशा बेताचे केंस राखून ठेवणार व सुटीच्या दिवशीं आंखुड खाकी पाटलोण, त्यावर पांढऱ्या ट्वीलची आंखुडच पैरण घालून चामड्याच्या पिंगट पट्ट्याला चकचकित चाकू लावणार व गांवांत ऐटीनें मिरविणार, असे इतक्यांतच त्यानें बेतहि ठरविले.

सांवळ्याचें आतुर अंतःकरण गांवांतील कामाचा पसारा गुंडाळून इकडे येण्यास तयार झालें असल्यामुळें त्याला अर्थातच ग्यानबाच्या घरीं जास्त वेळ राहणें बरें वाटणें शक्यच नव्हतें. म्हणूनच तो पुन्हां लवकरच कायमचा राहण्यास येण्याचें ग्यानबाला आश्वासन देऊन आपल्या घरीं आला. येतांना त्याच्या मनांत भावी संसारांतील सुखाविषयींच कल्पना येत होत्या.

प्रीतिच्या दृष्टीनें पाहणी केल्यास सर्वच रम्य वाटतें, पण असंतोषी नजरेनें कोणत्याहि वस्तूकडे बघितल्यास त्यापासून आनंद तो कसा व्हावा? ग्यानबाचें वैभव अवलोकन केल्यापासून सांवळ्या शेताकडे असंतोष दृष्टीनेंच पहात होता. चूडामणी शेटजींच्या खंडणीचे पंचेचाळीस रुपये फेडल्यावर आपणाला दरमहा पंधरा सुद्धां रुपये राहत नाहींत असा त्यानें हिशेब केला व ह्या कारणामुळें आपलें वर्षभर शेतांत मरणें हें निव्वळ नुकसानकारक आहे, असाच त्यानें स्वतःचा समजहि केला.

कांहीं तरी कुरापत उकरून काढून शेत सोडून नोकरी धरण्याची त्याची इच्छा अनावर झाली होती, म्हणूनच तो पंचेचाळीस वर्षांच्या नेहमींच्या खंडणींत सूट देण्याविषयीं शेटजींकडे प्रश्न काढण्याच्या इराद्यानें आज त्यांजकडे जाणार होता.

रयत आणि धनी यांच्यांत व्यवहारानिमित्त जे कांहीं तंटेबखेडे माजतात त्यांत प्रामुख्यानें धन्यालाच दोष देण्याची बहुजन समाजाची प्रवृत्ति दिसून येते. 'गरिबांचा वाली कोण आहे?' "बिचाऱ्या शेतकऱ्याला सावकारानें लुटला!" असेच उद्गार ह्या तंट्याच्या अखेर लोकांच्या कानीं पडायचे! एखाद्या मासिकांत शेतकरी आणि धनी यांजविषयीं प्रसिद्ध झालेली गोष्ट वाचण्याचे आपण श्रम घेतले तर शेवटीं सावकाराचे अरेरावी वर्तन, निर्दय वागणुक हींच दृष्टोत्पत्तीस आल्यावांचून राहायाचें नाहीं. नेहमीं शेतकरी तितके भोळे, देवाचे अवतार, असेंच बहुतेक गोष्टींतून चित्रित केलेलें आढळून येईल!

आमची ही गोष्ट कांहीं त्याच साच्यांतलि नाहीं.

चूडामणी शेट हे अत्यंत सभ्य व प्रामाणिक धनी होतो. होतां होईतों आपल्या रयतांचीं अंतःकरणें न दुखवितां ते त्यांजकडून काम करून घेत असत.

कर्मळें नांवाचें त्यांचें एक शेत सांवळ्याच्या आजोबांपासून पेरण्याचें काम

ते करीत होते. सांवळ्याच्या आजोबानें कराराप्रमाणें तें आपल्या कारकीर्दींत सांभाळलें व आपल्या मुलाच्या ताब्यांत दिलें. मरतांना हें शेत कधींही न सोडण्याबद्दल त्यानें सुचविल्याप्रमाणें पितृभक्तिमुळें सांवळोबाच्या वडिलांनीं त्याची मशागत अत्युत्तम प्रकारें करून पैसाहि पण भरपूर कमावला. " ह्या शेताची काळजी घेऊन पेरणी केल्यास तुझ्या संसाराचें सोनें होईल. " असें सांगून सांवळ्याच्या वडिलांनीं दिवश्यां चिरंजीवांच्या ताब्यांत मरतेवेळीं कागदपत्र दिले व सांवळ्यानेंहि पण ह्या वेळपर्यंत शेत पेरण्याचें काम चोख रीत्या केलें.

ग्यानबाच्या वैभवाला भुलून सांवळ्यानें शेटजीकडे सुटीची सूचना केली. पण शेटजी ऐकेनात. तेंव्हां तो म्हणाला, " यंदा पावसानें ऐन वेळीं दगा दिला बघा ! चार आणेसुद्धां पीक हातीं आलें नाहीं ! अशा स्थितींत आजच्या मंदावलेल्या दरेंत पंचेचाळीस रुपये द्यावे ते कसे व कोठचे ? "

" नेहमींच्या खंडणीच्या पैशांत मी एका पैचीसुद्धां सूट देणार नाहीं बघ ! मी तुला उपदेशाचे दोन शब्द सांगतों ते ऐक, म्हणजे माझें वर्तन तुला निष्ठुरपणाचें वाटणार नाहीं ! " आपलें बोलणें मन लावून सांवळ्या ऐकत आहे हें समजतांच जरा प्रेमळ स्वरांत शेटजी म्हणाले, " सांवळ्या !

आमचें कर्मळें शेत माझ्या आजोबांच्या कालापासून तुमच्या घराण्याच्या ताब्यांत आहे ! तुझे अजोबा रयत व माझे अजोबा धनी यांच्यामध्यें ज्यावेळीं या शेतजमीनीचा करार झाला त्यावेळीं वीस मणी खंडीचा दर अवघा पंधरा रुपयेच होता. शेताचें पीक सहा मणखंडी असें आढाव्यावरून हिशेबांत धरून आम्हां उभयतांच्या व्यवहारकुशल आजोबांनीं अर्ध्या प्रमाणांत विभागणी करून पंचेचाळीस रुपये खंडणी ठरविली आणि ह्या वेळपर्यंत ती तुझ्या आजोबापासून फरकाविना पाळली गेली हें तूं जाणतच आहेस. सांवळ्या ! मध्यंतरीं भाताचा दर इतका वाढला कीं भिवासारखा कष्टाळू आणि विश्वासु शेतकरी ७५ रुपयांपर्यंत कायमची खंडणी देण्यास तयार झाला पण नफ्याला मोहवश न होतां दर वर्षाला तीस रुपयांची नुकसानी मीं शब्दपालनाप्रीत्यर्थ भोगली ! बाकीच्या सावकारांनीं आपली खंडणी चढविली, शेतकऱ्यांची अदलाबदल केली त्यावेळींकरारांत फरक करणें मला कळत नव्हतें. असा का तुझा समज आहे ? सांवळ्या ! माझ्या म्हाताऱ्याचें म्हणणें तूं ऐकल्यास तुझें कल्याण होईल ! आज भाताचा दर जरी

थोडासा उतरला तरी पुढें दर वाढेल असा अंदाज आहे. तेव्हां भात सांठवून ठेव व तुझ्या सवडीप्रमाणें पंचेचाळीस रुपये दे! यापेक्षां सवलतीची भाषा बोलणें माझ्यानें होत नाहीं!" शेटजी उपरण्याचा पदर सांवरून आंत जाऊं लागले.

आपल्या कांबळीचें टोंक सांवरीत निर्वाणीच्या शब्दांत सांवळ्यानें पुन्हां विचारलें, "सावकार! नाहींच ना सवलत द्यायची तुम्हांला?" सांवळ्यानें हे शब्द रागाच्या आवेशांत उच्चारले आहेत हे न समजण्याइतके शेटजी खुळे नव्हते.

होईल त्या शांत स्वरूपांत शेटजी परतले व हळूच म्हणाले, "सांवळ्या? तुला कोणीं चिथावला आहे कीं काय? तुझ्या मनांत शेत सोडावयाचें नाहीं ना? असल्यास माझी बळजबरी नाहीं! पण दारांत असलेली लक्ष्मी लाथाडून अवदसेला कवटाळूं नकोस! पूर्वीपासून तुझ्या घराण्यांत आणि आमच्या घराण्यांत स्नेहाची सांखळी जुळलेली आहे म्हणून तुझ्याच हितासाठीं शेत न सोडण्याबद्दल मी तुला आग्रहानें सांगत आहें."

शेटजींचा उपदेश सांवळ्याला अर्थातच कडू वाटत होता. तो रागाच्या भरांत म्हणाला, "माहीत आहे आपला उपदेश मला! खंडणींत २० रुपयांची सूट द्यावयाची नसल्यास मी शेताची पेरणी यंदापासूनच बंद करणार आहें हें लक्षांत ठेवा!"

"चलाव! आणखी बोलूं नकोस! राम्या! बेमुर्वत सांवळ्याला हाकलून लाव!" धन्याचा हूकूम नोकरांनीं पाळण्यापूर्वीं समजूतदार सांवळ्यानें पळ काढला.

सांवळ्याला जें हवें होतें तेंच लाभलें. त्याला आनंद झाला. आतां आपण ग्यानबाच्या गांवीं जाऊन सुख आणि चैन यांचा उपभोग घेणार, ह्याच आशा-बलावर त्यानें भराभर घरचा रस्ता धरला.

घरीं शेटजींचें शेत सोडल्याची—त्याच्या मतें—खुष खबर सांवळ्यानें आपल्या बायकोला सांगितली.

इतका काळपर्यंत ज्या शेताच्या पेरणीनें सासरचें पोषण झालें तें शेत सोडण्याची दुर्बुद्धि नवऱ्यानें केल्याबद्दल त्याच्या बायकोचें हृदय दुःखव्याप्त झालें. ती आपल्या घरधन्याची पूर्ववत् शेत ताब्यांत घेण्याबद्दल मनधरणी करूं लागली.

पण ग्यानबाच्या लटक्या श्रीमन्ती वैभवास भाळून अंध झालेल्या अविचारी सांवळ्यास आपल्या सौभाग्यवतीचा सुबोध हितकारक कसा वाटणार ?

त्यानें शेतीपेक्षा ग्यानबाच्या गांवीं नोकरी केल्यानें सुख कसें मिळतें, याचें भ्रामक कल्पना चित्र रेखाटलें व त्याची भोळी पत्नी नवऱ्याच्या बाता ऐकून थंड राहिली.

दुसऱ्या दिवशीं सांवळ्या ग्यानबाच्या गांवीं गेला. ग्यानबानें त्याला वचन दिल्याप्रमाणें पंचवीस रुपये मिळणारी शिपायाची नोकरी दिली. आपलें आतां छानदार बस्तान बसलें आहे, ह्या समजांतच सांवळ्या आनंदीत झाला. पण दरमहा येणारा नक्की अवश्यक खर्च लक्षांत घेतांच त्याला या सुंदर शहरांतील खर्चाचें भयच वाटूं लागलें.

सकाळीं चहा, दुपारीं व रात्रौ साधींच दोन जेवणें व झोंपतेवेळीं थोडीशी, ह्याच नेहमींच्या गोष्टी सांभाळतांना त्यास नाकींनऊ येऊं लागले. मग बायकोला काय पाठवावें हा एक प्रश्न त्याला मधूनमधून जाच देऊं लागल्यास त्यांत आश्चर्य तें कसलें ?

दोनतीन महिनेपर्यंत बायकोला त्यानें एक पै सुद्धां पाठविली नाहीं. विचारी कुठें तरी खपून दोन घास मिळवीत होती.

ग्यानबाच्या संगतीनें नको असलेलीं व्यसनें आपल्या अंगवळणीं लावून घेऊन सांवळ्यानें आपलें पिळदार शरीर नाहींसें करून टाकलें होतें.

मध्यंतरीं औद्योगिक ओहोटीची वावटळ ब्यु कंपनीलाहि बाधली, व धोरणी फुल साहेबांनीं नव्या कामगारवर्गाला घरीं जाण्याबद्दल विनंति केली. बिचारा सावळ्या ! त्याची नोकरी गेली होती. हातांत शिल्लक तर नव्हतीच; पण दारू-वाल्यापासून दाढी करणाऱ्या हजामापर्यंत त्यानें कर्ज मात्र वाढविलें होतें. अशा स्थितींत त्यानें आपल्या घरचा रस्ता धरावा तरी कसा ?

ग्यानबाला आपली ह्या गांवांतून सोडवणूक करण्याबद्दल त्यानें कित्येकदां विनविलें असेल; पण आपलेंच कर्ज आपणाला फेडतां येत नाहीं ही खरी तक्रार तो करूं लागल्यानें सांवळ्या गलितधैर्य बनला.

आतां येथून शक्य तितक्या लवकर पाय काढल्यास कदाचित चुडामणी शेटकडून पुन्हां शेत ताब्यांत घेतां येईल, हा मनांत उद्भवलेला आशांकुरही येथून

जाण्यास साधत नसल्यानें नाहींसा होत होता. ह्या निराशावादी वातावरणानें त्याची तब्बेत जास्तच बिघडली व त्यानें अंथरूण धरलें.

गरीब सांवळ्याला आतां कोण पावणार ? ग्यानबाला आपलाच खर्च झेंपत नव्हता. अशा स्थितींतच रात्रौ कुणाला सुद्धां न सांगतां तो आपल्या मातृ-भूमीकडे आला. हळूहळू आपल्या घराकडे येतांना उजव्याबाजूनें दिसणाऱ्या कर्मळ्या शेतीकडे त्यानें अतृप्त दृष्टीनें बघितलें व तो समाधानपूर्वक पुढें पाऊल टाकूं लागला.

शेतांत शेतकरी एकहि नव्हता. पण शेत मात्र पूर्वीपेक्षांहि सुस्थितींत असलेलें दिसत होतें. तो आपल्या झोंपडीकडे पोंचला. त्यान मातीच्या तांब्यांतून पाणी भरून आपले पाय धुतले व तो हळूच चोरट्या पावलांनीं आंतील बाजूच्या खोलींत गेला.

त्याची बायको आजारी अवस्थेंत अंथरुणावर पडली होती.

त्यानें स्नेहभरानें तिची विचारपूस केल्यावर गेल्या पंधरवड्यापासून ती तापानें तडफडत असल्याचें तिनें क्षीण स्वरांतकथन केलें.

त्यानें घरांतील धान्यसंग्रहांत ठेवणारीं भांडीं पाहिलीं. तीं रिकामीं झालेलीं होतीं. त्यानें भाताचा घडा पाहिला; त्यांत एक दाणाहि नव्हता. तो गलितधैर्य स्थितींतच शेजाऱ्याकडे चार आणे उसनवार मागायाला गेला. स्वतःच्या वडिलो-पार्जित धंद्याचा त्याग करून इतरत्र लटक्या सौख्याच्या पाठीं धांव घेणाऱ्या कर्त-व्यच्युत सांवळ्याला शेजाऱ्यानें पैसुद्धां दिली नाहीं. उलट, त्याच्या बायकोची हेळसांड केल्याबद्दल कानउघाडणीच केली ! सांवळ्या तशा भग्नहृदय अवस्थेंतच चूडामणी शेटजींच्या घराकडे गेला. त्यावेळीं शेटजी डाळिंबाच्या झाडांना स्वतः पाणी घालीत होते.

सांवळ्याला बोलण्यास शेटजी कांहीं दोन तासपर्यंत सांपडले नाहींत.

सुमारें दुपारच्या भरप्रहरीं शेटजी विसाव्यासाठीं आपल्या बैठकीकडे आले. सांवळ्या मान खालीं घालून अलीकडे आला. त्यानें दोन्ही हात जोडून करुणा-पूरित कंठानें शेटजींची मनधरणी केली, " सावकार, कर्मळ्याची पेरणी मी करतों. झाल्याचुकीबद्दल माफी असावी. आतां मला शेतींतील खरें सुख समजलें!"

" अरे सांवळ्या ! वेड्यासारखें हें काय करतोस ! "

" सावकार ! हा गांव सोडल्यानें खरोखरच मी वेडा झालों आहें. ही माझी दशा पाहा. कारभारीण घरीं आजारी आहे. घरांत अन्नाचा कणसुद्धां नाहीं !" इतकें म्हणून त्यानें आपली नोकरीची वगैरे एकंदर हकीकत सांगितली.

शेटजी म्हणाले, " सांवळ्या आतां तुला शेतकीव्यवसायांतील खरें आनंदी जीविन कळलें असें तूं म्हणालास तसेंच मलाहि पण ह्या उच्च धंद्यांतील मर्म समजून आतां मी स्वतः शेती धंद्याला वाहून घेतलें आहें. तूं गेल्यानंतर एकादोघा रयतांकडे कर्मळ्याची पेरणी करण्याबद्दल विचारणी केली. पण त्यांची ती बेपरवाईची भाषा ऐकून मीं स्वतःच शेती सुरू केली, आणि कर्मळेंच नव्हें तर एकंदर जमीन पेरणें, झाडें लावणें हें काम मी माझ्या आप्तस्वकीयांच्या साह्यानें करीत आहें व ह्यांत मला यशहि लाभत आहे. तूं मदांध झालास त्याचें प्रायश्चित्त तुला यथायोग्य मिळालें. पण तुझ्या अविचारी वागणुकीमुळें मला माझी स्थिति विचारपूर्वक सुधारून ह्या धंद्यांतील यश, आनंद व फायदा लाभला म्हणून ही माझी आठवण मी तुला देत आहें—" असें म्हणून शेटजींनीं त्याला एक पांच रुपयांची नोट व ५।६ डाळिंबें दिलीं.

दुःखातिरेकानें सांवळ्याचें डोकें भणाणलें होतें. तशाच स्थितींत तो दवाखान्यांत गेला व त्यानें औषध घेतलें व घरचा मार्ग धरला. हातांत साडेचार रुपये शिल्लक होते. त्याला नेहमींची आठवण झाली म्हणून तो गुत्तेवाल्याकडून थोडीशी घेऊन घराकडे गेला.

त्याची बायको त्यावेळीं मरून पडलेली होती ! शेजाऱ्यांनीं अनेक उपचार केल्यानेंसुद्धां गुण न मिळाल्याचें त्याला सांगितलें. आपण शेती सोडून बायकोची हेळसांड केल्यानें ती मरून गेली, ही त्याच्या हृदयाला झालेली जखम विवेकी विचारांनीं सुद्धां भरून येणें शक्यच नव्हतें !



# जयाजीराव आणि कमळजा

## अर्थात्

## कट फिसकटला !

लेखक—किरात.

## अंक १ ला.



### प्रवेश १ ला

[ पिलाजीराव व जयाजीराव बोलत आहेत. ]

**पिलाजी**—बस्स, आतां एक चकार शब्दसुद्धां काढूं नकोस. मी कांहीं एक ऐकणार नाहीं. ऊठ इथून, अगदीं मुकाट्यानं चालता हो.

**जयाजी**—काय? माझं कांहीं एक ऐकणार नाहीं म्हणतां? छेः असं नाहीं होणार! माझी सगळी हकीगत ऐकाल तर मग नाहीं तुम्हीं असं म्हणणार. अहो मामासाहेब, असे गरम नका होऊं. तुम्हांला वाटतं आहे इतका हा जयाजी अधम नाहीं. जरा शांत व्हा. असं रागाला नका चढूं. काय? माझ्याकडून असा अपराध तरी काय घडला आहे आपला? कां नाहीं माझं बोलणं ऐकून घेत म्हणतां? काय–बोला कीं, काय घडलं आहे असं माझ्या हातून?

**पिलाजी**—काय घडलं आहे माझ्या हातून! अरे चोरा, दरोडा घालायचा

घालून आणि काय घडलं आहे माझ्या हातून म्हणून विचारतोस? माझ्या इथं दिवसा ढवळ्या दरोडा नाहीं घातलास तूं?

**जयाजी**—हं:! काय चमत्कारिक अहा हो तुम्ही? ज्याला स्वभावतःच लांड्या लबाडींची चिरड, आणि एखादा क्षुल्लक अन्याय देखील ज्याला खपायचा नाहीं त्याला हे असले शब्द! छेः मीच चुकलों. ज्याच्या अंतःकरणांत एवढासा देखील मायेचा लेश नाहीं, तिथं उगीच ऊरफोड करून काय उपयोग? काय म्हणतां तुम्हीं? मीं तुमच्या घरावर दिवसा ढवळ्या दरवडा घातला?

**पिलाजी**—हो हो! दिवसा ढवळ्या दरवडा घातलास, आमच्या अब्रूवर आणि लौकिकावर! दरवडा घालून मला सर्वस्वीं नागिवलंस! अरे व्यापारांत बुडवलंस पहिल्यानें. ज्या वेळेस तूं वेणीपुरांत आलास तेव्हां तूं मोठा सद्गुणी, इमानी सुस्वभावी व होतकरू आहेस, असं समजून मीं आपण होऊन तुला आपल्या इथं राहण्याविषयीं आग्रह केला; तुला ठेवून घेतलं; तुझी योग्य बडदास्त ठेवली; माझं सारं घरदार, माझे सारे नोकरचाकर, तुझ्या आज्ञेप्रमाणें वागले; इतकंच नव्हे पण माझी सारी जिनगी, माझी संपत्ति, आणि माझा मी देखील अगदीं तुझा झालों होतों. माझ्या साऱ्या कळवळ्याचा काय तो तूं असं समजून मी तुझ्याशीं वागलों. तुझ्यावर सारा विश्वास टाकला; माझे सारे प्राण तुझ्या हातांत दिले आणि हें सगळं मीं कां केलं? तर तुझ्यांत अलौकिक गुणांचे कांहीं अंकुर दिसले म्हणून! असं असून तूं या सगळ्यांची फेड, दगलबाजीनं—विश्वासघातानं माझ्या एकुलत्या एक पोरीला—माझ्या प्राणाला—फुस लाऊन फसवून नेऊन केलीस! तेव्हां काय म्हणावं या तुझ्या अधमपणाला? अरे, कमळजा म्हणजे माझा प्राण होतारे प्राण!

**जयाजी**—आणि मी होतों म्हणूनच तो आपला प्राण वांचला म्हणून समजा. नाहीं तर ज्या वेळेला मोती बागेंतल्या बंगल्याला आग लागून सगळी इमारत जळून खाक झाली—कां आहे कीं नाहीं आठवण? पांच वर्षे झालीं या गोष्टीला, आपण सगळे जण मोतीबागेंत राहिलों होतों, तेव्हां सगळ्या वाड्याला आग लागली. कमळजा वरच्या दालनांत निजली होती. आपल्याला उठवून बागेंत आणून उभं केलं, आणि "माझी कमळजा! माझी कमळजा!! तिला कोणी तरी वांचवा हो," म्हणून आपण आकाश पाताळ अगदीं एक

करून दिलंत. कां त्यावेळची कांहीं आहे कां आठवण ? वर जायला एकाचीहि छाती होईना ! तेव्हां याच जयाजीनं तशा आगींत आपल्याला घालून घेऊन तुमच्या प्राणाला–तुमच्या कमळजेला आपल्या जीवाची बिलकुल पर्वा न करितां तुमच्याकडे अगदीं सुरक्षितपणानं आणून पोंचविलीन. थोडक्यांत चुकलं, त्या दिवशीं आणखी एक पळ कां जात होतं म्हणजे ती कडाडलेली माडी आमच्या अंगावर कोसळून आम्ही दोघंहि तिथच्या तिथंच ठार व्हायचीं ! पण पुढें हे असे योगायोग अन् लागेबांधे होते, म्हणूनच त्यांतून आम्ही दोघं निभावलों !

**पिलाजी**—एवढ्यावरून तूं तिला फुस लावून चोरासारखी अगदीं भररात्रीं माझ्या घरांतून काढून नेलीस हें कांहीं खोटं होत नाहीं. चोरा ! अरे, माझ्या प्राणाला पळिवलसरे तूं! अन् ती कारटीहि पण मला सोडून तुझा हात धरून गेली तुमचं कल्याण नाहीं व्हायचं कधीं ! माझ्या सुखांत जसं तूं विष कालविलंस, तसं तुझ्या सुखांतहि तो परमेश्वर विष कालवील एवढं पक्कं लक्षांत ठेव ! तो कधीं नाहीं तुझं बरं करणार ! चोरा, तिला पळवून मला तूं नुसतं निसंतान केलंस, पण साऱ्या जन्मभर तुला मुलबाळ न होतां, ‘ पोर पोर ’ म्हणून तुला वळवळावं लागेलरे ! तूं काय समजला आहेस ? ह्या पिलाजीरावाचा हा अभिश्राप खोटा नाहीं व्हायचा कधीं.

**जयाजी**—मामासाहेब, आपला अर्धा अधिक अभिश्राप तर यापूर्वींच खोटा झाला आहे. तीन वर्षें झालीं तो खोटा झाल्याला. कारण परमेश्वराच्या कृपेनं आपल्याला नातू झाला असून तो थेट आपल्या आजोळच्या वळणावर आहे ! मात्र जगून वांचून जर तो राहिला, तर पुढंमागं तो माझ्यासारखा फुटक्या नशिबाचा अथवा आपल्या आजासारखा फत्तरफोड अंतःकरणाचा मात्र न होवो, एवढंच मी मागतों त्या परमेश्वराजवळ. आणि आपल्या अभिश्रापानं जर त्याचं कांहीं बरंवाईट झालं—

**पिलाजी**—वाईट कशाला ? बरंच होऊं दे. जगूं दे त्याला जगूं दे ! न्याहारीला भाकरी नाहीं म्हणून “ भाकरी भाकरी ! ” म्हणून एकसारखा भुकेनें ओरडून, आक्रोश करून तो एकच हलकल्लोळ करून, तुझं डोकं अगदीं भणभणून टाकायला आणि आपली कपाळकरंटी आई घरांत कांहीं नाहीं म्हणून एकसारखी ठुसठुस रडते आहे, हें पाह्याला जगूं दे तो पोर !

**जयाजी**—आणि असं झालं म्हणजे आपल्याला फार आनंद आणि समाधान होईल नाहीं ?

**पिलाजी**—खरोखर, मल्हारीची शपथ घेऊन सांगतों, कीं असं जर झालं तर मला फारच समाधान होईल.

**जयाजी**—हें ऐकायला मी जगलों, त्यापेक्षां मेलों असतों तरी बरं होतं.

**पिलाजी**—आणि तुझ्या बरोबर तीहि ! कारण ती जगल्यामुळें, नाहींतर मला तुझ्यासारख्या अधमाची आठवण कशाला झाली असती ! अरे, अरे, अरे ! यापूर्वी एक वेळ मी कितीतरी सुखांत होतो !

**जयाजी**—मामासाहेब, कमळजेवर माझं अत्यंत प्रेम आहे, हें समजून बोलतां कां तुम्ही हें सारं मला ? तुम्ही म्हणतां असा मी गळेकापू, चोर, अथवा दरवडेखोर असतों, तर तिला फसवून तिचाहि पण केव्हांच गळा कापून मोकळा झालों असतों !

**पिलाजी**—काय छाती लागली आहे तुझी असं करायची ?

**जयाजी**—खरोखर, नाहींच माझी इतकी छाती. असलं नीच कर्म ही इथली अंतर्देवी ( छातीकडे हात नेतो ) मला कध्धीं नाहीं करूं देणार ! चार वर्षे झालीं आपण हिला त्या राणोजी शिर्क्याला देऊं केलीत. आपण आग्रह धरलांत, तेव्हां आमचा नाइलाज झाला. कांतिपुरास गेल्यावर तिथं माझ्या आजोळीं आमचं लग्न झालं त्या दिवसापासून कमळजेला मी वेणूपूरच्या सरसुभ्यांची मुलगी आहे, हें लक्षांत धरून वागवीत आलों. तिच्या सतरा पिढ्यांना दारिद्य हा शब्द माहीत नाहीं, हें मला पक्कं ठाऊक आहे. आणि म्हणूनच आपली गरीबी तिला मी आजपर्यंत कशी ती एका शब्दानं देखिल दाखविली नाहीं. आणि हें सारं मी आपल्या मिळकतींतून करीत गेलों. आतां मीं हें असं कां केलं, हा एक प्रश्न आहे. पण याला उत्तर येवढंच तिच्यावर माझं निष्कपट प्रेम आहे म्हणून ! न हून पिलाजीराव सरसुभ्यांची ती मुलगी; त्यांच्या मागं त्यांच्या जिनगानीची तीच वारसदार होणार, म्हणून नव्हें ! समजलांत ?

**पिलाजी**—बस्स, पुरे कर आपलं हें चऱ्हाट !

**जयाजी**—संपलं, हें इथंच संपलं माझं चऱ्हाट. येतों तर मी. हा आतां शेवटचाच रामराम माझा ! यापुढं सगळ्या सुखाला मुकलों मी. रस्त्यानं भीक

मागत फिरणारे ते भिकारी सुद्धां माझ्यापेक्षां कितीतरी पटीनं सुखी! तिला फार आशा होती कीं, तिला क्षमा होऊन तुमच्याकडून एखादा ममतेचा शब्द ऐकायला सांपडेल! आणि एवढ्या आशेवरच तिनंही चार पांच वर्षं काढलींन! पैशाची मला एक काडीभर देखील नाहीं गुमान! पण तिला दुःख झालेलं पाहून मला फार वाईट वाटतं! तिच्याशीं वाटेल तितक्या दारिद्र्यांत मीं मोठ्या सुखानं आणि आनंदानं राहीन. मला ती श्रीमंतीहि नको आणि त्या श्रीमंतीचा तो बेगडी बडेजावहि पण नको!

**पिलाजी**—खरंच, तुझ्यासारख्या भिकारड्यानं व्यर्थ श्रीमंतीचा डौल आणि आव कां घालावा? आपल्या स्थितीप्रमाणं राह्याला शीक जा. एखादं खेडं पहा—अन् तिथं एखादी केंबळाची झोंपडी बांधा—अन् जा, घालून द्या तिथं आपल्याला! तूं अन् ती तिथं राहून भिक्षा मागा अन् घाला त्या कारख्याला खायला! चल, हो चालता इथून. माझ्या पुढं एक क्षणभर दिखील नको उभा राहूंस. कां अजून कां उभा माझ्या पुढं? चल हो चालता. कर एकदां इथून आपलं तोंड काळं. अथवा मीच जातों इथून. म्हणजे मग आपणच जाशील तूं इथून निघून!

( जातो ).

**जयाजी**—खरंच, ही माझी मनोदेवता जर मला आपली संमति देईल—तर मी आपल्या जन्मभूमीच्या ठिकाणीं जाईन पण तिथं नुसतं जाणं म्हटलं म्हणजेच अगोदर डोक्यांत भयंकर विचारांचं एकच काहूर उठून जातं! कर्जदार माझ्या दरवाजाशीं घिरट्या घालीत असतील! माझ्या दारांना त्यांचीं कुलपंहि पडलीं असतील कदाचित्! माझ्या गळ्याला फांस लावायला ते तिथं अगदीं तयार असतील! मी केव्हां येतों आणि त्यांच्या हातीं केव्हां पडतों, असं त्यांना होऊन गेलं असेल! तिथं जाऊन त्यांना मी काय देऊं? तिच्या अंगावरच्या दोन दागिन्याशिवाय दांतावर मारायला एक कवडी देखील नाहीं माझ्याजवळ! नसेना, काय करायची आहे ती मला, आतां? जोंपर्यंत त्या कमलाक्षीच्या प्रेमपाशांत मी बांधला गेलों आहे तोंपर्यंत मला कसली देखील पर्वा नाहीं. तिच्यापुढं मला सगळं जग तुच्छ आहे आज! यापुढं मला चैनीनं आणि भपक्यानं जरी राहतां आलं नाहीं, तरी तिच्यासह अशा स्थितींत देखील

मी सारा जन्म मोठ्या आनंदानं घालवीन. अरे, अरे ! पण तिला दारिद्र्याचं वारं लागू द्यायचं, आपण भिकारी आहों हें तिला कळवायचं, ही कल्पना सुद्धां मला मोठी मानहानीची आणि कशीशीच वाटते !

( इतक्यांत सयाजीराव येतो. )

**सयाजी**—( स्वगत ) हा यावेळीं अगदीं उदासीन कां बरं दिसतो आहे ? अन् मी इथं आल्याचं सुद्धां याच्या लक्षांत आलं नाहीं ? ( पुढें जाऊन ) जयाजीराव ! आज तूं असा उदास आणि खिन्न कां दिसतोस ? माझ्याशीं एक चकार शब्द देखील नाहीं बोलवत आज तुझ्याच्यानं, हें कसं काय ?

**जयाजी**—कोण ? सयाजीराव ! तुम्हीं केव्हां आलांत ?

**सयाजी**—एकून मी आल्याचं आपल्याला दिसलं देखील नाहीं वाटतं ? कां आज आपण इतक्या कसल्या विचारांत गढून गेला आहांत ? आणि असे उद्विग्न कां ?

**जयाजी**—कांहीं नाहीं, माझ्या डोक्यांत असा एक आपला सहज विचार आला, कीं या जगांत नेकी आणि प्रामाणिकपणा ह्या दोन गुणांना सद्‌गुण मानून त्यांची इतकी बडेजाव केलेली आढळते, ती कां ?

**सयाजी**—कां म्हणून काय विचारतोस ? अरे, लुच्चेगिरीला—आपला करडा अंमल नकोच आणि प्रामाणिकपणाचं स्वरूप घेतल्याशिवाय चांगल्या रीतीनं चालवायलाच येईनासा झाला आणि म्हणूनच या दोहींचं जगांत इतकं स्तोम माजलं ! नेकीचे लोक व प्रामाणिक लोक हे लुच्चे लोकांना लपायला पडदे आहेत, म्हणाना ! ह्या पडद्यांच्या आड यांना वाटेल तें करण्याची मुभा असते. आणि हें असं आहे म्हणूनच बरं आहे. हें पहा, या जगांत जर साराच लुच्चांचा आणि सोद्यांचा बाजार असता, तर सगळ्यांनाच उपाशी मरण्याची पाळी येती ! वकीलांचा धंदा बसता; मग ठक गळेकापूंच्या मुठी कोण भरणार ? कारण जो तो आपण होऊनच मग आपल्या भाऊबंदांचा अथवा चाहील त्याचा खून पडता. कारण खून करणाऱ्याला फाशी विशीची जर भीति नाहीं तर मग दुसऱ्याच्या मुठी दाबत बसण्याची आणि दुसऱ्याचीं नसतीं आर्जवें करण्याची यातायात करतो कोण ? अरे, प्रामाणिकपणा म्हणजे ही एक केवळ भूल आहे भूल. आणि ही जी शोधून काढली ती तरी केवळ लुच्चे लोकांच

चांगलं चालावं आणि त्यांच्यापेक्षां जर कोणी जास्त शाहणे जन्मले तर तेही त्यांच्या पूर्णपणें कह्यांत यावेत, एवढयाच करितां हिला–ह्या अजब भूलीला–या अज्जब ब्रह्मदेवांनीं निर्माण केली !

**जयाजी**—तर मग हा प्रामाणिकपणा अन् ही नेकी केवळ एक भूल, भास, अथवा अंधुक व अस्पष्ट अशी डोक्यांत येणारी एक कल्पना आहे, असंच कीं नाहीं तुमचं म्हणणं !

**सयाजी**—बस्स, अगदीं असंच. अहो, तुम्हीं असं पहा–शहाणपण अथवा अक्कल म्हणजे काय पदार्थ आहे हो ? याची कुणाला व्याख्या करितां येईल कां ? छत् कधींच नाहीं यायची ती ! पण हें पहा, जोआपल्या जवळ ती जास्ती आहे अशी घमेंडी मारतो, त्याच्याजवळ वास्तविक पाहतां बहुधा ती क्वचितच असते ! अन् या नेकीच्या आणि या प्रामाणिकपणाच्या संबंधानंहि असंच ! सध्यां त्या सद्‌गुणाच्या अगदीं चिरफळ्या चिरफळ्या उडून गेल्या आहेत. तेव्हां त्याबद्दल आपण मुळीं विचारच न केलेला बरा !

**जयाजी**—ते कांहीं असो; पण सयाजीराव, तुम्ही मात्र मोठे प्रामाणिक आणि नेकीचे आहां, अशाबद्दल साऱ्या वेणुपूरभर तुमची ख्याति आहे.

**सयाजी**—तूं म्हणतोस तसा लोकांचा समज आहे खरा माझ्याविषयीं ! पण जयाजी, लोक चुकताहेत ते इथंच ! त्यांच्याप्रमाणेंच मीहि एक दगलबाज आणि लुच्चाच मनुष्य आहें !

**जयाजी**—तें कसं बोवा ! तुम्हीं कसे दगलबाज आणि लुच्चे ? कोणाचं कर्ज काढलंत तर तुम्हीं तें वेळच्या वेळीं फेडतां; कोणाशीं कांहीं लबाडी, अथवा चोरी चहाडी करीत नाहीं, अथवा एकाद्याला लुटण्याच्या हेतूनं अथवा त्याचा अधिकार उपटण्याच्या हेतूनं आपल्या कमरेचा सुरा काढून कोणाच्या गळ्यावरहि ठेवीत नाहीं; अथवा आपल्या सोबत्याशीं दगलबाजी करून त्यांनाही कुठं तोंडघशीं देत नाहीं; अथवा आपल्या वरिष्ठांची, हांजी हांजीहि करीत नाहीं किंवा त्यांच्यांशीं तोंडपुजेपणाहि करीत नाहीं.

**सयाजी**—अशी जरी माझी वागणूक आहे तरी तेवढयानं मी दगलबाज आणि नीच नाहीं असं नाहीं होत.

**जयाजी**—( साश्चर्य ) काय ? तुम्हीं नीच अन् दगलबाज ?

**सयाजी**—हो हो, महा नीच आणि मोठा दगलबाज ! आणि असा नसतों तर मीं वेणुपूरच्या नागरिकांचे हे हाल—हे कुतरहाल कां पाहिले असते ? माझ्या-मध्यें माणुसकीचा एवढासा देखील गंध नाहीं आणि म्हणूनच सध्यांच्या अधि-काऱ्यांचें हें अरेरावी वर्तन, हे डावपेंच, हे लपंडाव, हा दिखाऊ न्याय, आणि ही वरवर दिसणारी यांची ही लुच्चेगिरीची कळकळ पाहून मी स्वस्थ बसतों ? हा स्वातंत्र्याचा भपका केवळ डोळ्यांत धूळ टाकण्याकरितां ! हे म्हणतात जोंपर्यंत आम्ही आहों तोंपर्यंत गुलामगिरीचं तुम्हांला वारं सुद्धां लागायचं नाहीं, कीं तुमच्या हाताला बेड्यांचा अथवा शृंखलांचा स्पर्शहि व्हायचा नाहीं ! पण काय ! ज्यांची ते खुशामत करतात, ज्यांच्यांशीं ते गोड गोड बोलतात, त्यांच्याच हातांत ते जबरदस्त लंघर अडकवितात, त्यांना घोर संकटांत घालून आणि पेंचांत आणून त्यांच्या तोंडाला यथेच्छ काळिमा फांसतात, दिशाभूल होऊन आम्ही दाणकन् खडकावर आदळून आमच्या भिंगऱ्या भिंगऱ्या उडून आमचा नायनाट व्हावा ही त्यांची इच्छा ! व राजकारस्थानांत सुद्धां हेच कावे आणि हेच डावपेंच ! आणि असे जे जे कावेबाज, ते ते सारे दगलबाज आणि पुरे बदमाष. आणि मीहि त्यांच्यांतलाच एक ! कारण हे घरभेदे आमच्या सर्वांच्या नाशाला कारण होऊन आम्हांला बंदे गुलाम करण्याकरितां, डोळ्यांदेखत बेधडक आमचे धुरीण म्हणवून आमचे गळे कापतात ! हें मी बघतों तरी देखलि कांहीं एक हालचाल न करितां मी अगदीं सुस्त पडून राहतों. त्या अर्थीं मी त्यांच्यासारखा दगलबाज व बदमाष नव्हें तर काय !

**जयाजी**—मला असं वाटतं कीं सद्गुण आणि अब्रू यांचा कांहीं बचाव नाहीं व्हायचा इथं आतां ! आणि हें पहा या वेणुपुरासारख्या दरिद्री शहरांत राहण्याचं आपल्याला तुझ्याप्रमाणंच मोठंच संकट वाटतं ! लोकहितावर घाड घालायला जो तो टपलेला. जसा काय लोकहिताविरुद्ध सगळ्यांनींच कट केलेला आहे ! मर्दांनीं मर मर मरावं, आणि या चोरांनीं आपला यथेच्छ सुळसुळाट माजवून हवा तसा हात मारावा !

**सयाजी**—आपण आतां सुरक्षितपणा, एकी आणि शांतता यांना पुरे पारखी झालों. कारण सार्वत्रिक हिताचा जो पाया तो केव्हांच ढांसळला. आपली न्यायदेवता लंगडी आणि आंधळी झाली ! कायद्याची अम्मलबजावणी करणाऱ्या

संस्था म्हणजे जुलमाचीं व छळणुकीचीं निवळ यंत्रें ! आम्हांला आजच्यापेक्षां उद्यां जास्त कसं करकचून टाकावं, हाच कायद्याचा मुख्य हेतु बनून राहिला आहे ! ही जी सगळी घडी बिघडली आहे, ही पुन्हां नीट बसवायला जर कोणी तयार असेल तर मात्र मग तुम्हांला असं दुःखी राहण्याचं कारण उरणार नाहीं. जयाजीराव ! तुमच्या तोंडाकडे बघवत सुद्धां नाहीं हो ! त्या चढेल पिलाजीरावाला भूतदया कशाशीं खातात हें चांगलं नीट पढवून शिकविलं पाहिजे, म्हणजेच तुझ्यासारख्याची योग्यता त्याला कळली तर कळेल ! मला तुला कांहीं सांगायचं आहे. पण छाती होत नाहीं माझी. पण काय सांगू, या घटकेला माझ्या काळजाचं पाणी पाणी होत आहे !

**जयाजी**—बोल, बोल, तुझ्या अंतःकरणांत जें कांहीं घोळत आहे तें बोल. मग तें किती कां अनिष्ट असेना. आणि तेंहि माझ्या संबंधाचं असलं तरी देखील फिकीर नाहीं. तुझ्या दुःखाचा मला भागीदार होऊं दे. कारण माझा अवतारच दुःखाकरितां आहे. त्यामुळें तुझं दुःख कदाचित् हलकं झालं तर होईल. सांग तर एकदां काय आहे तें.

**सयाजी**—लवकरच येईल तें तुझ्या कानावर.

**जयाजी**—तर मग तुझ्याचकडून येऊं दे तें. कारण तुझ्या मित्रत्वांत असा कांहीं अजब गुण आहे, कीं त्यामुळें अत्यंत दुःखाची गोष्ट देखील केवळ तुझ्या-कडून ऐकली कीं मोठी गोड आणि मनोहर लागते त्यामुळें माझ्या निश्चयाला बळकटी येते, आणि स्वतःच्या घातपाताची, नाशाची, अथवा नागिवलं जाण्याची मला बिलकुल भीति वाटेनाशी होते.

**सयाजी**—तर मग, आपला आज सर्वस्वीं नाश झाला अस समजा !

**जयाजी**—आजच काय तो यापूर्वी कधींच होऊन चुकला आहे ! माझी आणि दुर्दैवाची आजचीच काय फारा दिवसांची गट्टी आहे !

**सयाजी**—( सद्गदित कंठानें ) जयाजीराव ! काय सांगू ? हा आत्तां मी तुझ्या घरावरून आलों. पण काय ! तिथं सगळ्या लुच्चांचा अन् हरामखोरांचा बाजार ! तुझ्या दरवाजाशीं सरकारी शिपायांचा पाहरा बसला आहे. आणि सगळ्यांनीं सर्वत्राचा नाश करायचा जसा कांहीं मक्ताच घेतला आहे ! मीं तिथं विचारलं तेव्हां मला त्यांनीं सांगितलं कीं तुझी सारी चीजवस्त आणि जमीन-जुमला जप्त करून टाकण्याबद्दल कायदेशीर हुकूम सुटले आहेत. इतकंच नव्हें,

तर त्या हुकूमांवर खुद्द पिलाजीराव सरसुभ्यांचे सहीशिक्के आहेत ! एकीकडे मोठमोठ्या बशा, प्याले, आणि दुसरं बिलोरी सामान या सगळ्यांचा लिलांव करण्याकरितां एक ढीग रचला होता. आणि त्याच्याजवळ मोठ्या क्रूर आणि दुष्ट मुद्रेचा एक रामोशी उभा राहिला होता. दुसरा एक पाजी, नीचपणानं हंसत हंसत तुझी नालस्ती आणि थट्टा मस्करी करीत; तोंडास येईल तें भकत होता. यानंच तुझे वाडिलोपार्जित अगदीं पिढ्यानपिढ्याचे दागिने, सोन्यानें मढविलेली शामदानं, झुंबरं आणि इतर मौल्यवान चीजवस्त, सगळी आपलीशी केली. इतकंच नव्हे, पण कमळजेचा आणि तुझा तो पवित्र बिछाना-जो तुझ्या आनंदाचं स्थान-तोसुद्धां या चोरांनीं आपले अपवित्र, हिडीस आणि भ्रष्ट हात लावून, भ्रष्ट करून, हलकेंच सगळ्या सामानांत घुसडून दिलेला मीं पाहिला !

**जयाजी**—परमेश्वरानं मोठी कृपा केली.

**सयाजी**—कृपा केली ! ती कशी ?

**जयाजी**—कृपा म्हणजे अशी, कीं आतां माझ्याजवळ दांतावर मारायला एक फुटकी कवडीसुद्धां उरली नाहीं.

**सयाजी**—एकूण वेणुपूरचं दैव आणि तुझे ग्रह हीं दोन्हीं एकदम फिरलीं हेंच खरं. कारण इथं आप्त, इष्ट, स्नेही, बंधू, आणि बापजादे, हे सारे आज अगदीं उलटया काळजाचे झाले आहेत ! सत्य, विश्वास, आणि सच्चेपणा, ह्या सगळ्यांचा लोप झाला आहे ! जुलमामुळें निरपराधीपणानं आपली मान खालीं टाकली आहे. आणि दुर्गुणांचं सर्वत्र साम्राज्य झालं आहे ! तरी एक गोष्ट राहिलीच सांगायची. ती मीं जशी पाहिली तशी तूं जर पाहतास, त्या चांडाळांनीं-छेः त्यांची काय माय व्याली आहे म्हणा !-एखाद्या हद्दपार केलेल्या फुटक्या नशिबाच्या स्त्रीसारखी तुझी दुर्दैवी कमळजा जेव्हां मोठ्या कष्टानं डोळ्याला पदर लावून स्फुंदत आणि रडत घराबाहेर पडली, तेव्हां काय सांगू तिची अवस्था ! दोघां कुमारींच्या अंगावर तिनं आपलं आंग टाकलं होतं, त्यांनीं तिला सांवरून धरली होती, पण काय ? त्यांच्या डोळ्यांतून एकसारखे अश्रूंचे पाट चालले होते मधून मधून त्या आपलें रडें आवरत.तरी पण तिचं दुःख पाहून त्यांना पुनः जास्त भडभडून येई ! सभोंवतीं हें पहावयाला जमलेल्या लोकांपैकीं कित्येक नीच, हलकट, आणि कुटाळ लोकसुद्धां कमळजेची ही दैनावस्था पाहून जागच्या जागीं मुखस्तंभ होऊन गेले. त्यांच्या तोंडांना आपोआप पटापट खिळ्या

बसल्या. आणि तिच्याकरितां कळवळून जाऊन उलट ते दया भाकूं लागले! इतकं चरचरलं त्यांचं अंतःकरण तिच्याविषयीं! त्यांची ही अशी वृत्ती पाहून त्यावेळीं मलाहि असं वाटलं कीं हें जरी बेरड आहेत, तरी यावेळीं यांना घट्ट उराशीं कवटाळून धरावं! इतकं त्यांचं तें त्या वेळचं वर्तन पाहून मला आनंद झाला.

**जयाजी**—सयाजीराव! तुम्हीं मला ही हकीगत सांगितलीत, याबद्दल अंतःकरणपूर्वक मी तुम्हांला सांगतों, कीं मी तुमचा फार ऋणी आहें. कारण आतिशय मोठं असं जें काय संकट ओढवायचं होतं तें मला आतां कळून चुकलं! सयाजीराव, काय सांगू हो, हें माझं अंतःकरण इतकं कांहीं कणखर होतं कीं यानं दुर्दैवाचे वाटेल तितके उग्र, भयंकर, आणि भेसूर तडाखे सहन केले असते, पण जेव्हां माझ्या डोळ्यांपुढें हें चित्र उभं राहतं कीं माझ्या प्रियेला—माझ्या कमळजेला—अरे, अरे, अरे! काय तिचं तें कवळं मन! आणि तिची या दुःखाच्या—या अपमानाच्या—या डागणीच्या—प्रसंगीं काय अवस्था होऊन गेली असेल! तिनं हें सर्व कसं सहन केलं असेल! बस्स! हे एवढेच विचार मनांत आले, म्हणजे माझा सगळा धीर नाहींसा होतो आणि मनाचा कणखरपणा अगदीं विरघळून जातो! हें पहा, मला तूं काय वाटेल तें म्हण. भ्याड म्हण, भित्रा म्हण, पण आपल्या हातून कांहीं नाहीं बोआ आतां हें सहन होत. हें बघ, सयाजी, यावेळीं मी हें असें आपलें हात तुझ्या गळ्यांत टाकून हे हुंदके टाकायला तुझ्या छातीचा आधार घेतो आहे, म्हणून तूं मला पाहिजे तर पोरकट म्हण, पण याबद्दल तूं मला क्षमाच केली पाहिजेस (रडून) माझ्या या दुःखाश्रूंच्या पाटांनीं मी तुला आज स्नान घालणार!

**सयाजी**:—छेः छेः छेः! हें असं नाहीं उपयोगी. उलटं जळलं पाहिजे जळलं! पहिल्यांदा या वेणुपुराला जाळून, पोळून अजीबात उध्वस्त करून तुझ्या स्थितीला आणून पोंचिवलं पाहिजे. काय? एखाद्या भिकाऱ्याच्या कारट्यासारखं एखाद्या कुंपणाजवळ थंडीनं कुडकुडत उभं राहून, विव्हळून विव्हळून मरायचं! छेः ही गोष्ट तर कध्धीं होणार नाहीं! जोंपर्यंत माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत तरी तुला कश्शाची गरज पडूं देणार नाहीं. या घटकेपासून माझ्या अंतःकरणावर अर्थात् माझ्या सर्वस्वावर मालकी तुझी. तूं आतां वाटेल तसा त्याचा उपयोग कर.

**जयाजी**—छेः यापुढें धीर न सोडतां बेधडक मरायला तयार होणं यांतच अब्रू आणि भूषण आहे.

**सयाजी**—मरणं! बिळांत आणि सांदीकोपऱ्यांत उंदरांनीं मरावं! कुत्र्यांनीं पाहिजे तर पिसाळून वेडं व्हावं! पण माणसांनीं—असं मरणं! छे छेः छेः दुःखाशीं यापेक्षां शौर्यानं लढलं पाहिजे! त्याच्याशीं झुंझायला यापेक्षां निराळाच मार्ग शोधून काढायाला पाहिजे! बस्स सूड! आणि तोच घेण्याकरितां परमेश्वरानं आपल्यालाउत्पन्न करतांना पुरुषत्व दिलं आहे. तर आपल्याला कांहीं तरी पौरुष दाखिवलं पाहिजे; तें सोडून देऊन काय म्हणतोस, मरायचं? छेः छेः असं करूं नकोस. नीट डोळे उघडून पहा. तुला काय केलं पाहिजे याचा नीट विचार कर अगोदर. तूं आपल्या मनाला इतकं हळवं, इतकं दुबळं, आणि क्षुद्र होऊं देऊं नकोस. नीट विचार कर, आणि मग म्हण पाहिजे तर–'मरणा म्हणून!' मात्र तुझ्या कमळजेची—तुझ्या हतभागी दुर्दैवी कमळजेची—मीं सांगितल्याप्रमाणें अहवाल आहे हें नीट लक्षांत ठेव. तिचे हाल, तिची छळणूक, तिची स्थिति, हीं तिन्ही आपल्या डोळ्यापुढें ठेव, आणि मग काय करायचं तें कर! काय, मरणार? आणखी आपल्या अस्थींची राख या बदमाष, या हलकट भुरट्या आणि सगळ्या वेणुपूरचा कचरा ओढणाऱ्या या चोरांच्या भ्रष्ट राखेशीं मिसळूं देणार?

**जयाजी**—छेः छेः छेः सू—

**सयाजी**—हं बोल, बोल, पुरतं बोल, सगळं येऊं दे तोंडाच्या बाहेर एवढंच नव्हे, पण असं करीन म्हणून तुला इथं शपथ घेतली पाहिजे.

**जयाजी**—काय शपथ! पृथ्वी, आप, तेज, वायु, आणि आकाश या पंच महाभूतांची शपथ घेऊन सांगतों, कीं कमळजेच्या डोळ्यांतून पडणाऱ्या प्रत्येक टिपाबद्दल मीं सूड घेणार! कां सयाजीराव! ऐकूं आलंना मी काय म्हटलं तें? (कांहीं वेळानंतर) पण तें पिलाजीराव, हे एक सरसुभे आहेत नाहीं?

**सयाजी**—सरसुभे! वेणुपुरचा तो एक कुत्रा आहे म्हणून समज!

**जयाजी**—हो-हो, असंच. ठरलंच म्हणायचं तर!

**सयाजी**—ठरलंच तर, झाड गोळी आणि उडीव तिला आधीं!

**जयाजी**—मोठ्या आनंदानें! बस्स, पुरें आतां बरं पण आज रात्रीं कुठं बरं आपली दोघांची गांठ पडेल?

**सयाजी**—हं, सांगतों कुठं पडेल ती. ( विचार करून ) रमणबागेच्या धक्क्यावर; कारण तिकडंच असतों मी रोज फिरत रात्रीं बारा वाजायच्या वेळेला माझी विचार करीत बसण्याची जागा म्हणजे बहुतेक हीच असते. तिथं आलास म्हणजे मगच आपण बोलूं पुढें कसं काय करायचं तें !

**जयाजी**—ठीक आहे, ये तर.

**सयाजी**—बरोबर बारा वाजतां पण !

**जयाजी**—बाराच कां ? वाटेल त्या घटकेला आहे तयारी माझ्याकडून ! माझ्यासमोर हें जळत आहे ना ? मग आतां झोंप कुठून येणार मला ? [सयाजी जातो. ] ( आपल्याशीं ) परमेश्वरा ! माझ्या ठिकाणीं तूं ही हिंमत, ही शक्ती, ही महत्त्वाकांक्षा, आणि हे मोठमोठे विचार, हीं सारीं कशाला दिलींस ? जो मनुष्य अतिशय सुखी असेल त्याचं भांडवल आहे हें सारं ! हें चुकून माझ्याकडे आलं आहे. खरं म्हटलं म्हणजे माझ्या दुर्दैवाला अनुरूप असाच मी नीच, अधम, क्षुद्रबुद्धी, मठ्ठ आणि निव्वळ पाणक्या अथवा धोतरबडव्याच कोणी तरी निपजायचा ! परमेश्वरा ! माझ्यावर अमुक एक प्रसंग येऊन गुदरला आहे हें कळण्याची तरी माझ्यामध्यें तूं कां अक्कल ठेवलीस ? चूक नाहीं का झाली तुझी इथं ? ( कोणी येत आहे असें पाहून ) ओहो ! ही तर माझी प्रिया कमळजा ! अरे ! अरे ! ! अरे ! ! ! काय ही हिची स्थिती झाली आहे ! ( कमळजा येते. )

**कमळजा**—न्याग बायानों, न्याग मला तिकडे ! तिकडच्या सान्निध्यांतच माझं सगळं आहे. माझा नाथ, माझा प्रियकर, माझा आसरा सगळा,—( तो तिजजवळ येतो, त्यास पाहून ) इकडं आहे बाई ! ) त्यास उद्देशून ) खरंच बाई, इकडचं नुसतं हें मुखकमल पाहिल्याबरोबर मला किती हुषारी, किती उल्हास, आणि किती आनंद वाटतो म्हणून सांगू ? इकडचं नुसतं दर्शन झालं म्हणजे माझं मन आनंदानं आंतल्या आंत जसं कांहीं नाचायलाच लागतं ! हें गालांतल्या गालांत हंसणं, पहिल्या पहिल्यांदा तर मला फार मोह उत्पन्न करीत असे. याच्यावरच तर मी आजवर जीव धरून राहिलें आहे.

**जयाजी**—म्हणजे ! आतां नाहीं तर तुला पहिल्यासारखा आनंद होत ? दैवानं उलट खाऊन सारं मन्वंतर फिरलं एकून तर ? ती पहिली कमळजा नाहींस तर तूं आतां ? ती फार प्रेमळ, उदार, आणि कोमल अंतःकरणाची

होती. तशी नाहींस तर तूं आतां ? ( दुःखानें ) हंः, तुझ्यांत जर हा असा फरक पडला तर मला आतां या उभ्या जगांत विसाव्याची जागा तरी कुठें मिळणार ? मला आपलें सुख-सुख नाहींच म्हणा-पण दुःख मात्र तुझ्याजवळ यथास्थित पोटभर हवं तसं ओकायला मिळत असे, तें कोणाजवळ ओकूं आतां मी ?

**कमळजाः**—काय बाई असा माझ्यांत फरक दिसतो इकडे ? ( त्याचे गळ्यांत हात टाकून त्याचे छातीवर टेकून ) काय माझ्या प्रेमांत बदल ? आणि हींच त्यांचीं लक्षणं।वाटतं ! माझा कुणी जरी आतां जीव घेतला तरी देखील आतां मी इथून हलायची म्हणून नाहीं ! माझं सगळं सुख, सगळा आनंद, आणि सगळं दैवत इथं आहे.

**जयार्जीः**—काय ? स्त्रियांच्या ठिकाणीं ही म्हणते आहे असलें अप्रातिम प्रेम आणि अलौकिक पातिव्रत्य असूं शकेल काय ? कां नाहीं असणार ? बायकांच्या विरुद्ध आजपर्यंत जितके म्हणून उद्गार निघाले तितके सारे खोडसाळ आणि लुच्चेगिरीचे आहेत, हेंच खचित् ! देवानं हें स्त्रीरत्न—ही सारी अलौकिक स्त्री जाती—जी निर्माण केली ती मनुष्यांत माणुसकी उत्पन्न करण्याकरितांच केली आहे. ही स्त्रीजाति जर त्यानं निर्माण केली नसती तर आम्ही आज निव्वळ पशूच राहिलों असतों. स्वर्गांतल्या देवांगना फार सुंदर खऱ्या, पण त्यांच्यापेक्षांहि मला तूं जास्त सुंदर दिसते आहेस. जे कांहीं स्वर्गांत असेल म्हणून आपल्या कल्पनेला वाटतं तितकं सारं या तुझ्या अजब मूर्तीमध्यें सांठिवलं आहे. विलक्षण दैदीप्यमान तेज, निर्मल पातिव्रत्य, अलौकिक सत्य-प्रेम, चिरकाल टिकणारा आनंद, आणि निष्कपट प्रेम, हें इथं अगदीं गच्च भरून राहिलं आहे !

**कमळजाः**—प्रीति हीच जर आपली धनदौलत असेल तर त्रैलोक्यांत आपल्यासारखीं श्रीमंत दुसरीं कुणी नाहींत. कुबेर एकीकडे आणि आपण एकीकडे! काय काय आणि कसं कसं म्हणून तरी सांगावं बाई माणसानं ! मनांत किती आणि कसा आनंद वाटतो तो मला तरी नाहीं बाई सागतां येत. पण हो, हें पहा मला कुठं जरी घेऊन जायचं झालं, मग तें जंगल असो कां अरण्य असो, कीं अगदीं भयाण, आणि ओसाड असा प्रदेश असो-अथवा जिथं मूर्तिमंत दुर्दैव नांदत आहे असं तें एखादं भयाण ठिकाण असो, मी इकडच्याबरोबर असलें म्हणजे मग मला कसली दिखील भीति म्हणून वाटायची नाहीं. तिथं मग

**सयाजी**—हं, सांगतों कुठं पडेल ती. (विचार करून) रमणबागेच्या धक्क्यावर; कारण तिकडंच असतों मी रोज फिरत रात्रीं बारा वाजायच्या वेळेला माझी विचार करीत बसण्याची जागा म्हणजे बहुतेक हीच असते. तिथं आलास म्हणजे मगच आपण बोलूं पुढें कसं काय करायचं तें !

**जयाजी**—ठीक आहे, ये तर.

**सयाजी**—बरोबर बारा वाजतां पण !

**जयाजी**—बाराच कां? वाटेल त्या घटकेला आहे तयारी माझ्याकडून ! माझ्यासमोर हें जळत आहे ना? मग आतां झोंप कुठून येणार मला ? [सयाजी जातो. ] (आपल्याशीं) परमेश्वरा ! माझ्या ठिकाणीं तूं ही हिंमत, ही शक्ती, ही महत्त्वाकांक्षा, आणि हे मोठमोठे विचार, हीं सारीं कशाला दिलींस ? जो मनुष्य अतिशय सुखी असेल त्याचं भांडवल आहे हें सारं ! हें चुकून माझ्याकडे आलं आहे. खरं म्हटलं म्हणजे माझ्या दुर्दैवाला अनुरूप असाच मी नीच, अधम, क्षुद्रबुद्धी, मठ्ठ आणि निव्वळ पाणक्या अथवा धोतरबडव्याच कोणी तरी निपजायचा ! परमेश्वरा ! माझ्यावर अमुक एक प्रसंग येऊन गुदरला आहे हें कळण्याची तरी माझ्यामध्यें तूं कां अक्कल ठेवलीस ? चूक नाहीं का झाली तुझी इथं ? (कोणी येत आहे असें पाहून) ओहो ! ही तर माझी प्रिया कमळजा ! अरे ! अरे ! ! अरे ! ! ! काय ही हिची स्थिती झाली आहे ! (कमळजा येते.)

**कमळजा**—न्याग बायानों, न्याग मला तिकडे ! तिकडच्या सान्निध्यांतच माझं सगळं आहे. माझा नाथ, माझा प्रियकर, माझा आसरा सगळा,—(तो तिजजवळ येतो, त्यास पाहून) इकडं आहे बाई ! ) त्यास उद्देशून) खरंच बाई, इकडचं नुसतं हें मुखकमल पाहिल्याबरोबर मला किती हुषारी, किती उल्हास, आणि किती आनंद वाटतो म्हणून सांगू ? इकडचं नुसतं दर्शन झालं म्हणजे माझं मन आनंदानं आंतल्या आंत जसं कांहीं नाचायलाच लागतं ! हें गालांतल्या गालांत हंसणं, पहिल्या पहिल्यांदा तर मला फार मोह उत्पन्न करीत असे. याच्यावरच तर मी आजवर जीव धरून राहिलें आहे.

**जयाजी**—म्हणजे ! आतां नाहीं तर तुला पहिल्यासारखा आनंद होत ? दैवानं उलट खाऊन सारं मन्वतर फिरलं एकून तर? ती पहिली कमळजा नाहींस तर तूं आतां ? ती फार प्रेमळ, उदार, आणि कोमल अंतःकरणाची

होती. तशी नाहींस तर तूं आतां ? ( दुःखानें ) हंः, तुझ्यांत जर हा असा फरक पडला तर मला आतां या उभ्या जगांत विसाव्याची जागा तरी कुठें मिळणार ? मला आपलें सुख–सुख नाहींच म्हणा–पण दुःख मात्र तुझ्याजवळ यथास्थित पोटभर हवं तसं ओकायला मिळत असे, तें कोणाजवळ ओकूं आतां मी ?

**कमळजाः**—काय बाई असा माझ्यांत फरक दिसतो इकडे ? ( त्याचें गळ्यांत हात टाकून त्याचे छातीवर टेकून )। काय माझ्या प्रेमांत बदल ? आणि हींच त्यांचीं लक्षणं।वाटतं ! माझा कुणी जरी आतां जीव घेतला तरी देखील आतां मी इथून हलायची म्हणून नाहीं ! माझं सगळं सुख, सगळा आनंद, आणि सगळं दैवत इथं आहे.

**जयाजीः**—काय ? स्त्रियांच्या ठिकाणीं ही म्हणते आहे असलें अप्रातिम प्रेम आणि अलौकिक पातिव्रत्य असूं शकेल काय ? कां नाहीं असणार।? बायकांच्या विरुद्ध आजपर्यंत जितके म्हणून उद्गार निघाले तितके सारे खोडसाळ आणि लुच्चेगिरीचे आहेत, हेंच खचित् ! देवानं हें स्त्रीरत्न—ही सारी• अलौकिक स्त्री जाती—जी निर्माण केली ती मनुष्यांत माणुसकी उत्पन्न करण्याकरितांच केली आहे. ही स्त्रीजाति जर त्यानं निर्माण केली नसती तर आम्ही आज निव्वळ पशूच राहिलों असतों. स्वर्गातल्या देवांगना फार सुंदर• खऱ्या, पण त्यांच्या-पेक्षांहि मला तूं जास्त सुंदर दिसते आहेस. जे कांहीं स्वर्गांत असेल म्हणून आपल्या कल्पनेला वाटतं तितकं सारं या तुझ्या अजब मूर्तीमध्यें सांठिवलं आहे. विलक्षण दैदीप्यमान तेज, निर्मल पातिव्रत्य, अलौकिक सत्य-प्रेम, चिरकाल टिकणारा आनंद, आणि निष्कपट प्रेम, हें इथं अगदीं गच्च भरून राहिलं आहे !

**कमळजाः**—प्रीति हीच जर आपली धनदौलत असेल तर त्रैलोक्यांत आपल्यासारखीं श्रीमंत दुसरीं कुणी नाहींत. कुबेर एकीकडे आणि आपण एकीकडे! काय काय आणि कसं कसं म्हणून तरी सांगावं बाई माणसानं ! मनांत किती आणि कसा आनंद वाटतो तो मला तरी नाहीं बाई सागतां येत. पण हो, हें पहा मला कुठं जरी घेऊन जायचं झालं, मग तें जंगल असो कां अरण्य असो, कीं अगदीं भयाण, आणि ओसाड असा प्रदेश असो–अथवा जिथं मूर्तिमंत दुर्दैव नांदत आहे असं तें एखादं भयाण ठिकाण असो, मी इकडच्याबरोबर असलें म्हणजे मग मला कसली दिखील भीति म्हणून वाटायची नाहीं. तिथं मग

देवापाशीं ( त्याचे गळ्यांत हात घालून ) मला हें ' माझं एवढं सौभाग्य जन्मोजन्मीं असंच लाभूं दे, म्हणून सगळ्या ताऱ्यांच्या आणि चंद्राच्या देखत मी देवाजवळ करुणा भाकेन. आणि मला एवढा आसरा असला, म्हणजे मग आणखी काय पाहिजे बाई मला ? मी हवी तर अशी जन्मभर उभी राहीन ! मग माझ्यावर वाटेल तीं संकटें येऊन कोसळूं देत, मी एक तिळभर दिखील डगमगायची नाहीं. आणखी काय सांगू बाई ?

**जयाजी**:—अहाहा सुंदरी ! मी दुहेरी पेंचांत सांपडलों आहें. एकीकडून या दुर्दैवाच्या फेऱ्यांत, आणि दुसरीकडून तुझ्या प्रेमाच्या ऋणांत ! आज हें नाहीं, उद्यां तें नाहीं, असं म्हणून हें भयंकर भूत, हें बुभुक्षित दारिद्य, एकसारखं माझ्या मागं लागलं आहे ! यानं फार विलक्षण रीतीनें माझी पाठ पुरविली आहे. ही थंडी, ही उपासमार, आणि हें दारिद्य, तुझ्यासारख्या नाजुक आणि सकुमार स्त्रीच्या हातून कसं सहन करवणार ! आपलं हें दुर्दैव आपल्याला इथून लवकरच खास हद्दपार करून जिथं आपली ओळख नाहीं, देख नाहीं, तिथं अन्नान्न करीत देशोधडी लावणार ! तिथं आपल्याला कुणी कुत्रासुद्धां विचारणार नाहीं, कीं तुम्ही कोण, कुठले, म्हणून ! मग आपलं नांव कोण काढणार उगीच ? अन् तिथं आपल्याला गवतांवर, वाऱ्याच्या सोंसाट्यांत, थंडींत, कुडकुडत, मुकाट्यानें पडून रहावं लागेल ! अशा वेळीं हे आतां बोलते आहेस असेच शब्द जर माझ्या कानीं पडतील, तर माझी सारी काळजी, माझा सारा हृद्रोग, पार नाहींसा होऊन मी तुझ्या या शुद्ध आणि अमृततुल्य प्रेमोदधींत शतशः बुचकळ्या मारीन आणि आपल्याला ह्या साऱ्या जगांत धन्य समजेन !

**कमळजा**:—काय ? माझ्या प्रीतींतः अंतर पडेल अगबाई ? मला वेड लागलं, माझं मस्तक फिरून गेलं, अन् माझी स्मरणशक्ती नाहींशी झाली तरी दिखील जेव्हां जेव्हां म्हणून मी थोडी तरी भानावर असेन तेव्हां तरी आपली मूर्ति माझ्या डोळ्यापुढें सदा उभी राहील आणि त्यावेळीं आपल्या प्रेमाशिवाय दुसरा कसला देखील विचार येणार नाहीं माझ्या डोक्यांत ! इतकंच नव्हे, पण आपल्याला आतां आश्रयाची जागा म्हटली म्हणजे हें उघडं जग, राहायाला जागा म्हटली म्हणजे एखादें भगदाड, खायाला अन्न म्हटलं म्हणजे कंद आणि मुळं, आणि पांघरायला वस्त्र म्हटलं म्हणजे झाडाच्या साली; अशी जरी दशा आली तरी दिखील एक काडीभर देखील मी डगमगायची नाहीं कीं

चळायची नाहीं. मी आपला हा हात इकडं सकाळपर्यंत अस्सा हा उशाला देईन, आणि इकडच्या साऱ्या कष्टाची आणि दुःखाची वांटेकरी होईन. आणि अशा रीतीनं इकडं दुःखभारानं गळा दाटून आला असतां, उमाळ्यावर उमाळे येऊन उसासे टाकीत असतां, अथवा डोळ्यावाटे अश्रूंचे घळघळ ओघळ आलेले असतां, मी इथं पायापाशीं उभी राहून माझ्या हातून होईल तेवढं सांत्वन करीन, आणि देवाचा धांवा करून त्याला मनोभावानं आळवीन, म्हणजे तो सगळीं संकटं हरण करील.

**जयाजीः**—परमेश्वरा ! ऐक, ऐक हे इचे शब्द ! आणि तुझ्या हातून ही असली अलौकिक मूर्ती कशी निर्माण झाली या गोष्टीच्या विचारानें तुझा तूंच अगदीं चकित आणि थक्क होऊन जा ! सगळ्या जगभर सार्वभौमत्व मिरवूं पाहणाऱ्या राजांनो, तुम्हीं चालविलें आहेत असेंच खुशाल राज्य करा. तुमच्या राज्यांत–कुठं नाहीं कुठं जो सदोदित बंडाचा धुमाकूळ माजून राहिला असतो त्यापुढें–मी अनुभवित असलेली शांतता आणि सौख्य कसें काय आहे याची तुमच्या डोक्यांत कल्पनाच नाहीं यावयाची कधीं. मोठीं गलबतें असावींत, लाटा उसळून तीं कांहीं वेळ अदृश्य व्हावींत, कीं तुमचे धाबें दणाणलेंच ! लाटा बसल्या जाऊन समुद्र अगदीं शांत झाला आणि पुनः तीं दिसूं लागलीं, कीं लगेच तुम्ही मदानें आणि गर्वानें लागलातच ताठायला ! इतक्यांत पुनः कुठं नुसतं वादळ उठलं कीं पुरें. त्या वादळांत तुमचा चक्काचूर होऊन कुठच्या कुठं तुम्हीं गडप होऊन जाल, याचा कांहीं नेम नाहीं ! इकडं माझी धनदौलत म्हणाल तर माझं एक लहानसं होडकं. तें खडकावर आपटून त्याचा चक्काचूर होऊन गेला; पण एकाद्या छोट्याश्या व्यापाऱ्याप्रमाणें कर्मवशांत मी कुठल्याशा एका जमीनीला जाऊन लागलों–आणि माझ्या नशीबांत माझ्या साऱ्या धनदौलतींतून अस्सल अशा रत्नांचा जो करंडा तो मात्र तेवढा अचुक माझ्या हातीं लागला. आतां यापुढें किनाऱ्यावर मला भटकायला लागेल, पण त्याची नाहीं आतां मी फिकीर करीत. माझ्या ह्या करंड्यांतलि ह्या अस्सल रत्नापुढं मी सगळं जग आणि सारी धनदौलत तुच्छ समजतों. मात्र यापुढें मी केवळ या दैवावर विश्वासून नाहीं राहणार, एवढंच मात्र खरं ! [ जातो.

**अंक १ ला समाप्त.**

# अस्पृश्यता गेली ?

लेखक--**विजय.**

"प्रभु रामचंद्रा ! अस्पृश्यता गेली ?"
" दुर्दैवी आत्म्यानों, अद्याप नाहीं !"

दरवर्षी रामनवमीच्या दिवशीं राममंदिराच्या गाभाऱ्यांत उपरोक्त प्रश्नोतरें होत असतात.

जड देहधारी मानव्याच्या चर्मकर्णांस तें श्रवणक्षम होत नाहीं. तथापि, असें प्रश्नोत्तर होत असतें एवढें बरीक खरें !

वाचकहो ! ह्या प्रश्नोत्तराच्या रहस्याचा उलगडा करून घेण्याकरितां आपण अगदीं फार प्राचीन कालांत-रामायणाच्या पूर्वकालांत गेलें पाहिजे.

पंपा सरोवराचा विस्तीर्ण जलाशय दूरवर पसरला होता. त्याच्या पश्चिम तीरावर निबिड अरण्य माजलें होतें. मतंग नांवाचे एक ऋषि सरोवराच्या त्या तीरावर आश्रम बांधून राहिले होते. त्यामुळें त्या अरण्यास ' मतंगवन ' हें अभिधान प्राप्त झालें होतें.

आर्यावर्ताच्या दक्षिणेकडील अंतिमसीमेच्या पलीकडील ह्या जंगलांत वास्तव्य करून राहण्यांत मतंगऋर्षीचा एक उदात्त हेतु होता. पंपा सरोवराच्या आसमंतांतील

प्रांतांतून मागासलेले व रानटी असे भिल्ल, शबर आदिकरून वृषल जातींचे लोक रहात होते. त्यांना वैदिक संस्कृतीचे पाठ देऊन व सम्यक् ज्ञानाचा लाभ करून देऊन त्यांच्यांतील रानटी व राक्षसी चालींचें समूळ उच्चाटन करून त्यांचा उद्धार करण्याकरितां मतंगऋषि आर्यावर्तांतून मुद्दाम तेथें येऊन राहिले होते.

मतंगऋषींनीं हातीं घेतलेलें हें प्रचारकार्य अत्यंत बिकट असें होतें. त्या अंत्यजांच्या—दलितांच्या उद्धाराकरितां ते कायावाचामनानें झटूं लागले. तथापि, तत्कालीन् उच्चवर्णीय पुराणमताभिमान्यांना त्यांचें हें कृत्य धर्मबाह्य व नीतिबाह्य वाटूं लागलें. त्यांच्यासारख्या ब्राह्मणकुळांत जन्मलेल्या ऋषिवर्यानें, निषाद, चांडाल, श्वपच, शबर आदिकरून नीच जातींत मिसळून त्या जातींना संस्कृत करणें त्या उच्चवर्णीयांना पसंत पडलें नाहीं. इतकेंच नव्हें तर ते प्रचलित असलेल्या नियमाविरुद्ध आचरण करतात, म्हणून त्यांनीं त्यांस वाळींत टाकलें.

मतंगऋषींना अशा प्रकारच्या गडांतराची प्रथमपासूनच कल्पना असल्यामुळें ते डगमगून गेले नाहींत. उलट त्यांनीं आपलें कार्य नेटानें पुढें चालू ठेविलें. त्यांनीं त्या अंत्यजांना वेद शिकविले. होमहवनादि वैदिक विधी कसे करावे तें शिकविलें, इतकेंच नव्हें तर त्यांच्या मुलामुलींचे उपनयनसंस्कार केले.

मतंगऋषींचें तें धडाडीचें कार्य पाहून तत्कालीन् तरुणपिढीवर अनुकूल असर पडला. प्रथम प्रथम त्यांच्या कार्याकडे सहानुभूतीच्या दृष्टीनें पाहणारे बरेचसे तरुण त्यांना उघड येऊन मिळाले. त्यांच्यापैकीं कांहीं जणांनीं अंत्यजांच्या मुलींशीं लग्नें केलीं. त्यांचीं मुलें इतर ऋषिकुमारांप्रमाणें शास्त्रपठण व वेदाध्ययन करूं लागलीं.

रामायण काळापूर्वीच्या नियमांप्रमाणें, त्या ब्राह्मण तरुणांना शूद्र स्त्रीपासून झालेली संतति अर्थातच ब्राह्मण म्हणून गणली जायाला पाहिजे होती; कारण, त्या काळीं पितृपक्ष हाच वर्णद्योतक होता.

मतंगऋषींनीं उच्चवर्णीय आर्यांचें या गोष्टीकडे लक्ष वेधविण्याचा प्रयत्न केला. पण त्यांची दृष्टि स्वार्थामुळें अंधत्व पावलेली असल्यामुळें त्यांनीं त्या नियमांकडे डोळेझांक केली. आर्यांची पूर्वकालीन वर्णव्यवस्था जन्मजात नसून गुणकर्मजात कशी आहे हें सिद्ध करून दाखविण्याकरितां त्यांनीं अनेक दाखले दिले. सोमवंशीय विश्वामित्र तपोबलानें ब्राह्मणत्व पावला. श्वपाकी ( चांडा-

ळिणी ) पासून उत्पन्न झालेला पराशर तपानें ब्राह्मण झाला. हरिणीपासून उत्पन्न झालेला ऋष्यशृंग ऋषि तपानें ब्राह्मण झाला. इंद्र हा ब्रह्मयाचा ( ब्राह्मणाचा ) पुत्र असतांना कर्मानें क्षत्रिय बनला. वैवस्वतमनूच्या वंशांत जन्म घेऊन अग्निवेश्या ब्राह्मणत्व पावला, नाभाव वैश्यत्व पावला व पृषध्र शूद्रत्व पावला. असे अनेक दाखले त्यांनीं शास्त्रांतून काढून दाखविले. तथापि मूर्तिमंत स्वार्थ भरलेल्या त्या उच्चवर्णीयांनीं त्यांच्याकडे दुर्लक्ष्य केलें. त्यांनीं त्यांचा उपहास केला.

ज्या उच्च ध्येयानें प्रेरित होऊन आपण व आपल्या अनेक ब्राह्मण शिष्यांनीं इतका स्वार्थत्याग केला, त्या अंगीकृत ध्येयाची अशा प्रकारें वाताहात लागलेली पाहून मतंगऋषींच्या हृदयास जबरदस्त धक्का बसला. आयुष्याच्या अंतिम सीमेवर येऊनही अद्यापपावेतों अंगीकृत कार्याची परिपूर्तता न झालेली पाहून ते अगदीं गळून गेले. त्यांच्या जर्जर देहानें धरणी गांठली.

मतंगऋषींनीं धरणीस आपली शय्या केलेली पाहून त्यांची शिष्या शबरी त्यांची शुश्रुषा करूं लागली. मुनिवरांचें तिच्यावर पोटच्या मुलीप्रमाणें प्रेम होतें. त्या दोघांचा इतका जिव्हाळ्याचा संबंध जडला होता, कीं त्रयस्थाला तीं दोघें पितापुत्री आहेत असेंच वाटे. तिला त्यांनीं ब्रह्मविद्येमध्यें इतकें पारंगत केलें होतें कीं मैत्रेयासारख्या मोठमोठ्या ऋषींप्रमाणें तिलाही त्या विद्येची निर्णयकर्ती व अधिकारिणी मानण्यांत येत असे. असो.

आज मतंगऋषींची प्रकृति विशेष खालावली होती. त्यांचा सारा शिष्यवृंद सचिंत मुद्रेनें त्यांच्या सभोंवतीं गोळा झाला होता. त्या सर्वांच्या डोळ्यांतून अश्रूंची झिरपणी लागली होती.

कांहीं वेळानें मुनिवरांनीं त्या सर्व शिष्यांना शुभाशीर्वाद देऊन आपापल्या व्यवसायास जाण्याची आज्ञा दिली. ते सर्व त्यांना अभिवादन करून निघून गेले. फक्त शबरी जागेपासून हलली नाहीं. ती त्यांच्या मुखाकडे दृष्टि लावून बसून राहिली.

" बाळ शबरी ! "

मतंगांचा आवाज खोल गेला होता !

" आज्ञा तात ! " शबरी मान नम्र करून म्हणाली.

" बाळ ! माझा देहावसानसमय समीप येऊन ठेपला आहे. आतां मी थोड्याच घटकांचा सोबती आहें. तुम्हां सर्वांना सोडून सत्वर निघून येण्याविषयीं प्रभुकडून मला आज्ञा आली आहे ! "

शबरीला हुंदके अनावर झाले. ती मुक्तकंठानें रडूं लागली.

" अशी रडूं नकोस बाळे ! जन्मा आलेल्या प्राण्यास मरण कधीं टळलें आहे कां ? जातस्य हि ध्रुवोः मृत्यु ! याबद्दल वृथाः शोक करून काय लभ्यांश ? "

" पण तात ! आतां आपल्या अंगीकृत कार्याचें पुढें कसें होणार ? मला त्याचेंच वाईट वाटतें आहे ? कारण ज्याकरितां आपण जीवाचें रान केलेंत, तें कार्य जरा देखील तडीस गेलें नाहीं. "

" हो ! मला देखील कालपर्यंत त्याच कार्याच्या अपूर्ततें बद्दल वाईट वाटत होतें. पण आज हें जग सोडतांना मला आनंद होत आहे. कारण, प्रत्यक्ष परमेश्वरानेंच माझ्या कार्याबद्दल सहानुभूति प्रकट केली आहे. काल रात्रीं निद्रितावस्थेंत असतांना प्रभूनें स्वप्नांत येऊन मला आशेचा किरण दाखविला.

" काय प्रत्यक्ष परमात्मा आले ? " हर्षोत्फुल्ल होऊन शबरी उद्गारली. तिचा दुःखावेग पार कोठच्या कोठें मावळून गेला.

" होय, त्यांनीं मला स्वप्नांत भेट दिली. ते म्हणाले, " मीं पृथ्वीवर अवतार घेतला आहे.–अयोध्येचा राजा दशरथ याच्या पोटीं–कौसल्या राणीच्या पोटीं–मी राम होऊन आलों आहें. तेव्हां तूं निश्चिंतपणें देहत्याग कर ! कोणत्याही प्रकारची काळजी करूं नकोस.–शबरी ! त्या प्रभु रामचंद्राचें दर्शन घडण्याचें माझ्या नशिबीं नाहीं. तथापि तूं मात्र त्यांची एकनिष्ठपणें सेवा कर. प्रत्यक्ष नाहीं; तर नाहीं पण त्यांची मानसपूजा कर ! त्यांना प्रसन्न कर. त्यांचा शुभाशीर्वाद घे. आणि माझी खात्री आहे, कीं आज अस्पृश्य ठरलेले हे मातंग —ह्या मतंग मुनीचे वंशज त्या प्रभु रामचंद्राच्या कृपेनें लवकरच स्पृश्यत्व पावतलि !—जा ! सर्व शक्तिमान् प्रभो तुला तुझ्या उद्दीष्टांत यश देवो !...... आणि......"

आणि ज्या समयाची शबरी चातकाप्रमाणें इतकीं वर्षें वाट पहात बसली होती, तो समीप येऊन ठेपला होता. ज्याची मानसपूजा करण्यांत तिनें एक

तप व्यतीत केलें होतें तो जगदात्मा प्रभु रामचंद्र आज मतंगवनांत आपली पत्नी सीता व बंधु लक्ष्मण यांच्यासमवेत आला होता.

आज शबरीच्या आनंदास पारावार नव्हता. प्रभु रामचंद्राच्या आगमनाचें वृत्त, कोणा एका मातंग कुमारानें सकाळींच तिला कळविलें. त्याच्या दर्शनाकरितां तळमळणारा तिचा आत्मा उत्फुल्ल झाला. इतकीं वर्षें त्याच्या ऐकिव गुणांचें मानसपूजन ती करीत होती. पण आज प्रत्यक्ष त्याच्या सचेतन पार्थिव देहाचें दर्शन तिला घडणार होतें.

मृगजळामागें धांवणाऱ्या मृगाप्रमाणें ती प्रभु रामचंद्राच्या अनुरोधानें धांवत सुटली. मार्गांत पायांत तीक्ष्ण कंटक रुतून त्यांतून भळभळ रक्तस्राव होऊं लागला. विटपांच्या आश्रयाच्या अभावामुळें अनाथ होऊन भूमीवर इतस्ततः विखुरलेल्या वेलींच्या जाळ्यांत पाय अडकून अनेक वेळां ती खालीं पडली व त्यामुळें गुडघे फुटून त्यांतून रक्त वाहूं लागलें. पण तिला त्याची जाणिव होती कुठें ? तिच्या हृदयसागरावर रामनामाच्या वीचि उठत होत्या. फक्त रामनामाचीच संवेदना तिच्या हृदय-संपुष्टांत पूर्णपणें व्यापली गेल्यामुळें इतर संवेदनांचा प्रतिध्वनि अथवा प्रतिबिंब त्या ठिकाणीं उठणें अशक्यप्राय झालें होतें.

आपला राम अशा कंटकमय व गडद जंगलांतून चालत असल्यामुळें त्याला भूक लागली असेल, असें तिच्या भाविक मनाला वाटलें. एका बोरीच्या झाडावरील बोरें तोडून तिनें तीं आपल्या ओच्यांत सांठविलीं. तीं किडकीं नसल्याबद्दलची खात्री करून घेण्याकरितां तिनें तीं सर्व दातानें फोडून पाहिलीं.

ती पुन्हां मार्गाक्रमण करूं लागली. अशा रीतीनें एक दोन योजनें चालून गेल्यानंतर एका विशाल वटवृक्षाच्या छायेखालीं रामप्रभु लक्ष्मणसीतेसह विश्रांति घेत असलेले तिला दिसलें. त्यांनीं तिला ओळखलें, व अंतर्संवेदनानें तिला त्यांची ओळख पटली.

भक्तांच्या भेटीकरितां सदैव उत्सुक असलेले रामप्रभु तात्काळ उठून तिला सामोरे गेले !

अति नम्रभावानें शबरीनें ओच्यांतील बोरें त्यांना अर्पण केलीं.

त्यांनीं तिला प्रेमभरित हृदयानें दृढालिंगन दिलें.

……“ शबरी, तूं आणलेलीं बोरें फारच गोड आहेत. जणूं काय तुझ्या भक्तिरसाचाच आस्वाद ह्या बोरांच्या द्वारें मी घेत आहे असें मला वाटतें. ” तीं उष्टीं बोरें खात ते म्हणाले.

“ महाराज, आपल्या दर्शनानें मी आज कृतार्थ झालें. ”

रामप्रभूंच्या अमृततुल्य बोलांनीं क्षणभर गोंधळून गेलेली शबरी कांहीं वेळानें म्हणाली.

“ पण माझ्या दर्शनाकरितां इतकी पायपीट कशाला केलीस तूं? आधींच मानसपूजेच्या योगानें तूं मला आपल्या अंतःकरणांत जखडून टाकिलें आहेस. ”

“ पण महाराज, बेंबीच्या देठांत कस्तुरी असतां देखील कस्तुरी-मृग तिच्या शोधार्थ रानोमाळ भटकत फिरतोच ना ? ”

“ वा ! शाबास ! ब्रह्मविद्येप्रमाणें वादविवादांत देखील तूं पटाईत दिसतेस कीं ? शोभतेस खरी मतंगमुनींची शिष्या ! —हो खरेंच ! बरी आठवण झाली. मला तो तुमचा आश्रम पहायचा आहे. त्या दिवशीं कबंध माझ्याकडे फारच तारीफ करीत होते त्याची ! ”

“ मग याच पावलीं चलावें स्वामिन् ! आपली पायधूळ त्याच्या उंबरठ्यास लागली तर तेणेंकरून आम्ही दलित कृतार्थ होऊं ! ”

“ हो ! हो ! चल. मला देखील तो पहाण्याची फार उत्कंठा लागून राहिली आहे. ”

शबरीचा आनंद गगनांत मावेना. ती हर्षोत्फुल्ल झाली. रामप्रभूंचा हात धरून ती चालूं लागली. ते देखील लक्ष्मण व सीता यांच्यासमवेत तिजबरोबर मोठ्या आनंदानें निघाले.

आश्रमाकडे जाणाऱ्या रस्त्याच्या दुतर्फा कांहीं सुंदर फुलझाडें व वृक्ष वाढले होते. तीं पुष्पभारानें नम्र झालेलीं फुलझाडें व फळांनीं ओथंबलेले वृक्ष पाहून रामप्रभूंना फार आनंद झाला.

“ ह्या फुलझाडांचीं व वृक्षांचीं नांवें काय ? ” त्यांनीं शबरीला प्रश्न केला.

“ स्वामिन् ! या वृक्षांच्या उत्पत्तिसंबंधींची हकीकत फार विचित्र आहे. मुनिवरांचे शिष्य त्यांच्याकरितां फळें, काष्टें वगैरे घेऊन जात असत. त्यांच्या भाराच्या श्रमामुळें शिष्यांच्या शरीरांतून परसेवेचे जे स्वेदबिन्दू टिबकले त्यांपासून

ह्या फुलझाडांची व वृक्षांची उत्पत्ति झाली आहे. अशा प्रकारें परिश्रमाच्या स्वेद - बिंदूपासून यांची उत्पत्ति झालेली असल्यामुळें ते कधीं कोमेजून अगर वाळून जात नाहींत. ”

अशा प्रकारचा वार्तालाप करीत तीं चौघें आश्रमांत आलीं.

“ हे रघुनन्दना ! ‘ मतंगवन ’ म्हणतात तें हेंच ! येथेंच माझे आत्मज्ञानी गुरु रहात होते. ह्या जवळच्या गुंफेंत वेदमंत्रद्वारा होमहवनादि कर्में करून ते समाधि लावीत असत ! ” शबरी रामप्रभूला म्हणाली.

मतंगवनामित्येव विश्रुतं रघुनन्दन, इह ते भावितात्मानो गुरवो मे
महद्द्युतेः जुहवां चक्रिरेवीडे मंत्रवन् मन्त्रपूजितम् —रामायण

नंतर रामचंद्र, लक्ष्मण व सीता यांची षोडशोपचारें पूजा केल्यानंतर शबरी त्यांना घेऊन गुंफेंतील मतंगऋषींच्या समाधीजवळ आली.

“ स्वामिन् ! ही माझ्या आत्मज्ञानी गुरूची समाधि ! त्यांच्या आज्ञेवरून आज इतकीं वर्षें मी आपली मानसपूजा करीत आहे. तेव्हां माझ्यावर आपण कृपेचा अनुग्रह करा ! आणि ह्या त्यांच्या वंशजांचा—मातंगांचा उद्धार करा ! त्यांना पावन करा ! एवढीच माझी आपल्या चरणारविंदीं प्रार्थना आहे ! ज्या ध्येयपूर्तीकरितां माझ्या गुरूंनीं इतके कष्ट सोसले, त्यांचें अंशतः तरी साफल्य झालें म्हणजे त्यांचा आत्मा सुखी होईल ! ” रामप्रभूचें पादद्वय घट्ट धरून सद्गदित कंठानें शबरी म्हणाली.

रामप्रभूनीं तिला बाहूला धरून वर उठविलें !

“ शबरी ! तुझ्या मानसपूजेबद्दल मीं तुझ्यावर संतुष्ट आहें. ज्या उच्च ध्येयानें प्रेरित होऊन तुझ्या गुरुजींनीं आपलें आयुष्य वेंचिलें, त्याबद्दल ते धन्यवादास पात्र आहेत. पण सांप्रत समाजांत स्वार्थी लोकांची बेसुमार वाढ झाली आहे. त्यांनीं वैदिक धर्माला इतकें विकृत स्वरूप दिलें आहे, कीं ह्या सत्ययुगांत तुझ्या गुरूची आशापूर्ति होणें शक्य दिसत नाहीं ! ”

“ मग काय स्वामिन् ! ज्या आशेवर मीं इतकीं वर्षें काढलीं तीं फुकटच तर ! ......प्रभूजी ! कधींच कां आमची अस्पृश्यता जाणार नाहीं ? हा अस्पृश्यतेचा ऋषिकुमारांना लागलेला कलंक असाच कायम रहाणार तर ! ” शबरी निराश हृदयानें उद्गारली.

" नाहीं ! कलियुगांत असा एक काळ येईल, कीं तुम्हांला लागलेला हा अस्पृश्यतेचा कलंक साफ धुवून निघून तुम्ही फिरून स्पृश्य व्हाल ! कलियुगांत मोठमोठे महात्मे अवतरतील व ते अस्पृश्यतेचा कलंक धुवून काढतील ! "

आणि कलियुगाच्या आरंभापासून प्रत्येक रामनवमीच्या दिवशीं राममंदिरांत मतंग व शबरी रामप्रभूला प्रश्न विचारीत असतात.

" प्रभु रामचंद्रा ! महात्मा अवतरला ? "

" प्रभु रामचंद्रा ! अस्पृश्यता गेली ? "

आणि मंदिराच्या गाभाऱ्यांतून उत्तरें येतात.

" होय, महात्मा आला ! "

" दुर्दैवी आत्म्यांनों अद्याप नाहीं ! "

आज कलियुगाचीं किती तरी वर्षें मागें पडलीं आहेत.

भगवान् बुद्धानें, ' जन्मानें कोणीही बहिष्कृत होत नसतो, व जन्मानें कोणी हि ब्राह्मण होत नसतो. मनुष्यें आपल्या आचारानें बहिष्कृत होतात व आपल्या कृत्यांच्या योगानें तीं ब्राह्मण होतात. ' असा उपदेश करून अस्पृश्यता नष्ट करण्याचा प्रयत्न केला.

शंकराचार्यांनीं काशींत, ' तूं माझाच बंधु आहेस ! ' असें म्हणून चांडालरूप शंकराला त्याच्या उपदेशानें उपरति होऊन दृढालिंगन दिलें.

विशिष्टाद्वैतमताचे प्रवर्तक श्रीमान् रामानुजाचार्य यांनीं समताभावाचा उपदेश केला.

रामानंद यांनीं, हीन मानलेल्या जातींतून आपले मुख्य बारा शिष्य करून अस्पृश्यतानिवारणाकरितां प्रचार केला.

कबीर व चैतन्य यांनीं बंगाल व ओरिसा या प्रान्तांतून वैष्णव मताचा प्रसार करून स्पर्शास्पर्श भेदाचें उच्चाटन करण्याचा प्रयत्न केला.

गुरु नानक व त्यांचे शिष्य आणि अनेक महाराष्ट्रीय संतांनीं अस्पृश्यतेचा तीव्र शब्दांत निषेध केला.

पण अस्पृश्यता गेली नाहीं.

स्वामी रामतीर्थ, स्वामी विवेकानन्द आले आणि गेले पण अस्पृश्यता गेली नाहीं.

महर्षि दयानन्दांनीं अस्पृश्यतेचा कलंक धुवून काढण्याकरितां आटोकाट प्रयत्न केले. आर्यसमाजाची स्थापना करून त्यांनीं अस्पृश्यांना स्पृश्य करण्याचा प्रयत्न केला. स्वामी श्रद्धानंदांनीं अस्पृश्यता निवारणाकरितां आंदोलन केलें. पण—

अस्पृश्यता गेली नाहीं.

आज महात्मा गांधी अस्पृश्यतेचें हिंदु समाजांतून समूळ उच्चाटन करण्याकरितां झटत आहेत ! पण—

दर रामनवमीच्या दिवशीं तींच प्रश्नोत्तरें होत असतात.

" प्रभु रामचंद्रा ! महात्मा आला ?

" होय, आला ! "

" तर मग, प्रभु रामचंद्रा, अस्पृश्यता गेली ? "

" दुर्दैवी आत्म्यांनों अद्याप नाहीं ! "

स्वतांला अस्पृश्यांपैकीं एक असे समजणाऱ्या महात्मा गांधींना अस्पृश्यतेचा कलंक धुवून काढण्याकरितां मतंग ऋषीप्रमाणें आत्मबलिदान करावें लागणार काय?



# मेकॅनिक.

ले.–श्रीयुत बी. रंगनाथ.

“मे आय् कम् इन् सर ” मीं उंबरठ्यावर पाय ठेऊन विचारलें.

“ ओ–हो, या तुम्ही बाळूकाका ” एक हात टाईपरायटरच्या रोलरवर ठेऊन माझ्याकडे वळून पाहात वसंत म्हणाला. “ बरं झालं बोवा तूं आलास. उठल्यापासून मी याच्या खटपटीला बसलों आहें. पण हालेल तर शपथ. ”

“पण तें जमावं कसं,” माझ्याकडे पाहून गालांतल्या गालांत हंसत हंसत लीला म्हणाली “ तुका म्हणे तेथें— ”

“ पाहिजे जातीचें ” मीं तिचें वाक्य पूर्ण केलें, आणि टेबलावरची घंटा वाजवून खुर्चीवर बसलों.

‘ अहो मेकॅनिक ’ वसंत म्हणाला ‘ तुम्ही बसलांत काय म्हणून ? तुला कांहीं जेवायला बोलावलें नाहीं. पाहात काय बसलास तोंडाकडे ? ”

“ तुमची दोघांची अक्कल गेली कुठें ? हें पाहातों आहे. पाहुणा आल्या-

बरोबर चहा, पान, सिगारेट कांहीं तरी त्याला देण्याची रीत आहे. आपल्याला जरी घ्यावयाचा नसला तरी– ”

पण इतक्यांत गड्यानें सर्व जिन्नस आणल्यामुळें माझें तोंड बंद पडलें.

“ काय रे वशा ” तीं दोघेही चहा घेत· नसल्यामुळें मी कपांतील चहा बशींत ओतीत म्हणालों “ तुझ्या नोकरांना कांहीं कर्णपिशाच्च वगैरे साध्य आहे कीं काय ? ”

टाइपरायटरचा कॅरेज हालविण्याचे प्रयत्नांत वसंत दंग झाला होता. आणि लीला त्याला मदत करत होती. मीं पान खाऊन सिगारेट हातांत घेतली. पण काड्याची पेटी–ती कोठेंच दिसेना. इतक्यांत समोरच असलेल्या कॉलबेलवर माझी दृष्टि गेली. मीं चटकन् उठून तिचा उपयोग केला.

“ का आज सिगारेट पेटवायची नाहीं वाटतं ? ” लीला माझ्याकडे पाहात म्हणाली. “ आमच्या इथें तर आज जेवणसुद्धां झालें नाहीं. ”

“ कशाला होईल ! स्वयंपाकच केला नाहीं तर माणूस खाणार तरी काय ? सिगारेट पेटवायला काडी तरी पाहिजे.”

“ अग बाईऽऽकाड्याची पेटी नाहीं का आणली त्यानं ? ” असें म्हणून ती उठूं लागली.

“ नाहीं, नाहीं, तुम्हाला उठण्याची तसदी घेण्याचें कारण नाहीं. मी मेकॅनिक आहें. यंत्राची बरोबर कळ दाबून त्यांच्याकडून कामें कशीं करून घ्यावीत हें मला समजतें. तुमचा नोकर बहिरा असला तरी या माझ्या विद्युत्घंटेनें त्याला संदेश पोंचविला असलाच पाहिजे. ”

“ म्हणजे ! तुम्हीं पुन्हां घंटा वाजविलीत कीं काय ? अगऽ बाई आतां तो मेला—”

“ अहो, आणलीसुद्धां त्यानं काड्याची पेटी. तो पहा तुमचा नोकर आला ” पण हें काय ? पहिल्यासारखेंच तो एक ताट घेऊन आला होता.

मला वाटतें वसंताचे लक्ष्यांत सर्व प्रकार आला असावा. तो अगदीं पोट धरधरून हसूं लागला. लीलेलाही आतां हसूं आवरेना. आणि त्यांच्या हशाबरोबर माझ्या रागाचा पारा पूर्णांशापर्यंत गेला. मी अगदीं गोंधळून गेलों आणि त्या नोकराला खडसून विचारलें “ गाढवाच्या लेका, तुला काय एवढेंच शिकवून ठेवलें आहे ? ”

नोकरानें मुकाट्यानें तें तबक खालीं ठेविलें आणि जाण्याकरितां तोंड फिरविलें. मला त्याचा अतिशय राग आला. त्या रागाच्या भरांत मीं त्याला मारण्याकरितां हात उगारिला.

" अरे, हो हो. बाळूकाका. " वशा म्हणाला " असं डोकं फिरवून कुठं मेकॅनिकचं काम भागतं काय ? मोटारीला चुकून बॅक स्पीड दिली तर ती मागेंच नाहीं का जाणार ? डोकं चालवावं लागतं. पण तुम्ही काय. नांवाचे मेकॅनिक. यंत्र आडवें चालत नाहीं, उभें करा आणि उभें ठेऊन चालत नसेल तर आडवें करा. पण तें का करा—याचा कधीं तुम्ही विचार करीत नाहीं. "

" वशा लेका, तुझं हें व्याख्यान बंद कर आणि ही काय भानगड आहे त्याचा उलगडा कर बघूं ? "

" अरे पण ऐकून तर घेतलें पाहिजेस—

" हो, हो तर ? " लीला त्याला थांबवून म्हणाली " आतां सांगूंच नये मुळीं आपण. तुम्हाला त्या निर्जीव यंत्राची कळ ठाऊक आहे तर आम्हाला या सजीव यंत्राची कळ माहीत आहे. टाईपरायटर जोंपर्यंत टाइप करणार नाहीं, तोंपर्यंत आमचें तोंड उघडणार नाहीं. "

" वैनी, बऱ्याच आहांत कीं तुम्ही ? " पेटलेल्या सिगारेटची राख झाडीत म्हणालों " पण तुम्ही मला अगदींच सोपं काम सांगितलंत. "

टाईपरायटर मीं चालू करून चार पांच ओळी टाईप करून दिल्या.

"मुके, आंधळे, पांगळे आणि थोटे " वशा आपल्या भसाड्या आवाजांत म्हणूं लागला.

" उगीच काय गाढवासारखा ओरडतोस रे ? " मी त्याच्या तोंडावर हात ठेवीत म्हणालों.

" अहो यांपैकीं पहिल्या वर्गांत आमचा नोकर मोडतो.

विद्युत्घंटा एकदां वाजली कीं चहा-पान वगैरे-अगबाई हें काय ? असें म्हणत लीला चटकन् बाजूला झाली. कॅरेज रिलीजिंगकीवर सहज तिचा हात पडल्यामुळें तो धाडकन् मार्जिन क्लिपवर आदळला. वैनीची ओशाळलेली मुद्रा आणि वसंतरावांचा रडवा चेहरा पाहून माझी हंसून हंसून मुरकुंडी वळली.

" मोडलास वाटत टाइपरायटर " ? वसंतराव चिडक्या आवाजांत म्हणाले.

मी आपलें हंसें दाबून म्हणालों " अरे एखादें लेटर मारून पहा म्हणजे समजेल. "

" तरी मी म्हणत होतों कीं हात लावूं नकोस. पण ऐकते–" लेटर दाबून पाहातांच त्याला समजून आलें कीं तें अर्ध्या रस्त्यांतच आडलें " छे; आंतां काय तें चालणार आहे ? चारशें रुपये गेले कीं नाहीं पाण्यांत.? "

" मी सकाळपासून त्याला इतका जपतों आहें पण– "

" होणारें न चुकेल होइल–"

" पुरें, पुरें, " तो मला मध्येंच थांबवून म्हणाला " तुमचें तत्त्वज्ञान आतां पुरें करा. तुम्हालाच तें नीट करावें लागणार आहे. "

घड्याळांत अकराचे ठोके पडले. मी चटकन् उठून म्हणालों " आता कसलें तें नीट होणार आहे ? आणि मोडलें तरी दुसरें कोणीं थोडेंच मोडलें आहे ! राणीसरकारांच्या हातानेंच. "

" नाहीं हो ! माझा नुसता धक्कासुद्धां त्याला लागला नाहीं. असलं कसलं तें मेलं यंत्र ? " लीला कपाळाला आंठ्या घालून त्या यंत्राकडे पांहात म्हणाली.

" मग मेकॅनिझम् म्हणजे कांहीं चेष्टा नव्हेत " मी म्हणालों " नुसत्या स्पर्शानें विजेसारखीं कामें होतात पण ती कळ कोणती आणि तिचा उपयोग कसा करावयाचा हें मात्र समजलें पाहिजे. "

" अरे पण बाळ्या, याला का आतां नदींत फेकून द्यायचा ? " मी चाललों असें पाहून वसंता म्हणाला.

मी मागें न पाहतांच " बघूं " एवढेंच बोललों आणि बाहेर पडलों.

**मी** वसंतरावाच्या घरून निघालों आणि आपल्या घरची वाट धरली. माझें घर जवळ जवळ गांवाच्या बाहेर असल्यासारखेंच होतें. मी स्वतः एक चांगल्यापैकीं मेकॅनिक् असून माझें वर्कशाप होतें. मग मनासारखें फिटिंग–इलेक्ट्रिक फिटिंग–करून घेतलें असल्यास त्यांत नवल नाहीं. माझी सांपत्तिक स्थिति चांगली असल्यामुळें मीं दोन नोकर ठेविले होते. पण आमच्या राणी-

साहेब म्हणजे एक विलक्षणच व्यक्ति. माझें कोणतेंही काम ती गड्याला करूं देत नाहीं. बाकी आमचें एकमेकांवर प्रेमच तसें आहे. माझी घरीं यावयाची वेळ झाली कीं हिची धडपड सुरू झालीच. मी सुद्धां घरीं जाण्यास नेहमीं उत्सुक असतों.

मीं बेलचें बटन् दाबायला आणि कोणाची तरी चाहूल ऐकूं येण्यास एकच गांठ पडली. दार उघडून दोन हातांनीं माझ्या हातावरील कोट व छत्री काढून घेतली. मी आंत गेलों. ती म्हणाली.

" आतांपर्यंत काय मॉर्निंग वॉकच् चालला होता कीं काय ? " मी एका आरामखुर्चीवर बसलों आणि बूट काढण्याकरितां खालीं वांकलों.

" थांबायचं गडे जरासं " ती लाडिकपणानें जवळ येऊन पुनः म्हणाली.

" कां ? मी कांहीं आतां कुक्कू बाळ नाहीं. " मी हंसत हंसत म्हणालों.

" पण म्हणतं कोण तसं ? आतां बाहेरून दमून येणं झालंय. तेव्हां जरा स्वस्थ पडलं तर नाहीं का चालणार ? "

" बऽऽऽऽऽरं बुवा, मी अगदीं लुल्यापांगळ्या माणसासारखा स्वस्थ पडून राहातों मग तरी झालं ? "

" माझे बूट काढून खुंटीवर ठेवले गेले. खुंटीवर म्हणजे बूट ठेवण्याकरितां आम्हीं खिळे ठोकले होते. त्याच्यावर विजेचा पंखा सुरू झाला. अहाहा ! किती माझी पूर्व–पुण्याई ! मला काय कमी आहे ? पण मनाचे श्लोकांत " जगीं सर्व सूखी असा कोण आहे ? " असा श्लोक आहे. आणि खरोखरचि तसें होतें. रूपगुणसंपन्न स्त्री माझ्यावर प्राणापलीकडे प्रेम करीत आहे. जवळ मुबलक पैसा आहे इतकें असून सुद्धां मी पूर्ण सुखी नव्हतों. मला दारूचें व्यसन असल्यामुळें मिठाच्या खड्याप्रमाणें आमच्या सर्व सुखाची नासाडी करण्यास तें पुरेसें होतें. हें व्यसन लागण्याला कारण संगत. " मोटार ड्रायव्हर म्हणजे दारूबाज असायचाच असा जणूं काय नियमच असल्यामुळें माझ्या वर्कशॉपमध्यें येणारे सर्व ड्रायव्हर्स दारूबाज असल्यास त्यांत नवल नाहीं. आणि त्यांच्याच संगतीनें मी " शराबी " बनलों. माझे मित्र वसंतराव, त्यांची बायको आणि माझी बायको हीं सर्वजण माझें हें व्यसन सुटावें म्हणून खटपट करीत. मीही शुद्धीवर असलों म्हणजे " पुनः दारूला शिवणार सुद्धां नाहीं " असें म्हणत असें. परंतु समोर

'बाटलाबाई' दिसली कीं मी तें सर्व विसरून जाई. वसंतराव तर नेहमीं म्हणे "पहा बरं तुझ्या घरांत सवतीमत्सर सुरू आहे. एखादे दिवशीं असें न होवो कीं आमच्या वैनीसाहेबांनीं त्राग्यानें घरच सोडून जावं" मी यावर नुसता हंसत असें. तिला माझ्या या व्यसनामुळें पुष्कळ त्रास होतो हें मला समजत असे. पण कोणत्या उपायानें माझें व्यसन सुटेल हेंच मला कळत नसे. मी अर्धाच म्हणजे निर्जीव यंत्रांचाच। तेवढा मेकॅनिक होतों. माझें सजीव यंत्र मला दुरुस्त करतां आलें नाहीं.

तिनें चहा केव्हां आणून ठेवला हें मला समजलेंच नाहीं.

"चहा नाहीं का घ्यायचा? इतका कसला मेला विचार करायचा तो!"

तिच्या प्रश्नानें मी घोटाळलों. तरी पण आपल्याला सांवरून म्हणालों "तेवढी बशी तोंडाला लावशील आणि मग मी पिईन असें मला वाटलें."

"इतकं कांहीं त्याचं अगदीं हें करायला नको बरं?" ती उसन्या रागानें म्हणाली.

चहा घेतां घेतां मीं वसंतरावांच्या घरची हकीकत सांगितली. ती ऐकून डोळ्यांतून पाणी येईपर्यंत ती हसली. पण हसतां हसतां एकदम गंभीर होऊन म्हणाली "इकडे निर्जीव यंत्रांचे स्वभावधर्म जाणायचे झाले. परंतु मनुष्याच्या मनाची हालचाल स्वारीला समजत नसली पाहिजे. नाहीं तर तें यंत्र तसेंच ठेऊन येणं झालंच नसतं."

"कां असं काय म्हणून? तें यंत्र कांहीं मोडलेलं नाहीं."

"पण मी म्हणतें. तें यंत्र मोडलेलं नाहीं असं तरी त्यांना कोणीं सांगितलंय? आतां भाऊजी त्या बिचारीला अगदीं फाडून खातील आणि मी म्हणतें ते जरी कांहीं बोलले नाहींत तरी मेलं माणसाचं मन मोठं वाईट असतं. खरोखर, फारच निर्दयपणा करायचा झाला. अग बाई पण हें काय?" ती चटकन् उठून म्हणाली "सैंपाक करायचा टाकून मी बडबडत काय बसलें?"

"अशा रत्नाला माझ्यासारखें किडलेलें कोंदण!। पण त्या रत्नाच्या दिव्य तेजानें हें कोंदण केव्हांतरी साफ होणार यांत शंकाच नाहीं."

आतांपर्यंत किती तरी मोडकीं यंत्रें माझ्या हातून नीट झालीं. पण आमच्या संसाररथाच्या एका चाकांतील दोष मी अद्याप काढूं शकलों नाहीं. महंमदच्या

मोटारचें ओव्हर हौलिंग झालें. सतत सोळा तास काम केल्यामुळें माझीं गात्रें अगदीं शिथिल झालीं होतीं. महंमद बाटली घेऊन आला आणि मीं ती तशीच्या तशीच तोंडाला लावली. दोन तासांनीं काम आटोपलें. मला घरीं पोंचविण्याकरितां महंमदानें आपल्याच मोटारींत घातलें. मला उचलून पलंगावर केव्हां ठेवण्यांत आलें हेंसुद्धां मला समजलें नाहीं.

" अहो वैनीसाब, साहेबांना फार भूक लागली आहे.खायला कांहीं तरी करून आणा. " महम्मद ओरडला.

मला इच्छा होती कीं नाहीं कांहीं सांगतां येत नाहीं. पण मी नको म्हणालों नाहीं एवढें खरें.

" काय बाई माणूस तरी ? शर्थ झाली यांच्यापुढं अगदीं. मेल्यांना लाजा कशा वाटत नाहींत ? " महम्मदाचा पाचकळ स्वभाव असल्यामुळें वरील उद्गार तिच्या तोंडून निघणें स्वाभाविक होतें.

" साहेब, तुमच्या राणीसाहेब फारच तिखट आहेत. " तो माझ्याकडे वळून म्हणाला " त्यांना आपण शांत बनवूं या. हें पाहिलेंत का औषध? त्यानें खिशांतून दारूची बाटली काढली. मला त्यावेळीं त्याचा कांहींच अर्थ समजला नाहीं. मी नुसता हंसून " मऽऽला मदऽऽऽन भासेऽऽऽमलाऽऽआऽऽऽआऽऽ" असें भसाड्या आवाजांत गाणें म्हणूं लागलों.

" अरेरे, वैनीसाब तुमास्नी काय समजत नाहीं? ही शेवन् भजीं कशाला आणलींत? अहो, गोडाचं पाहिजे, गोडाचं "

मी त्याचाच अनुवाद करीत म्हणालों ' गोडाचं पाहिजे. गोऽऽऽडाचं '

" आणखी हें पहा वैनी–इकड या पाहूं जरा.

मी स्वस्थ पडून पाहात होतों. " आलांत का? आहो मी का कोणी परका आहे का? साहेब आणि मी कांहीं दोन नाहीं जसे तुमचे साहेब–पण अगोदर इकडे या पाहूं. " असें म्हणत तो तिचा हात धरण्याकरितां पुढें झाला. मला वाटतें मी थोडा शुद्धीवर आल्यामुळें माझ्या तोंडून स्वप्नांत ओरडणाऱ्या माणसाप्रमाणें एक अस्फुट शब्द बाहेर पडला.

" चांडाळा, तुझ्या जिभेला कांहीं हाड आहे कीं नाहीं? मेल्या मांगा–" असे कांहीं तरी बडबडत ती तेथून निघूनच गेली.

"बघितलंत साहेब त्यांचा मेंदू बिघडला आहे. त्यांना हें औषध पाजलेंच पाहिजे. मी अगदीं खात्रीनं सांगतों कीं आज जर—"

इतक्यांत गड्यानें खाण्याचें कांहीं पदार्थ आणले. महंमद त्याला म्हणाला " जारे, वैनीना म्हणावें, त्यांना साहेब बोलवताहेत.

मी त्या गड्याला म्हणालों " बघऽऽऽतोसः काय गाऽऽऽढवा– " महंमदानें ते पदार्थ मला खाऊं घातले. मी नशेनें अगदीं तर्र झालों. ती केंव्हां आली तेंसुद्धां मला समजलें नाहीं.

" दूर हो मेल्या काळतोंड्या " तिच्या तोंडून निघालेल्या या शब्दांनीं मला जागें केलें. मी डोळे उघडून पाहातों तों महंमद मिस्किलपणानें माझ्याकडे पाहून फिंदी फिंदी हासला.

" तुम्ही आपले पडून रहा साहेब. काय ? शराब पाहिजे ? अरे पन् वैनीसाब तुम्ही अशा परक्यासारख्या दूर कां ? साहेब कांहीं रागावणार नाहींत. त्यांना तुमची आतां गरजच नाहीं. त्यांना आतां दारूशिवाय कांहीं नको आहे. दारू पाहिजे आहे. आणि मला दारू तर हवीच पण तुम्हींही—

" मेल्या मांगा, तुझ्या तोंडांत किडे पडतील किडे. मीच आपली कुठं तरी निघून जातें म्हणजे झालें. ही दारू—माझी सवत जोंपर्यंत या घरांत आहे तोंवर मी कांहीं आतां परत येणार नाहीं. आपण शुद्धीवर नाहीं का येत ? उघड्या डोळ्यांनीं आपल्याला हा गोंधळ कसा बरं पाहावतो ? पण छे. आतां आपल्याला हें समजणार नाहीं. शेवटीं एकदा पदर पसरून आपल्या पायांजवळ एवढीच प्रार्थना आहे कीं हें व्यसन सोडून द्यावं. आपलं जर माझ्यावर खरोखर प्रेम असेल तरच आपलं हें व्यसन सुटणार आहे हेंही मी सांगून ठेवतें. समजतं का मी काय बोलतें तें ?

मी बराच शुद्धीवर आलों होतों. पण बोलतां येईना.माझ्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या.

" अहो वैनीसाहेब " महंमद उठून तिच्याजवळ येऊन म्हणाला. " रडतां काय वेड्यासारख्या ? यांची तुम्हाला भीति वाटत असेल तर तसें सांगा. मी त्यांना बांधून घालून—

" जातें बरं मी आतां. लक्षांत असूं द्या कीं हें व्यसन सोडायचं झालं कीं मी आपलीच आहें, तोंपर्यंत मात्र मी कोठें आहें याचा पत्ता लागणार नाहीं."

" थांब, थांब जातेस कोठें तूं? तूं जाशील पुष्कळ परंतु तुला सोडतो कोण? या मेषपात्र नवऱ्याला भिऊन माझ्यासारख्या—

पुढचे शब्द मला ऐकूं आले नाहींत. कारण ती आणि तो महंमद दोघेंही एकदमच बाहेर पडलीं. मीं उठण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु मला उठतां आलें नाहीं.

माझा सर्वनाश झाल्यानंतर मीं शुद्धीवर आलों. माझ्या पाशवी वर्तनाची मलाच लाज वाटली, पण आतां काय उपयोग?

"अरे, तूं हें मांडलं आहेस तरी काय?" वसंत माझ्याकडे पाहून म्हणालाः— "तुझ्या डोळ्यादेखत तुझ्या बायकोचे असे हाल हाल व्हावेत, तिला भ्रष्टविण्याचा प्रयत्न होत असतां तुला आपले हातपाय हालविण्याचीसुद्धां शक्ति असूं नये? काय ही तुझी दशा! सोन्यासारखी बायको गमावलीस काय म्हणावें तुला? आतां तूं काय करावयाचें ठरविलें आहेस? तिला शोधून आणावयाचा प्रयत्न नाहीं का करावयाचा?"

" वसंता, काय सांगूं तुला? तिनें जातांना 'आपलें व्यसन सुटल्याशिवाय मी परत येणार नाहीं" असें सांगितलें आहे."

" मग तुझें हें व्यसन सुटणार तरी कधीं? का त्या व्यसनांत तूं सुद्धां बुडून जाणार आहेस?"

" छे, छे. वसंता. मला दारू ही सोडलीच पाहिजे. आणि ती मी सोडीन. पण आतां ही किती दिवस दूर राहाते याचा काय अंदाज? या घरांत तिच्याशिवाय एक क्षणभर राहाणें सुद्धां माझ्या जिवावर येतें. मला तिचा पत्ता ठाऊक असता तर मी खात्रीनें तिला घेऊन आलों असतों. पण माझें व्यसन सुटलें आहे अशी तिची खात्री पटल्याशिवाय ती कसली येते? आणि तें केलें तें बरोबरच केलें. वसंता! माझी मलाच आतां लाज वाटूं लागली आहे. स्वस्त्रीच्या पातिव्रत्यावर घाला पडत असतां मी आपल्या डोळ्यांनीं पाहात राहिलों. हर हर!"

ही सर्व तुझ्या दारूची करामत. आम्हीं तुला सांगत होतों त्यावेळीं तुला पटलें नाहीं. त्यावेळींच तूं सावध झाला असतास तर आज अशी स्थिति कशाला झाली असती ? आतां तरी लौकर शुद्धीवर ये. ''

आज चार महिन्यांत मी दारूला शिवलों देखील नाहीं. सर्वांना मोठें नवल वांटलें. कारण माझ्या घरची हकीकत बाहेर कोणाला ठाऊक नव्हती. हे चार महिने मीं कसे घालविले हें माझें मलाच माहीत. रोज कारखान्यांतून घरीं जातांना इकडे तिकडे चौकस दृष्टीनें पाहात जायचा. दाराजवळ गेलें कीं तिच्या धांवण्याचा आवाज येत आहे, असा भास व्हायचा. आणि ती पुढें नाहीं दिसली म्हणजे निराश अंतःकरणानें आरामखुर्चीवर पडावयाचें. तिच्या एक एक आठवणी आठवूं लागलों म्हणजे दोन दोन तीन तीन तास मी खुर्चीवरच पडून राहात असे. पुष्कळ वेळां डोक्यावरची टोपी आणि पायांतलि बूट काढायचेंच मी विसरत असे. तिच्या येण्याची मी नकळत वाट पाहात राहीं. अशा किती तरी गोष्टी मी भ्रमिष्टासारख्या करीत असें. वसंता आला म्हणजे त्याला माझी फार कींव येत असे. पण तो तरी काय करणार ? आपल्याच हातांनीं आपल्याच पायावर कुऱ्हाड मारून घेतली, दोष देणार कोणाला ?

मी निराश हृदयानें वसंताला म्हणें '' नाहीं का रे येणार ती आतां ? ''

'' येईल, येईल बरं वाळ. असाच राहिलास तर आज ना उद्यां ती खात्रीनें येईल. ''

वसंत कांहीं परमेश्वर नव्हता. पण त्याच्या या वाक्यानें मला आनंद होऊन आशेचा एक नवा अंकुर फुटत असे.

रोजच्याप्रमाणें ' ती आली असेल ' या विचारानें मी आज झपाझप पावलें उचलीत घरीं चाललों होतों.

'' अहो मिर्झा, '' कोणी तरी हांक मारली. मी चटकन् मागें वळून पाहिलें. माझ्या कपाळाला आंठ्या पडल्या. मी तिरस्कारानें तोंड फिरविलें.

'' अरे क्यौं साब, नाराज हो क्या ? '' महमद म्हणाला.

मी पुन्हां एकदा तिरस्कारानें त्याच्याकडे पाहिलें.

" बसू, बसू. तुमनें हमारे साथ बात नहीं करना और तुम्हारी गाडीभी वर्कशॉपमें नहीं लाना. " मी तिरसटासारखा त्याच्या अंगावर खेकसून म्हणालों.

" अरे काय, झालं काय बाबा ? " तो विस्मयानें म्हणाला.

" लाज नाहीं वाटत बोलायला ? परस्त्रीच्या अंगावर हात टाकायला लाज नाहीं वाटली तुला ? का तुला आई-बहीण कोणी नाहींच ? "

" बहोत हो गया. मिस्त्री, तुम्ही शुद्धीवर आहां काय ? "

मी तेथून घराकडे जाण्यास निघालों. तो ' आ ' करून नुसता पाहातच राहिला. घराजवळ येतांच माझा हात सहज पुढें झाला. दारावरील घंटेचें बटन दाबलें गेलें. कोणी तरी दार उघडलं. माझ्या हातावरील कोट आणि छत्री घेण्याकरितां दोन हात पुढें आले. पण माझ्याजवळ कोटहि नव्हता आणि छत्रीहि नव्हती कारण मीं ते दोन्हीहि जिन्नस बरोबर न्यावयाचें बंद केलें होतें. रोज रोज निराश व्हावें लागल्यामुळें मला तसें करणें भाग पडलें. मी ते दोन्ही हात हातांत घेतले. माझ्या शरीरांत नवचैतन्याचा संचार झाला. आम्हीं दोघें आंत जाऊन बसतों न बसतों तों वसंत आलाच.

" बाळासाहेब, ओळखतां कां आम्हांला ?

"अरे हो. वैनीसाहेब. पण छे, आतां नुसत्या वैनीसाहेब नाहीं, पळपुट्या वैनी-साहेब, तुम्हांला पटते कां आमची ओळख ? "

" वसंता, ये बैस. तुला कसा विसरेन ? तुझ्यामुळें तर इतके दिवस मी जगलों. आणि हा आनंदाचा दिवस मला दिसला. "

वसंत हसत हसत वैनीसाहेबाकडे पाहून म्हणाला " छे ! छे ! याचें सर्व श्रेय या पळपुट्या वैनीसाहेबांनाच आहे. पण काय रे तुला काय वाटतें सगळे आपल्या-सारखेच ' मेकॅनिक ' आहेत ? "

" तें कसं काय बुवा ? " त्याचा बोलण्याचा रोख न ओळखून मी म्हणालों.

" तूं जेव्हा आमच्या घरीं आलास त्यावेळीं आपल्या ' मेकॅनिझमनें ' चहापान सर्व बोलावून घेतलेंस—अरे पण हें काय ? वैनी का उठून गेल्या ?

" अरे तूं सुद्धां ' मेकॅनिक ' झालास. तूं एक कळ दाबली आहेस. पण छे. मी चुकलों. चुकून तुझा हात त्या कळीवर पडला आहे. ऊं हु. तूं कांहीं मेकॅ-निक नाहींस. "

" मी तुला विचारीन विचारीन म्हणतों आहे पण आठवण होत नाहीं." वसंत मिस्किलपणानें हसत म्हणाला.

" कसली आठवण बुवा ? " मी म्हणालों " आतां तुझ्या त्या आठवणी न् बिठवणी सर्व विसरून जा. आज आहे ' अयोध्येचा राजा.' अरे, पण हें काय ? वैनी ! वसंता कुठं पळून का जात होता ? "

" अहो त्यासाठीं नाहीं मी आलें. मी तुम्हाला दारू पाजवून तुमच्या राणीसाहेबांना पळवून न्यायला आलें आहें. खोटं वाटत असेल तर विचारून पहा पाहिजे तर. "

" कांहीं तरीच बोलतां तुम्ही वैनी." "मी वसंतकडे वळून म्हणालों "काय रे, या काय म्हणताहेत ?"

" म्हणजे ! तूं महमदला विसरलास कीं काय इतक्यांत ?" तो म्हणाला.

" वसंता, आतां त्याच नांवसुद्धां काढूं नकोस. त्याचं नांव ऐकलं कीं माझं डोकं अगदीं फिरून जातं. आजच तो मला भेटला होता. असा खडसावला त्याला. पण निर्लज्ज तो. मलाच म्हणतो ' बहोत हो गया.'

ही हकीकत ऐकून दोघेंहि खूप हसलीं.

" हें बघ बाळ " वशा म्हणाला " तूं जरी निर्जीव यंत्राचा मेकॅनिक असलास तरी आमच्या वैनीसाहेब तुझ्यासारख्या सजीव यंत्राच्या मेकॅनिक आहेत. त्यांनींच हिला महम्मद बनविलें. खरामहंमद ज्यावेळीं दारू पिऊन येत होता त्यावेळीं त्यांनीं त्याला पैसे देऊन त्याचे कपडे व दारू त्याच्या जवळून मागून घेतली आणि त्याला परत पाठवून हा खोटा महमद तुझ्या खनूपटीला बसविला. आतां तरी आलें कीं नाहीं तुझ्या ध्यानांत ? "

आमच्या राणीसाहेब चहा घेऊन येत होत्या. मी म्हणालों " मग इतके दिवस का बरें मला त्रास दिलास ? "

'वसंतरावांचें यंत्र मोडलें त्यावेळची त्यांची परिस्थिति आठवते का ? '

" मोडलेलें यंत्र नीट करावयचें झाल्यास ठोक पीट करावीच लागणार. बाळ्या लेका, आतां मात्र तूं पूर्ण मेकॅनिक झालास. तूं निर्जिव यंत्राचा मेकॅनिक तर तुझी बायको सजीव यंत्राची मेकॅनिक.

# जयाजीराव आणि कमळजा

अर्थात्

## कट फिसकटला !

लेखक—**किरात.**

## अंक २ रा.



### प्रवेश १ ला.

**प्रवेश**—[ जयाजीराव येतो. ]

**जयाजी**—हं मी आहें कुठें ? माझ्या ह्या सभोंतीं सारा काळा काळा काभिन्न काळोख ! ह्या पाहून असं वाटतं कीं मला काय पाताळ लोकांत गाडून टाकलं आहे, कां नरक लोकांत लोटून दिलं आहे, कां आणखी अशाच्च दुसऱ्या कोणत्या तरी एखाद्या भयंकर नीच लोकांत मला फेंकून दिलं आहे ! मी इथं एकेक पाऊल टाकतों आहें, पण काय ? प्रत्येक पावलागणिक माझ्या मनांत मोठे भयंकर विचार येताहेत. खचित मला कुठल्या तरी मोठ्या खट अशा खवीसानं पकडलं असावं, आणि तोच मला चैन म्हणून पडूं देत नसावा ! बिलकूल ! तडफड–नुसती तडफड—चालविली आहेन् त्यानं माझी ! ह्या अशा काळोख्या अन् भर मध्य रात्रीचा अंमल झाला असतां हताश होऊन माझ्यासारखे

वैतागलेले लोक कसकसे भटकत फिरतात आणि आपली व एकाद्या रात्रिंचर खवीसाची अथवा एखाद्या मनुष्य भक्षकाची गांठ पडून त्यानं आपला फन्ना उडवून टाकावा अशी निराशेमुळें किती उत्कट इच्छा करीत असतात, हें सर्व मी स्वानुभवानें जाणतों आहें. पण काय ! किती हतभागी—किती दुर्दैवी आहें मी ! त्या परमेश्वरानं तर एक मला केंव्हांच टाकलं आहेन् ! म्हटलं अंधेऱ्या रात्रींत भटकणारीं हीं भुतंपिशाच्चं तरी माझ्यावर मेहेरबानी करितलि पण हीं सुद्धां मला पाहून अगदीं लांब-दूर-पळून जातात ! कोण केविलवाणी स्थिति ही ! अरे ! अरे ! अरे ! मूर्तिमंत नरकवासच नव्हे का हा ?

( सयाजीराव येतो. )

**सयाजी**—( स्वगत ) छत्, मलाच उशीर झाला. ( उघड ) कोण ? कोण आहे तिथं ?

**जयाजी**—'कोण ? इथं होय ' इथं कुत्रा आहे एक. अन् तो त्या चंद्राकडे पाहून भुंकण्याकरितां आला आहे इथं ! पण काय हो, तुम्हीं ही नसती विचार-पूस करणारे कोण आहांत तें सांगा पाहूं अगोदर ?

**सयाजी**—मी त्या कुत्र्याचाच एक दोस्त आहें. कारण कुत्रं हें जात्या इमानी असून त्याच्या हातून धन्याचा जीव गेला तरी विश्वासघात म्हणून नाहीं व्हायचा. इतकंच नव्हे, पण आपल्या धन्याच्या स्नेह्यांतल्या मंडळीशिवाय लघळपणा करून तें जवळ फिरकायचें सुद्धां नाहीं ! बरी गांठ पडली आपली. कसं काय आहे तुमचं सध्यां जयाजीराव ?

**जयाजी**—होतं तसंच.

**सयाजी**—कमळजा वहिनी कुठें आहे सध्यां ?

**जयाजी**—सध्यां एक दोन तीन दिवस मीं तिला एका बाजूला-तीं कोणाच्या दृष्टीला न पडेल अशी दिली आहें ठेऊन. आतां पुढं पाहूं आणखी, दैवाचे काय काय खेळ होताहेत ते ! पण हें पहा, सयाजीराव, माझं डोकं ताळ्यावर राहावं अशी जर तुमची इच्छा असेल तर यापुढें तूं कमळजेसंबंधानें मला कांहीं विचारूं नये आणि मी कांहीं सांगूं नये, हेंच उत्तम.

**सयाजी**—काय ? कमळजेसंबंधानं मी कांहीं विचारूं नये म्हटलंस ?

**जयाजी**- हो ! हो ! असंच. नांव सुद्धां नको घेऊस तिचं.

**सयाजी**—काय ! नांव सुद्धां नको घेऊं म्हणतोस तिचं ? अरे, पण तिची तब्बेत बिब्बेत तर ठीक आहेना !

**जयाजी**—तिची तब्बेत–!

**सयाजी**—वहिनीची,–तुझ्या बायकोची–तुझ्या अर्ध्या कालिजाची–तब्बेत कशी काय आहे म्हणून विचारलं यांत माझ्याकडून एखादा मोठा अपराध घडला कीं काय ?

**जयाजी**—सयाजीराव, तुम्ही आज अगदीं फार ख्यालीखुशालींत दिसतां ?

**सयाजी**—हो, आहे खरा तसा मी आज. नाहीं पण आपल्याला आणि वहिनींना असे दोघानांही पण आतां ख्यालिखुशालीच–आतां सारेच मजा मारूं आपण ( त्याचे हातांत एक पैशाची थैली देऊन ) नुसत्या पानसुपारीचा खर्च निघेल यांतून. एकट्या मनुष्याचं कांहीं नाहीं; पण लग्न झालं तीं मनुष्याच्या मागं खर्चाचं फार झेंगाट लागतं !

**जयाजी**—ह्याची कोणी लेकानं इच्छा केली होती ? ठीक आहे, असूं दे. पण यानं काय पैदा करायचं ?–बंड, खून, विश्वासघात कीं कांहीं दगाफटका ? बोल, बोल, हें घेऊन यानं कसं कसं मी आपलं वाटोळं करून घेऊं ?

**सयाजी**—मागं ज्या वेळेला तूं मी भेटलों होतों त्यावेळीं आपल्यामध्येंही अशी चलबिचल नव्हती दृष्टीस पडली. पण उलट आपण दोघेहि डोकीं थाऱ्यावर असलेल्या शांत मनुष्याप्रमाणें व एकमकांचं हृद्गत एकमेकांना ठाऊक असलेल्या दिल्दार दोस्ताप्रमाणें वागलों.त्यावेळेपासून हा वेळपर्यंत मन्वंतर बरचसं फिरून जगांत थोडीबहुत सुधारणा घडून आल्यासारखी दिसते; खरं कां हें ? काय अशा काय काय अजब गोष्टी घडून आल्या या दरम्यानच्या काळांत ? पिलाजी-रावांना पश्चाताप झाला आहे कीं काय ? तो आपल्या इमानाला जागणार कीं काय यापुढें ?

**जयाजी**—( संवेगानें ) हे दयाघना नारायणा ! जितक्या कठोरपणानं तुला या थेरड्याला शापून टाकयला येईल तितक्या कठोरपणानं त्याला शापून टाक. पोटदुखीं, कपाळदुखी, वांब आणि हातापायांची खोडाबेडी होऊन ह्याच्या शरीरांतील हाडन् हाडाचा चक्काचूर होऊन जाऊं दे ! आणि त्याच्या आंतड्यांना पिळावर पीळ पडून तीं कांचून कांचून जाऊं देत. इतकीं कीं त्या वेदनांनीं ह्याच्या

जिवाला चैन म्हणून नये पडूं एक पळभर देखील. त्याला ह्याच्या जिवाचं ओझं वाटे तोंपर्यंत जगूं दे. आणि ह्या ओझ्याखालीं वर्षेंचीं वर्षे खितपत पडूं दे. आणि त्यांतच इतकं म्हातारपण येऊं दे त्याला कीं अंतकाळच्या असह्य वेदना आणि भयंकर यातना कशा असतात, त्याचा पुरा अनुभव घेतां यावा त्याला. असा पुरा कुचंबत पडूं दे त्याला; म्हणजे मरतां मरतां तरी येईल कदाचित् त्याच्या लक्षांत, कीं आपली ही अशी स्थिति कां झाली ?

**सयाजी**—जयाजीराव, तुम्ही त्या एकट्या म्हाताऱ्यालाच शापतां; त्याच्या-बरोबरच्या त्या इतर दरबारी सल्लामसलतगारांनाहि कां नाहीं टाकत असेंच शापून ! त्या एकट्यालाच शापण्यांत काय अर्थ ? ते सगळे एकसारखे नीच आणि हरामखोर आहेत !

**जयाजी**—नुसतं शापून काय होणार ? माझ्या शापानं त्यांची काय राखरांगोळी होणार आहे थोडीच ! एक नाहीं दोन नाहीं, पण या वेणीपुरांत अधिकारानं ज्यांच्या डोळ्यांवर धुंदी चढली आहे, असे पांचपन्नास चढेल लोक —नव्हे कुत्ते—आहेत ! हे कुत्रे उकीरड्यावरच कां नाहीं जात सडून ? नुसत्या शापांनीं नाहीं तसें मरायचे हे !

**सयाजी**—नुसत्या शापांनीं कां ? जंबिया, कट्यारी, बरच्या आणि गुद्द्या घ्या हातांत, त्याच फार सुरेख अशा कामाला !

**जयाजी**—पण कुठं आहेत कुठं त्या ?

**सयाजी**—त्यांना हो काय कमी ? या वेणीपुरांत हजारों निघतील त्या ! आणि त्याहि नेकजात आणि कट्टया विश्वासू मंडळीमधून.

**जयाजी**—आपण कल्पनासृष्टींत भकतां आहां झालं कांहींतरी !

**सयाजी**—भकतों आहें ? माझ्या बोलण्याचं तुम्हांला आश्चर्य वाटावं हें मोठं नवल आहे !

**जयाजी**—हं: काय ? हजारों अगदीं नेकजात कट्टे विश्वासू लोक आपापल्या कट्यारी आणि जंबिये घेऊन या वेळीं वेणीपुरांतून बाहेर पडतील म्हणतां ? आणि असं असून इथं सध्यां माझ्याजवळपास एकहि असा दोस्त असूं नये हें नवल नव्हें कां ?

**सयाजी**—हो, नवल तर खरंच ! पण नवल तरी कसलं ? अरे जयाजीराव !

तूं जन्मतःच अत्यंत उदारधी असल्यामुळें-तुझा दोस्त म्हणवणं, मला शोभायचं नाहीं. नाहींतर मी झालों असतों तुझा दोस्त ! पण मी कशाला व्हायला पाहिजे तुझा दोस्त ? माझं तुझ्यावर जितकं प्रेम आहे, त्यापेक्षां तुझ्यावर अधिक प्रेम करणारे असें शेंकडो तुझे दोस्त आहेत; आणि ते जे तुझे दोस्त झाले आहेत ते तुझ्यावर जी भयंकर आग पाखडली आहे ती पाहून झालेले आहेत. तें पहा, -तुला मला एक कांहीं गुप्त गोष्ट सांगावयाची आहे. पण ती गुप्त ठेवीन असं वचन दे पाहूं मला अगोदर ! प्राण गेले तरी बेहेत्तर पण ती बाहेर म्हणून फुटूं देणार नाहीं, अशाबद्दलचा जिम्मा तुझा तूंच घेतला पाहिजेस. आणि तो शपथक्रिया करून.

**जयाजी**—काय ? शपथ घेतली पाहिजे म्हणतोस ? अरे, तूं तर माझा जिवाचा दोस्त. तुला माझ्या अंतःकरणाची पुरी जानपछान. माझ्या नुसत्या शब्दावर जर तुझा विश्वास बसत नसेल तर माझ्या अंतःकरणांत एखादा कांटेरी गळ टाकून तें चांगलं शोधून पहा. माझ्या तोंडावरून माझ्यांत कुचरपणा, भ्याडपणा अथवा नामर्दपणा असावा असं वाटतं कां तुला ? पण जाऊं दे तें. एखाद्या क्षुल्लक कामांत माझं वचन घेऊन तूं मला गुंतवून सोडशील असं मला वाटत नाहीं. वाटेल तीं अवजड जोखमीचीं आणि धडाडीचीं कामें करायला मी केव्हांहि माघार घेणारा नाहीं हें तूं पूर्णपणें जाणून आहेस; असं असतांना तूं माझ्याकडून मला भलत्याच कामाला प्रवृत्त करण्याकरितां शपथ घ्यायला लावशील, असं मला बिलकूल नाहीं वाटत ! मी तुझं अंतःकरण पुरं ओळखतों; आणि तूं माझं ओळखतोस. मग आतांच शंका का यावी तुला ? सांग-सांग बेशक सांग; शपथ कशाबद्दल घ्यायची ?

**सयाजी**—जयाजीराव, शपथ कशाबद्दल घ्यायची एवढं तुम्हांला कळलं कीं पुरं. तुम्हांला अगदीं आनंदी आनंद होऊन जाईल. आपल्याला ज्याच्या संबंधानं शपथ घ्यायची तें धर्माचं अथवा दुसरं कसलं तरी उगीच थोतांड आहे असं नसून केवळ आपल्या स्वातंत्र्याकरितां आणि सृष्टिजन्य मानवी हक्कांकरितां आपल्याला शपथा घ्यावयाच्या आणि हीं दोन्ही परत मिळविण्याकरितां होईल ती खटपट करायची. तीं मिळविण्याकरितां जपजाप्य करीत बसायचं नाहीं अथवा देवाची करुणा भाकून धांवाहि पण करायचा नाहीं. प्रयत्नांची शिकस्त

करायची आणि इष्ट हेतु साध्य करून घेऊन मग सगळ्या जगाला थक्क करून सोडायचं !

**जयाजी**—काय ? स्वातंत्र्याकरितां म्हटलंस ?

**सयाजी**—हो हो स्वातंत्र्याकरितांच आणि मानवी हक्कांकरितां जयाजीराव, आणि ह्यांत एकदां कां यश आलं म्हणजे, पिलाजीरावांच्या जुलूमांतून तुमची सुटका होऊन तुमचं सारं गतवैभव तुम्हांला परत मिळेल. ज्या निंद्य प्रकारामुळें मी अगदीं कांचून गेलों आहें त्यांतून माझी मुक्तता होऊन मलाहि जरा आपलं डोकं वर उचलायला सांपडेल; आणि या वेणीपुरांतल्या साऱ्या नागरिकांना पुनः एकदां स्वातंत्र्य प्राप्त होऊन त्यांच्या अंगीं असणाऱ्या गुणांचं चीज होऊन त्यांच्या कर्तबगारीला वाव मिळेल आणि मग अरेराव बनलेल्या त्या लुच्च्या, पाजी आणि हलकट लोकांचं धाबं दणाणून जाऊन त्यांना आपल्या शहाणपणाचा राजीनामा द्यावा लागून-त्याबरोबरच मुकाट्यानें आपापल्या हुद्द्याच्या जागा पटापट सोडून द्याव्या लागतील.

**जयाजी**—( निःश्वास सोडून ) हंः ! हें सगळं खरं ! पण हें इतकं सारं साध्य करून घ्यायला-तूं काय कर म्हणतोस मला ! माझ्या हातून काय होईल असं वाटतं तुला ?

**सयाजी**—'काय होईल' म्हणजे ? अरे सध्यांच्या अरेरावी मंत्रि-मंडळां-पैकीं एकाला दिखील कां नाहीं तुझ्या हातून लंबे करवणार ?

**जयाजी**—त्या हलकट, पाजी आणि मूर्खशिरोमणींच्या गोतवळ्यांत एखादा पापभीरु, इमानी आणि हुषार मनुष्य असला तर त्याच्यावरहि हत्यार चालविण्याचं मीं मोठ्या आनंदानं पत्करीन. आणि याचं कारण तो असल्या पाजी लोकांच्या कटांत शिरला हेंच ! एकूण त्या पाजी आणि हलकट लोकांवर सूड उगवायचा हेंच कीं नाहीं तुझं म्हणणं ? कबूल आहे मला हें ! इतकंच नव्हें पण हें कृत्य तडकाफडकीं उरकून टाकायला माझे बाहू देखील कसें स्फुरण पावूं लागले आहेत !

**सयाजी**—असं असेल तर घे शपथ !

**जयाजी**—हे आकाशांत चमकत असणारे दिव्य तारे, हा तारापति चंद्र, स्वर्गांतील साऱ्या सत्शक्ति आणि अधोलोकांतील साऱ्या असत् शक्ति यांची

आणि जें जें म्हणून या जगांत मला प्रिय आणि प्यारें आहे त्या सगळ्यांची शपथ घेऊन सांगतों कीं जोंपर्यंत माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत तुझ्याशीं मी केव्हांहि बेइमान होणार नाहीं. आणि तूं सांगितलेली गुप्त गोष्ट प्राण गेले तरी बाहेर फुटूं देणार नाहीं! चल, पाहिजे तर आणखी हें वचन घे. (त्याचे हातावर हात मारतो.)

**सयाजी**—चल, ये तर आतां आपण एकमेकांना एकदां कडकडून भेटूं या. (त्याला भेटून, हलक्या स्वरांत) ऐक, नीट ऐक. वेणीपुराला रेचक देऊन त्याचा सर्वस्वीं सपा उडवून टाकण्याच्या उद्देशानं कांहीं कट्टर मंडळींनीं आपल्या कंबरा कसल्या आहेत. सध्यां हे सारे कटवाले इथून जवळच एका ठिकाणीं जमले आहेत; तिथं मी तुला आतां घेऊन जाणार आहें. तेव्हां आतां तुला अगदीं निधडी छातीच केली पाहिजे! कारण तिथं जे लोक जमले आहेत ते सगळ्या जगाची शांतता खळबळून सोडून त्याला घर्षण करितील असे जबरदस्त, आणि हें सगळं जग जरी हिंस्र, रानटी आणि हिरवट बनलं तरी त्या सर्वांची खोडकी मोडून त्या सर्वांवर आपला करडा अंमल चालवतील असे खमके आहेत. त्यांच्यामध्यें तुला मी घेऊन जाणार आहें. तर यापुढें आतां घाबरून अथवा कचरून चालणार नाहीं.

**जयाजी**—हें सुचविण्याची कांहीं जरूर नव्हती. तरीपण तूं हें सुचवून ठेवलंस हें एकापरीनं बरंच झालं, ही पहा, तुझ्या म्हणण्याप्रमाणें मी आपली छाती निडर आणि निधडी केली आहे! आतां यापुढें सयाजीराव मी भीतीनं गांगरून गेलों आहे असं जेव्हां तुला यत्किंचित्हि दिसून येईल, तेव्हां तूं बेधडक माझ्या काळजाला हात घाल आणि माझ्या काळजाचा अमुक एक भाग भीति खाऊन भेदरून गेला आहे असं सगळ्या जगाला बेछूट दाखवून दे! चल तर आतां तरी खात्री पटते कीं नाहीं? चल, तिकडेच जाऊं. हें पहा, ह्या घटके-पासून आपल्या सगळ्या क्षुद्र विचारांना मी कायमची रजा दिली! आणि माझ्या अंतःकरणांतल्या ह्या साऱ्या करुण, मवाळ आणि लुसलुशीत भागाला इथून पार समूळ उपटून टाकलं! आतां इथं जागा म्हटली म्हणजे ती केवळ फक्त एका सूडालाच दिली आहे! बस्स! या पुढें एकच गोष्ट. सूड! सूड!! सूड!!!

**सयाजी**—सूड आणि स्वातंत्र्य !

**जयाजी**—हो, पण अगोदर फक्त एक सूड–सूडच !

[ जातात.

---

## प्रवेश २ रा.

**स्थल**—आनंदमंदिर.

**प्रवेश**—[ वृद्ध रंगराव प्रवेश करितो. ]

**रंगराव**—दुबळा मनुष्य देखील प्रथमतः आपल्या साऱ्या आकांक्षांची उभारणी त्या महत्त्वाकांक्षेवरच करीत असतो; तोच प्रकार माझाहि झाला. ही महत्त्वाकांक्षा नयनमनोहर पर्वताप्रमाणें दुरूनच रम्य; जोंपर्यंत ही दूर–कल्पनेंतच आहे तोंपर्यंतच ही फार लोभनीय, रम्य आणि मनोहर असते; हिनें रचलेले उंच, स्वर्गाशीं स्पर्धा करणारे मनोरे मोठे मोहक आणि आशाप्रेरक असतात. पण हे मनोरे कशा ढिसूळ आणि भुसभुशीत वाळूच्या पायावर उभारलेले असतात ह्याचें त्याला भान रहात नाहीं. आणि मोठ्या सोसाट्याच्या वावटळींत आणि प्रचंड वादळांत ह्या मनोऱ्यांचें काय होईल याची कल्पनाहि त्याला असत नाहीं ! (कोणी आल्याची चाहूल ऐकून ) कोण आहे तिथं ?

( संपतराव येतो. )

**संपतराव**—मी संपतराव आहें. कसं काय रंगराव ? बाराचा अंमल होऊन गेला असेल नाहीं ? मध्यरात्र उलटून जाऊन, रात्रीचं पाऊल बहुधा उत्तर रात्रींत पडलं असावं. कां–बाराचा ठोका पडला कीं नाहीं अजून ?

**रंगराव**—अहो, हे कालाचे ठोके अगदीं नियमित वेळीं पडायचेच पडायचे. त्यांत कध्धीं अंतर पडायचें नाहीं. पण मनुष्यांत–चंचल, गैरशिस्त व अनियमित मनुष्यांत–मात्र वेळेचा मेळ कध्धींहि रहायचा नाहीं ! इथं येऊन मला तब्बल तीन तास झाले. हा इतका वेळ मला सर्वांची वाट पहाण्यांत या काळोखांत व्यर्थ वेंचावा लागला ! खरोखर, ज्याला म्हणून वेळेची कांहीं किंमत आहे, त्यानं अनिश्चित, माथेफिरू आणि ज्यांना वेळेची कांहींच किंमत कळत नाहीं अशा लोकांशीं बिलकूल म्हणून संबंध ठेवूं नये. असले लोक असले काय आणि नसले काय सारखेच. हे मेले तरी बेहत्तर !

**संपतराव**—कोणाच्या तोंडून येताहेत हे असे अभद्र उद्गार !

**रंगराव**—अभद्र उद्गार ! कां नाहीं येणार ? ठरलेल्या वेळेवर यायला काय झालं तर सगळ्यांना ? केव्हांपासून मी इथं एकटा हा वेळ कंठतो आहे !

( कोणी येत आहेसें पाहून )

[ विठोजीराव येतो. ]

यावें, यावें विठोजीराव ! हें पाह्यलंत संपतराव, ही औंदकर मंडळी म्हटली म्हणजे यांना वाटेल त्यांनीं यांचे कान धरून वाटेल तसं वळवावं आणि यांच्यापुढें एखादा भाकरीचा तुकडा फेकून देऊन यांच्याकडून वाटेल तें काम करून घ्यावं. काय हो ? कोणाच्या तुकड्यावर लुब्ध होऊन पडला होतात इतका वेळ विठोजी-राव ?

**विठोजीराव**—कां हो तुटुक भुदरगडकर ? फारशी गुर्मीची आणि मस्तीची भाषा बोलतां ? मस्ती आली आहे वाटतं फार ?

**रंगराव**—" मस्ती ! " उशीरा यायच येऊन आणि माझी मस्ती काढतां ? थांबा तुमचीच मस्ती काढतों !

[ तरवारीस हात घालतो.

**विठोजीराव**—( तरवार उपसून ) मीहि कांहीं निशस्त्र नाहीं.

[ इतक्यांत विश्वासराव व इतर कटांतील मंडळी येतात. संपतराव विठोजी-रावास आंवरून धरून शांत करतो. व विश्वासराव, संपतराव व विठोजीराव यांचे मागें जातो. ]

**विश्वासराव**—अरेच्या, हें काय ? आपापल्यांत यादवी ! शरम-शरम वाटली पाहिजे याची ! ही काय भांडायची वेळ ? भांडायचं कुणीं ? चोरांनीं, दरवडेखोरांनीं अथवा डाकू भामट्यांनीं भांडावं पाहिजे तर असं ! तुमच्यासारख्या थोर, कुलीन आणि स्वातंत्र्यासारखं महत्कार्य हातीं घेतलेल्या लोकांनीं असं भांडावं ? आणखी आपण जे आणा शपथा घेऊन एक झालों आहोंत ते कां एवढ्याचकरितां ? क्षुल्लक गोष्टीवरून रस्त्यांतल्या उडाणटप्पू-पोरांसारखं भांडायचं म्हणजे काय ?

**रंगराव**—हं: ! पोरांसारखं ?

**विश्वासराव**—रंगराव, द्या द्या पाहूं इकडे तुमचा हात.

**रंगराव**—हात! ह्या मंडळीला मीं आपलं सारं तनमनधन दिलं आहे आणि नुसता हातच काय करतां घेऊन? माझ्या उतारवयाकडे आणि माझ्या स्वभावाकडे मंडळींनीं जरा मेहेरनजर करायला पाहिजे. पण मंडळी काय—एका-पेक्षां एक तापट, एककल्ली आणि करडी! यांच्याजवळ कांहीं खपायचं नाहीं.

**विश्वासराव**—विठोजीराव! कां आपापल्यांत कां बरं हा असा कलह! यापूर्वी सुद्धां एकदां तुम्ही हा आपला हट्टी, कडवा आणि ताठ्याचा स्वभाव टाकून अगदीं मंडळीच्या इच्छेप्रमाणें वागल्याचं मला ठाऊक आहे. अन् त्या वेळेस याच्या अर्ध्यानं सुद्धां तुम्हांला विनवावं लागलं नाहीं! आणि आजच कां मग असे रागाला पेटलांत? शत्रूशीं झगडायचं झालं म्हणजे त्यावेळीं आपापसां-तला पार सारा कलह विसरून जाऊन आपल्या खाजगी शत्रूनांदेखील तुम्हीं कडकडून भेटतां असा तुमचा अन् तुमच्या राष्ट्राचा लौकिक आहे! असं असून मग आजच कां हा असा प्रकार?

**विठोजीराव**—तसं कांहीं नाहीं हो. पण ह्या बुड्ढ्याच्या त्या अपमान-कारक शब्दांनीं—

**विश्वासराव**—विठोजीराव, ते वृद्धाचे अर्थशून्य शब्द. त्याकडे काय इतकं लक्ष द्यायचं. चला भेटा ऐकमेकांना दिलजानी दोस्तासारखे [ विठोजीराव व रंगराव भेटतात. ] भेटा. आणखी एकदां भेटा. चांगले कडूकडून भेटा. चला, या! आपण सगळेचजणं भेटूं या एकमेकांना! आणि अशा आपल्या या एक-जुटीपुढं मग कोणाचं काय चालणार आहे? हें सबंध राष्ट्रचंराष्ट्र सध्यां जुलूस-जबरदस्तीनें अगदीं हातघाईला आलेलं आहे. तेव्हां अशा वेळीं आपल्या एकजूटीनं आपल्याला हें तेव्हांच उलथून टाकतां येईल.

**विठोजी**—मला वाटतं, हें अजीबात उलथून टाकण्यापेक्षां याची थोडी गल्लत करावी.

**विश्वासराव**—छेः छेः! त्याचा समूळ नाशच झाला पाहिजे. आणि तोहि ह्या आजच्या रात्रीं!

[ इतक्यांत सयाजीराव येतात.–ओहो! सयाजीराव आले. या या सयाजी-राव! बरे वेळेवर आलांत. या, या! अगोदर भेटा पाहूं मला एकदां कडकडून. तुमच्याविणं इतका वेळ सारं कसं शून्य वाटत होतं. तुम्हीं म्हणजे आमची

उत्साहमूर्ति आहांत, आमची स्फूर्ति आहांत, तुमची ही समशेर आणि हा लाल-बुंद उग्र चेहेरा पाहिला म्हणजे असं वाटतं कीं निःक्षत्रिय पृथ्वी करणाऱ्या प्रत्यक्ष परशुरामानंच पुनः अवतार घेतला आहे कीं काय !

**सयाजी**—हें पहा, विश्वासराव तुम्ही देतां इतक्या मानाला मात्र मी पात्र नाहीं. आतां तुम्हीं देतांच तर ती गोष्ट निराळी. पण तें जाऊं द्या. आतां अगोदर आपल्या कामगिरीला केव्हांपासून लागायचं ? कां आपलं शेवटपर्यंत फुकट तोंडाच्या वाफा दवडत वायफळ बोलतच राह्याचं ?

**विश्वासराव**—तसं नाहीं सयाजीराव, आपल्या कामाला खरोखरी सुरवात देखील झाली म्हणायची ! दैवाचंच जोरदार वारं खेळूं लागल्यावर मग आणखी काय पाहिजे ? आणि आपल्याच हातून हें सारं घडून यावं असा ईश्वरी संकेतहि पण दिसतो. एकदां टाकलेलं पाऊल माघारीं घेईल अथवा कृत निश्चयापासून ढळेल असा आपल्या या मंडळींत एक देखील भ्याड नाहीं. प्रत्येक जण वाटेल ती साहसाची गोष्ट करायला अगदीं एका पायावर तयार आहे.

**सर्वजण**—हो हो ! आम्हीं सर्वजण विश्वासरावांच्या सल्ल्याबरहुकूम वाटेल तें करायला तयार आहों. त्यांच्याकडून इशारत मिळण्याचा अवकाश.

**विश्वासराव**—इतकी निश्चयी नेकजात खंबीर आणि एकदिलाची मंडळी असल्यावर आणीक काय पाहिजे ? यांची बरोबरी दुसऱ्या कोणाच्यानं करवेल ? आणि त्याचप्रमाणें हे मानी वीर जो विजय आणि जें यश मिळवितील त्यांची तरी बरोबरी कोणाच्यानं करवेल ? हातीं घेतलेल्या या कल्पना तीत कर्तबगारींत जर आपल्याला यश आलं आणि ही राज्यक्रांति कां घडून आली तर ह्याच्यासारखी दुसरी लौकिकाची, कीर्तीची आणि अभिमानाची गोष्ट नाहीं; मात्र जर कां आपले सगळे बेत फसून जाऊन आपल्या पदरांत उलट अपयश पडलं, तर मग मात्र आपले हाल कुत्रा देखील खाणार नाहीं ! मग सगळ्या जगभर दुर्लौकिक आणि अपकीर्ति हींच आपल्या वाट्याला ठेवलेली !

**सयाजी**—विश्वासराव ! तुमच्याकडून नुसती इशारत मिळाली कीं बस्स ! आज दहा हजार हत्यारबंद लोक तुम्ही सांगाल तसें वागायला आणि हवं तें साहस करायला एका पायावर तयार आहेत. अन् प्रत्येक पथकावरील सेनानायक इतके मर्द आणि रणपटू आहेत कीं सगळ्या जगाला देखील स्वतंत्र करण्याची त्यांच्या

अंगांत धमक: आणि हिंमत आहे. आजपर्यंत ह्या त्यांच्या प्रखर, तेजस्वी हिंमतीला पार ग्रहण लागून गेलं होतं, पण आज तुमच्यासारख्या वीरमणींचा उदय झाल्याबरोबर त्या ग्रहणाचा सध्यां मोक्षकाल आला आहे. आजपर्यंतच्या अपमानाबद्दल सूड उगविण्याची ह्यांची इच्छा दिसते. सध्यां ते सगळ्या वेणुपूरभर जागजागीं पसरून राहिले आहेत. ते फक्त आपल्या इषाऱ्याची वाट पहात आहेत. निरर्थक एकेक दिवस लांबत चालल आहे म्हणून त्यांचीच उलट कुरवुर सुरू झाली आहे.

**विश्वासराव**—हो, सयाजीराव, तुम्ही म्हणतां असं खास झालं असेल; पण आपण ही त्यांची कुरवुर काढून टाकूं आतां. आजची ही एक रात्र एवढी जाऊं द्या. ह्या रात्रींतच देऊं एकदां काय उसळून द्यायची ती धनचक्कर! साऱ्या वेणुपुरची कत्तल! काय हो! म्हणजे उद्यां 'वेणुपुरचे अस्सल सरदार' काय ते उरलेले आपणच नव्हे? हो, मग भेटूं आपण एकमेकांना कडकडून! पण ह्या आजच्यां कत्तलीला तयार होण्यापूर्वीं एवढं मात्र मला अगोदर कळलं पाहिजे कीं, ह्या जमलेल्या मंडळींपैकीं कोणाचे आप्त, कोणाचे मित्र, अथवा कोणाचे स्नेही, जर वेणुपुरांत असतील आणि या कत्तलींतून त्यांचा बचाव व्हावा म्हणून जर कोणाच्या कांहीं खटपटी चालू असतील, तर त्यानं तसं अगदीं स्पष्ट आणि खुल्या, अन् मोकळ्या मनानं माझ्यापाशीं कबूल करावं न्! एक सहा कत्तल व्हायची आहे हें तर आतां निश्चित ठरून चुकलेलं आहे! तरी पण आमच्या ह्या दोस्त-मंडळींपैकीं एखाद्याची जरी मी म्हणतों अशी खटपट अथवा इच्छा असेल तर त्यानं पुढें येऊंन बेधडक तसं सांगावन्! त्याच्या एकट्याकरितां देखील हें सर्व राष्ट्राला स्वतंत्र करून सोडण्याचं हातीं घेतलेलें कार्य मी एकदम बेलाशक अंगावाहेर टाकीन. पण त्याचं मन दुखिवणार नाहीं.

**सयाजीराव**—विश्वासराव, दिलदार विश्वासराव! असं जर तुमचं म्हणणं आहे तर जें आहे तें मलाहि तुमच्यापुढें एक गोष्ट मांडणं भाग आहे. या घटकेपर्यंत ही गोष्ट तुमच्यापुढें मला उघड करून सांगतां आलेली नाहीं (सर्व साशंक व चकित होतात) हं! असें बिचकून जाऊं नका. मी काय सांगतों तें नीट लक्ष देऊन ऐका:—माझा एक दोस्त आहे–आणि तो असा दोस्त आहे कीं त्याच्यापासून आजपर्यंत मीं आपल्या ह्या कटासंबंधानं कांहीं देखील चोरून ठेवलं नाहीं. इतकंच नव्हे, पण हें पहा ह्या वेळीं आपण सगळेजण इथं

कशा करितां जमलों आहोंत, हें दिखील त्याला अगदीं खडान् खडा माहीत आहे."

[ सर्व दचकून एकमेकांकडे साशंक मुद्रेनें पहातात. ]

असें दचकूं नका आणि साशंकहि पण होऊं नका. कारण आपण हें कार्य हातीं घेतल्याबद्दल त्याला अतिशय आनंद झाला आहे, इतकंच नव्हें पण आपण जें जें करणार म्हणून ठरविलें आहे त्याला त्याची पूर्ण पसंतीहि आणि संमतीहि पण आहे. त्याच्या अन् माझ्या या बाबतींत शपथाहि पण झाल्या आहेत, आणि त्या अशा कीं मरायची पाळी आली आणि जर कां मरावं लागलं तर दोघें मरूं आणि जगलों तर दोघेहि जगूं! यापेक्षां त्याच्या संबंधानं आणखी काय खात्री पाहिजे तुम्हांला ? मी म्हणतों या गोष्टीची जर तुम्हांला सत्यता पाह्यची असेल तर तो माझा दोस्तहि इथं जवळच आहे.

**रंगराव**—( साश्चर्य ) जवळच आहे! म्हणजे! आहे तरी काय हें! एकूण हा सारा विश्वासघात आणि दगलबाजीच म्हणायची तर—

**सयाजी**—हं तेवढं मात्र माझ्या पदरीं बांधूं नका. मी तुमच्याशीं इतक्या नचोटीनं आणि इमानानं वागलों आहें कीं, असल्या आरोपाला आणि अविश्वासाला मी बिलकुल पात्र नाहीं. मीं यापूर्वीच माझं होतं नव्हतं तें सारं सार्वजनिक भांडागारांत आणून सादर केलं आहे, अन् इतर सर्वांच्या बरोबर मी आपले स्वतःचे प्राण वेंचण्यालाहि तयार झालों आहे. तेव्हां माझ्याबद्दल शंका घेण्याचं तुम्हांला यत्किंचितहि कारण नाहीं. ह्या माझ्या दोस्ताचं हें परिवर्तन अगदीं अनपेक्षितपणें—आणि आजच कांहीं घटकेंच्या पूर्वी झालं असल्यामुळें, ही गोष्ट तुम्हांला या पूर्वी कळविणं मला शक्य नव्हतं. आणि म्हणून सध्यां मी ह्या आपल्या मित्राला तुमच्याकडे घेऊन आलों आहें. आणि तो—आपल्या बरोबरच आपलाहि काय सोक्षमोक्ष होईल तो भोगायला अगदीं एका पायावर तयार आहे. तेव्हां त्याला आपल्या या कटांत घेण्यास आपलं अनुमोदन द्याल, अशी मी आशा करितों. ( कांहीं जण साशंक असल्याचें पाहून:) असे साशंक होऊं नका. माझ्यावर तुमचा विश्वास आहे ना ?

**सर्वजण**—आहे—आहे; पुरा आहे. पण—

**सयाजी**—पण काय ? त्याला कटांत घ्या, आणि मग पाहिजे तर त्याला छानून पहा हवा तसा. आणि त्यांत जर तुम्हांला असं आढळलं कीं हा अगदीं

कुचकामाचा आणि नादान आहे तर मग तुम्हीं बेशक ही माझी कट्यार घ्या ( छातींतून काढून ) ही नेहेमीं मी इथं बाळगतों-आणि ही माझ्यावर आणि माझ्या जिवलग दोस्तावर-दोघांवरहि ही चालवून आपली भीति समूळ नाहींशीं करून टाका !

**कांहींजण**—असं असेल तर कबूल आहे हें आम्हांला. बोलवा इथं आपल्या मित्राला.

**सयाजी**—मित्रा-चल, ये-ये इकडं. ( कटवाल्यांस ) या जगांत ज्याच्या संबंधानं मला गर्व आणि अभिमान वाटतो, असा हा माझा हा एक जीवश्चकंठश्च दोस्त आहे. जयाजीराव ! जयाजीराव ! ये, आंत ये.

[ जयाजीराव सशस्त्र प्रवेश करितो. ]

**जयाजीः**—जयदेव ! जयदेव ! सर्वांना माझे प्रणाम आहेत.

**सर्वजणः**—जयदेव ! जयदेव ! प्रणाम प्रणाम !

**विश्वासरावः**—यांचं हें, इथं आकस्मिक येणं, आणि यांचा हा भव्य, उमदा, कडवा, निश्चयी व वीराला साजेसा चेहेरा-यावरूनच ह्यांच्याबद्दल विश्वास वाटूं लागतो.आमच्या सयाजीरावांची निवड आहे ही. ही गैर असणं शक्य नाहीं. जयाजीराव, सर्व मंडळीच्या तर्फे मी तुमचं स्वागत करितों.

**जयाजीरावः**—आभार आहेत आपले ! सयाजीरावाशिवाय आपल्यांपैकीं कुणीहि न बोलवितां न सवरतां मी इथं आलों याबद्दल तुमच्यापैकीं प्रत्येकाला आश्चर्य वाटेल ! पण तें वाटण्याचं कांहीं कारण नाहीं ! तुमच्यासारखी एक दिलाची, एक विचाराची, हिंमतीची आणि मर्दानी रणगाढी मंडळी जुलूम आणि अन्याय यांचा नायनाट करण्याकरितां एकत्र झालीं आहेत, हें ऐकून माझा आनंद गगनांत मावेनासा झाला आणि माझे बाहू स्फुरण पावूं लागले; आणि म्हणूनच मीं कोणाच्या बोलावण्याची अथवा आमंत्रणाची वाट वगैरे न पाहतां अन् स्वतःचा सारा मानापमानहि चटसारा बाजूस गुंडाळून ठेऊन तुमच्याकडे धांव ठोकली. अन्याय आणि जुलूम यांच्याविरुद्ध मीं ही आपली समशेर उपसलेली आहे. माझ्यावर तुमचा विश्वास नसेल-आणि मीं ही म्यानबंदच करावी अशीच जर तुमची इच्छा असेल,-तर ही मला आतां आपल्या स्वतःच्या छातींतच म्यानबंद करावी लागेल ! ही यापुढें ( म्यान दाखवून ) या मेलेल्या कातड्याच्या म्यानांत म्यानबंद होणार नाहीं ! [रंगराव, विठोजीराव, व संपतराव, हे त्याचेकडे

बारीक दृष्टीनें बघतात. ] पण दरबारांतल्या या नीच, दुष्ट, जुलमी आणि त्या मदोन्मत्त मंत्र्याची एकसहा कत्तल करून टाकावयाला जर तुमची सर्वांची सल्ला असेल, तर ती कामगिरी या जयाजीवर सोंपवा. म्हणजे हा जयाजी तीरासारखा इथून निघून त्यांच्या प्राणांचे ठाव घेईल. त्या दरबाऱ्यांत प्रत्यक्ष माझा सासरा —माझ्या बायकोचा बाप आहे! त्याची देखील हा जयाजी बिलकुल गुमान करणार नाहीं! इतकंच नव्हे, पण त्याचा देखील बळी घ्यायला ही माझी समशेर यत्किंचितहि कचरणार नाहीं! सगळ्या वेणुपुराला आग लावून एकच एक भडका उडवून द्यावा, अशी जर तुमची इच्छा असेल तर तसं सांगा; म्हणजे ह्याच हातानं अगदीं भर दिवसा शत्रूंच्या दारूगोळ्यालाच देतों आग लाऊन! म्हणजे एकदम सगळ्याचा सगळा भडका उडून जाईल!

**रंगराव**—( कुत्सितपणानें व साशंकपणें ) वाः, बोलण्यांत यांचा अगदीं हातखंडा दिसतो बोवा!

**जयाजी**—काय बोलण्यांत हातखंडा म्हणतां? हंः असं मात्र समजूं नका. बोलल्याप्रमाणं मी जेव्हां सर्व कांहीं करून दाखवीन, तेव्हांच तुम्हांला माझा विश्वास वाटेल. एरवीं तो वाटणार नाहीं. तुमच्या मुद्रेवरून—माझ्यावर आणि माझ्या बोलण्यावर तुमचा बिलकूल विश्वास बसत नाहींसा दिसतो. बोला, बोला—मी दगलबाज आहें असं वाटतं तुम्हांला? आणि म्हणून असे भितां आणि कचरतां तुम्हीं मला आपल्या कटांत घ्यायला? अथवा, होंहि पण खरंच, कीं माझ्यासारख्या अगदीं परक्या आणि नवख्या मनुष्यानं तुमच्यांत एकदम यावं आणि अगदीं पहिल्या मुलाखतीलाच ह्या असल्या गोष्टीसंबंधानं हें असं बोलावं, हें दिसण्यांत देखील जरा चमत्कारिक आणि शंकास्पदच! पण याला माझा निरुपायच होता. तेव्हां मी तरी काय करूं? तुम्हीं एकमेकांच्या सल्लामसलतीनें जी गोष्ट उरकण्याचं ठरविलं आहेत तीच गोष्ट करायचं माझ्या डोक्यांत यायला जें कारण झालं आहे तें कारण म्हणजे खुद्द माझ्यावर जो जुलूम आणि अन्याय झाला आहे तो होय. मला डंवचल्यामुळेंच त्यांच्यावर सूड उगविण्याचा माझा पक्का निश्चय झाला. आणि सध्यां मी जो इथं आलों आहे, तो कांहीं अर्धकच्चा असतांना आलों नाहीं. ह्या दरबारी मंडळींचा मी अत्यंत तिरस्कार आणि तिटकारा करतों. ह्या वेणुपूरचीं राज्यसूत्रं सध्यां ज्यांच्या ज्यांच्या हातांत

आहेत, त्या सर्वांना मी शत्रुत्वानं लेखतों. यापुढें माझा स्नेह अथवा माझी दोस्ती म्हटली म्हणजे माझ्यासारखाच ज्यांचा कट्टर निश्चय झाला असेल, आणि जे माझ्यासारखेंच वाटेल तें करायला तयार असतील, त्यांच्याशींच! अरे, अरे, अरे! या वेळीं या जयाजीच्या अंतःकरणांत केवढं विलक्षण काहूर उसळून गेलं आहे, आणि कसा एकच आगडोंब होऊन गेला आहे याची जर तुम्हांला एवढीशी-एवढीशी-जरी कल्पना असती तरी देखील मग, मला आपण होऊन तुम्हांला ही माझी स्थिति सांगण्याचा हा प्रसंग येता ना! दोस्तहो!—

**विश्वास**—जयाजीराव, तुमचे हे दिलदार दोस्त फारच सिधे, निष्कपटी आणि अगदीं खुल्या दिलाचे दिसतात. या, जयाजीराव या. भेटा या विश्वासरावाला कडकडून. यांना कडकडून भेटल्याशिवाय राहवत नाहीं माझ्यानं या प्रसंगीं [ पुढें होऊन जयाजीरावास भेटतो. ] यांची माझी जरी पूर्वीची ओळख नाहीं, तरी यांना भेटतांना माझं हृदय कसं अगदीं उचंबळून येत आहे. कां तें मला समजत नाहीं! मग पूर्वजन्मींचे कांहीं लागेबांधे असल्यास न कळे.

**रंगराव**—दोन तरुण एकमेकांना अशा घट्ट मगरमिठ्या मारीत असल्याचें दृश्य आपल्याला तर नाहीं बोवा आवडत! यापेक्षां एखादं जोडपं-पण जाऊं दे. विश्वासराव, या तुमच्या तरुण दोस्तांची मुद्राच अशी आहे कीं—

**जयाजी**—हंः मी इतकं सांगतों आहें, तरी देखील अजूनहि माझा कोणालाच विश्वास वाटत नाहीं असं मला स्पष्ट दिसतंय. यांच्या या साशंक मुद्रेवरून यांना मी मोठा दगलबाज आणि भयंकर मनुष्य आहे असंच वाटत आहे अजूनी, तर. आतां यांची खात्री करायला एकच तोड उरली आहे, अन् ही तोड म्हटली म्हणजे या सगळ्या जगांत मला माझ्या प्राणाहूनहि प्रिय अशी जी वस्तु आहे—

**रंगराव**—हः हः हः हः! ही काय चीज आहे?

**जयाजी**—अहो वृद्ध दोस्त! हा थट्टेचा आणि उपहासाचा विषय नव्हे. आपल्यासारख्या वृद्धांना तरी एखाद्या उत्साही तरुणाचा असा उपहास आणि उत्साहभंग करणं उचित नव्हे. माझ्यावर तुमच्या सर्वांच्या विश्वासाला पात्र व्हावं म्हणून मी माझी प्रत्यक्ष धर्मपत्नी-माझे पंचप्राण, माझी प्रिया कमळजा हिला तुमच्या हवालीं करणार आहें-नव्हें ओलीस ठेवणार आहें. मग तर आपण माझ्यावर विश्वास ठेवाल ना?

**विश्वास**—याहून दुसरं आणखी जास्त तें काय पाहिजे विश्वास पटवायला ? रंगराव, यानं तरी शंका फिटेल ना तुमची ?

**रंगराव**—निखालस.—निखालस.

**जयाजी**—( विश्वासरावास ) विश्वासराव, एक तुम्हीं आणि आम्हांला वडिलांसमान असणारे हे रंगराव,-अशा दोघांनीं इथं रहावं. बाकीच्या माझ्या दोस्तांनीं इथून क्षणभर बाहेर जाण्याची तसदी घ्यावी. कारण बायकांचा स्वभाव जात्याच विनयसंपन्न आणि लाजाळू असतो. आणि एवढ्याचकरितां तसदी आहे माझी ही आपल्याला ! हा आलोंच मी तिला घेऊन इतक्यांत. सयाजीराव, चल ये. तूंहि ये माझ्याबरोबर. [ दोघे निघून जातात. ]

**विश्वासराव**—( सर्व कटवाल्यांस ) या तुम्ही असें माझ्या मागोमाग या. मी पुन्हां तुम्हांला हाक मारली म्हणजे इथं या. [ सर्वांसह विश्वासराव बाहेर घेऊन जातो. ]

[ थोड्या अंतरावरील दुसरें दृश्य. ]

**जयाजी**—कमळ ! कमळ ! प्रिये, कमळ ! कमळ !

**कमळजा**—अगबाई, कोणी हाक मारली मला इतक्या मोठ्यानं ? अशा अपरात्रीच्या वेळीं जिकडं तिकडं असं अगदीं सामसूम असतांही हांक किती भेसूर वाटते ! तिकडचीच-तिकडचीच हांक ही. पण आजपर्यंत तिकडून इतकी मोठ्यानं अशी कधींच नव्हती मारायची झाली मला हांक. पण आजचे हे शब्द किती भेसूर आणि कर्कश वाटताहेत ! नाहीं तर हेच ' कमळ-कमळ ' हे शब्द माझ्या कानांना किती मधुर, किती गोड आणि सुरेख वाटायचे ! हा जादू-ही मोहनी आज ह्या शब्दांत कां बरं नाहीं ? नाहींतर नुसत्या अशा एकाच हाकेनं मला जसं कांहीं पुरे अगदीं भुरळ पडल्यासारखं व्हायचं ! [ पुन्हां " कमला कमळ " ! अशी हांक ऐकूं येते. ] ( मोठ्यानें ) ही इथं आहे मी. इथं उभं राह्यला सांगून जायचं ना मला ? ही हांक मात्र अगदीं रोजच्यासारखी आहे.

**कमळजा**—काय बाई घटकोघटकी मला ही अशी मोहनी पडते ! मोहनी घालणाराची मूर्ति माझ्या डोळ्यांपुढून कशी ती एक क्षणभर दिखील हालत नाहीं ! ( पुन्हां तेच हांकेचे शब्द ऐकून ) ही इकडं उभी आहे ना मी ? इकडं-इकडं यावं गडे.

**जयाजी**—( शब्दाचे रोखानें जवळ येऊन ) माझी दिशाभूलच झाली होती

**जयाजी**—( सद्गदित होऊन ) तें एक त्या देवाला ठाऊक ! पण आत्तांच्या अंदाजानं ती दीड दिवसाचचि आहे.

**कमळजा**—असं संदिग्ध काय बोलायचं गडे ?

**जयाजी**—सारंच जिथं संदिग्ध आणि अनिश्चित आहे तिथं कोण निश्चयानं बोलूं शकेल ?

**सयाजी**—जयाजीराव ! यापुढं जास्त वेळ काढणं उचित होणार नाहीं. चला पुढं या. आणि ही आपली ठेव यांच्या हवालीं करा. हिच्यासह हे तुमच्याच घरीं राहतील.

**जयाजी**—कमल ! धीर धर-घाबरूं नकोस उगीच. चल हात धर माझा.

[ पुढं जाऊन व विश्वासराव व रंगराव यांस उद्देशून ]

**जयाजी**—दिलदार दोस्त. हा मी आपली ठेव घेऊन इथं आलों आहे. तुम्हांला मी मघाशीं अभिवचन दिल्याप्रमाणं मी आपल्या प्राणाच्याही पलीकडील अशी ही ठेव तुमच्याच हवालीं करून नियोजित कार्यावर जात आहे. हिचं तुम्ही जिवापाड रक्षण कराल अशी मला आशा आहे. हिला तुम्हीं वडिलांसमान आहांत असं समजून, तुमच्यावर सर्वस्वीं विश्वसून ही मी तुमच्या स्वाधीन करीत आहें. आतां तरी माझ्या संबंधानं तुम्हांला अविश्वास वाटणार नाहीं, असं मी समजतों. इतकंहि करून जर मी नादान, कुचकामाचा आणि अविश्वासू आहे, असं जर तुम्हांला आढळून आलं, नव्हे नुसता संशय जरी आला -तरी देखील मग मी हिच्याबरोबर हें आपलं निर्वाणीचं एक हत्यारहि देतों, ( जंबिया देतो. ) हें घ्या -आणि हें मग बेशक हिच्या छातींत-नव्हे माझ्या काळजांतच म्हणाना-खुपसून माझं शासन करा !

**कमळजा**—नाथ-नाथ-नाथ ! काय हें, काय ऐकतें आहें मी हें ? माझ्या-वर इतकं कठोर कसं व्हायचं गडे असं एकाएकीं ?

**जयाजी**—कमल ! कमल ! कमल ! माझ्यावर यांनीं दाखविलेल्या अवि-श्वासानं मला असं कठोर बनविलं आहे ! असं कठोर बनण्याशिवाय दुसरा मार्गच मला उरला नव्हता. कमल, सुखाची तर नाहींच नाहीं-पण ज्याच्या केवळ दुःखाची वाटेकरीण होऊन हीं गेलीं तीन वर्षं ज्याच्याशीं तूं प्रेमानं काढलींस

आणि तींहि पराकाष्ठेचे हाल, कष्ट, सायास आणि संकटं सोसून-तो तुझ्याशीं कसा कठोर होईल ? पण केवळ यांचा विश्वास संपादन करण्याकरितां हा जयाजी-कमल ! तुला यांच्या हवालीं करीत आहें ! हा अधम तुझ्या अलौकिक सद्गुणांबद्दल आणि तुझ्या अलोट प्रेमाबद्दल तुला हा निर्घृण आणि कठोर मोबदला देत आहे, याबद्दल मला क्षमा कर !

**कमळजा**—नाथ-नाथ ! असं करण्यापेक्षां माझे प्राणच कां नाहीं घेऊन टाकीत एकदम आपल्याच हातानं ? कारण यांवर ज्यांचा हक्क आहे त्यांच्या-कडूनच जर ते इतक्या स्वस्त मोलानं विकले जात आहेत तर—अगबाई, काय, करूं तरी काय आतां मी ? पण। मी विचारतें,-कां-इतकं अगदीं कठोर कां व्हायचं पण ? कां बोलायचं कां नाहीं आतां ? तर--यापुढं आतां या पायांचं दर्शन सुद्धां कां नाहीं व्हायचं एकून मला ? काय बाई, असं काय-घडलं तरी काय माझ्या हातून ? काय झाला असा माझ्याकडून, अपराध ? माझं कोणतं असं वाकडं पाऊल पडलं,-कीं ज्यामुळें मी इकडल्या सगळ्या सुखाला आंचवलें ? ( उद्वेगानें ) "तटातूट ! तटातूट" !! अन् तीहि या घटकेपासून ! असंच म्हटलं नाहीं का ? ।अगबाई ! अन्-याशिवाय दुसरी तोडच उरली नाहींना ? इकडं हें असं दारिद्र्य आलं म्हणून तर नाहीं ना असं टाकायचं होत मला ? पण हें पहाः-अगदीं खायला नाहीं, प्यायला नाहीं, अंथरायला नाहीं, पांघरा-यला नाहीं, तरी दिखील पुरवेल हो मला ! नुसती एक फाटकी चिंधी देखील चालेल मला;—पण बाई इकडच्या बरोबर ! तेवढंहि जर—( अर्धेंच बोलणें टाकून )

**जयाजी**—हिचे हे हृदयभेदी करुणोद्गार—ऐकवत नाहींत माझ्याच्यानं. सयाजीराव ! येतों मी. ( एकदम जातो).

**कमळजा**—अहो भावोजी ! एकदां तरी मागं वळून पहायला सांगा. कसं अगदीं तीरासारखं जायचं झालं मला टाकून ! (एकीकडे) देवा ! देवा ! देवा ! ऐकून तरी घ्यायचं मी काय म्हणतें तें—फिरा म्हणून सांगावं त्यांना— ( सयाजीस ) अहो भावोजी !

**सयाजी**—वहिनी, हे वृद्ध सरदार तुम्हांला तुमच्या वडिलासारखे आहेत. हे तुम्हांला आतां तुमच्याच घरीं जेऊन जातील. ह्यांच्यावर विश्वासून तुम्हीं अगदीं

निर्धास्त असा. हे विश्वासरावहि तुमचा वरचेवर समाचार घेतील. मी जातों आतां. जयाजीरावांच्या जोडीनं मला राहिलं पाहिजे. त्याची तुम्हीं काळजी करूं नका. रंगराव, विश्वासराव ! जा–जा आतां तुम्हीं वहिनींना घेऊन. आम्हीं ठरल्याप्रमाणं सारं उरकतों.

**विश्वासराव**—तुम्ही इकडची मुलींदेखील काळजी करूं नका. रंगराव, चला.

**रंगराव**—चला, कमळजाबाई ! चला, माझ्या मागून या.

[ कमळजेसह जातात. ]

**जयाजी**—जयाजीराव, कशाला बघतो आहेस तूं आतां मागं वळून ? त्या वाटेकडे तूं आतां डोळे न फिरविलेलेच बरे ! असा कठोर होतांना तूं आपल्या अंतःकरणांत त्रिशूळासारखे कांटे भरले आहेस ! हो, पण हेच कांटे माझ्या काळ- जांत घुसून त्याचे का नाहीं वाभाडे काढीत ? सयाजीराव,–अहो सयाजीराव ! तुम्हींहि कसे अजून येत नाहीं ? कां तिकडंच गुंतून पडलांत ?

**सयाजी**—( येऊन ) हा पहा, इथं आहें मी !

**जयाजी**—गेली, पार गेली कां ती अगदीं ?

**सयाजी**—हो, ते विश्वासराव, आणि ते रंगराव तिला परत तुझ्या घराकडेच घेऊन गेले. ते तिकडे जायला निघाले आणि मी इकडं यायला निघालों. यापुढें जयाजीराव, हें एवढं आपलं काम फत्ते होईतोंपर्यंत तूं भेटूं मात्र नकोस तिला.

**जयाजी**—नाहीं, मुळींच भेटणार नाहीं.

**सयाजी**—हें पहा, अशा प्रसंगीं मनुष्यानं खंबीरच बनलं पाहिजे. त्याशिवाय गत्यंतरच नसतं. प्राण गेले तरी बेहेतर ! हें कार्य उरकून जाईपर्यंत तूं तिची आठ- वणदिखील करूं नकोस.

**जयाजी**—मित्रा ! काय बोलतोस तूं हें ? अरे, सयाजीराव ! कमलच्या जागीं जर तूं असतास, तर तुझी ही मूर्ति–अगदीं नखशिखांत–मी आपल्या अंतःकरणांत अगदीं पूर्णपणें सांठवून ठेवली असती; तुझ्याकडे डोळ्याचं पातंहि लवूं न देतां एकसारखां–अशीं टक लावून–जागच्याजागीं खिळला जाऊन अस्सा पहात उभा राहिलों असतों; अन् शेवटीं शोकाकुल होऊन गळा दाटून आला असतां, हुंदके देत देतच तुझ्याकडे धांव घेऊन तुला छातीशीं असं घट्ट धरून,

( तसें करून ), मी आपल्या अश्रूंनीं तुला सचैल स्नान घातलं असतं ! आणि मग—

**सयाजी**—जयाजीराव, जयाजीराव ! अरे, किती हळव्या मनाचा आहे तूं ? अरे, मनुष्यानं कांहीं विचार—

**जयाजी**—कसचा विचार ? आणि खरंच सयाजीराव, तुला असं छातीशीं घट्ट धरून मग तुझ्याजवळ-तुझ्याशीं ताटातूट करून घ्यायला कठोर काळीज करून कसा तयार झालों, हें तुझ्याजवळ ओकून टाकलं असतं. आणि असं करण्यांत माझ्याकडून तुझा मोठा अपराध झाला, असं सांगून मीं तुझी क्षमा मागितली असती ! अन् यापुढें भलत्याच एखाद्या वेडगळ महत्त्वाकांक्षेच्या भरीं भरून कोणत्याहि वेड्यावांकड्या नादांत आपण पडणार नाहीं, असं-तुझ्याच गळ्याची शपथ घेऊन-तुला सांगितलं असतं !

**सयाजी**—आणि हें सारं मला आपली 'कमल' समजून केलं असतंस ! असंच ना ?

**जयाजी**—हो-हो, सयाजीराव ! तूं म्हणतोस असंच. पण तूंच पहा-या प्रसंगीं मीं आपल्या मनाचा किती धीर केला आहे ? आजचं माझं वर्तन पाहून तर माझी कमल मला फत्तरफोड हृदयाचा समजून मला शापून टाकायलाहि उद्युक्त होईल !

**सजाजी**—चल, चल. हे सारे विचार सध्यां पार झुगारून दे. हे आपल्या अंगीकृत कार्याच्या आड येतील. आज आपलं पाहिलं काम म्हणजे ही जुलमी सत्ता उलथून पाडण्याच्या प्रयत्नाला लागायचं हें आहे. तर चल, तिकडंच जाऊं. मंडळी आपली वाट पहात असतील.

**जयाजी**—चल, माझी तयारीच आहे. [ दोघेहि जातात. ]

**अंक २ रा समाप्त.**



# अंक ३ रा.



## प्रवेश १ ला.



[ **कमळजा** येते. ]

**कमळजा**—काय करूं देवा! सर्वस्वीं फसलें मी ! ज्याच्यावर मी विश्वास ठेवला, त्यानंच माझा त्याग केला ! विश्वासानं ज्याच्या हातांत मान दिली, त्यानं–त्या दुष्टानंच–याशिवाय आणखी दुसरं तिसरं म्हणूं तरी काय–त्यानंच ती मुरगळून चरचर चिरलीन् ! अन् त्याच्याच पायांत माझ्या पातिव्रत्या-वरसुद्धां कुऱ्हाड पडत होती. आणखी माझे धिंडवडे ते काय व्हायचे व्हायले ? देवा, कुठं ? कुठं जाऊं आतां मी ? कुठं म्हणून भटकूं आणि करूं तरी काय ? देवा ! हाय, हाय, हाय ! या साऱ्या उभ्या जगांत मला विश्रांतीचं असं एक-दिखील ठिकाण नाहीं !

[ इतक्यांत **जयाजी** येतो. ]

**जयाजी**—काय ! मी हा इथं आपले बाहू पुढें सरसावून उभा असतां–ह्या-शिवाय माझ्या कमळला–माझ्या प्राणाला–दुसरं विश्रांतिस्थान कोणचं पाहिजे ? अशी एक वेळ होती—

**कमळजा**—हो. अशी वेळ होती खरी एकदां ! कीं त्या वेळीं ही दुर्दैवी कमळजा जर रडती, आरडती अथवा दुःखी कष्टी झाली असती तर तिची अशी हेळसांड होती ना; त्यावेळीं मीं जर दुःखानं एखादा हुंदका अथवा एखादा सुस्कारा टाकला असतां अथवा नुसतं वाईट तोंड केलं असतं तरीदेखील मला माझ्या प्रियानं आपल्या हृदयाशीं घट्ट कवटाळून धरलं असतन् अन् मल। 'काय झालं ?' म्हणून विचारून माझ्याकडून माझं सगळं हृद्गत काढून घेतलं असतं. त्याशिवाय मला सोडलंच नसतं ! पण तशी वेळ एकदां होती ! आत्तां कुठं आहे पण तशी–माझं दैव अन् त्याबरोबर सगळं मन्वंतर फिरलं आहे सध्यां.

**जयाजी**—हरे राम ! हरे राम ! काय ही हिची स्थिति !

**कमळजा**—खरंच हें पहा किनई-रामानं सीतेचा त्याग केलान् पण तो लोकनिंदेला भिऊन केलान्. तसं करायला त्याला कारण होतं. तिला रावणानं हरण तरी करून नेली होतीन्! तसा कां कांहीं माझा प्रकार होता? आणि म्हणून मला बेधडक दुसऱ्याच्या हातीं देऊन माझी निरवानिरव करायचं झालं? असं करण्यापूर्वी माझं मन, माझी छाती अन् माझा निश्चय हीं तरी कसाला लावून पाह्यचीं होतीं! जी मी आपल्या प्रेमाची आणि सुखाची वांटेकरीण होतें, तिनं, ती आपल्या दुःखाची आणि संकटांचीहि वांटेकरीण आहे हें दाखविलं असतं हवं तसं! अजून पहावी पाहिजे तर माझी परीक्षा मला कसाला लावून! कालची ती कट्यार-ती भयंकर कट्यार-माझ्याबरोबर आंदण म्हणून दिली होती-हो, आंदणच, नाहींतर दुसरं काय? ती परत आणवावी अन् इथं-या काळजाच्या अगदीं मधोमध खुपसून पाहावी! रक्ताचे पाट वाहोत का काळजाचे पैशापैशांएवढे तुकडे होऊन तें उकलून रक्तबंबाळ होऊन बाहेर येवो,-मी हूं कां चूं दिखील करायची नाहीं! माझा निश्चय आणि माझं धैर्य तरी पाह्याचं होतं एकदां-इतकं असून असं टाकायचं मला!—

**जयाजी**—शिव! शिव! शिव! काय हें प्रिय कमल,—

**कमळजा**—काल रात्रीं, मला त्या मांगाच्या-त्या अधमाच्या-हातीं कां दिली तेवढं सांगायचं होईल कां?

**जयाजी**—काय मांगाच्या! अधमाच्या! हंः?

**कमळजा**—हो-हो, मांगाच्या, मांगाच्याच! अशा अपरात्रीं अन् त्या सगळ्या भुरट्यांचा जमाव कशाला जमला होता तिथं! ह्या हातांत मला, अन् त्या दुसऱ्या हातांत तो जंबिया घेऊन मला जी त्या नराधमाच्या हवालीं केली ती काय म्हणून? अन् त्या वेळीं तिथं जमलेल्या मंडळीला उद्देशून म्हणायचं काय तरः-"हिला आणि या हत्याराला मी तुमच्या स्वाधीन करतों; मी नादान आणि कुचकामाचा ठरलों तर हें हत्यार बेधडक हिच्या छातींत खुपसा, आणि तिला सांगा कीं, तुझ्या प्रिय पतीनंच तुला तुझ्या प्रेमाचा मोबदला म्हणून दिला आहे हा!" कां बाई हें असं सांगायचं झालं? तें कां-छपवायचं कां झालं माझ्याकडनं? हो, काय पण वेडी तरी मी! हो, बायकांच्याकडे कां कोणीं असल्या गुप्त गोष्टी कधीं सांगत असतं हो, असंच-इकडं वाटत असेल अन् दुसरं

काय ? एकूण सामान्य बायकांमध्येंच माझी गणना ना! कोणाचं कांहीं असो. ह्या चोरांच्या—त्या गळेकापू मांगांच्या—बंधनांतून मी आपल्या प्रियकराला—माझ्या प्रेमाच्या रत्नभांडाराला आज अगदीं मोकळं—स्वतंत्र करणार! आणि हें घडवून आणण्याकरितां मी काय पाहिजे तें करीन—ही ह्याच पावलीं मी अगदीं तडक राजदरबारीं जातें, अन् मी आपल्या डोळ्यांनीं जें जें काय म्हणून पाहिलं आहे अन् ऐकलं आहे, आणि लौकरच उसळणाऱ्या किटाळाची जी कांहीं मला भीति वाटत आहे, ती सारी जशीच्या तशी मी महाराजांकडे जाऊन त्यांच्या कानावर घालतें.

**जयाजी**—खऱ्या कुलीनांचं आणि शीलवंतांचं जर हें शील असेल तर तूं करीन म्हणतेस तें रास्तच आहे. आतां इतक्यांत जंबिया घेऊन आपल्या छातींत खुपसायला मला सांगणारी तूंच कां ती? अन् एक पळसुद्धां लोटलं नसेल तों तीच तूं आपल्या प्रियकराशीं—आपल्या प्राणाशीं—या दुर्दैवी जयाजीशीं एकदम असा दगाफटका करून त्याचा विश्वासघात करू पाहातेस?

**कमळजा**—( साश्चर्य ) काय? दगा अन् विश्वासघात? आणि तो माझ्याकडून? अन् कसा तो? मी तर बाई हें साहस केवळ माझ्या ह्या प्राणाकरितां म्हणून करणार होतें!

**जयाजी**—पण तें उलट त्याच्या प्राणावरच बेतलं असतं!

**कमळजा**—म्हणजे?

**जयाजी**—म्हणजे काय! सांगतों. सगळं सांगतों तुझ्याजवळ. पण नको—भीतीनं व्यर्थ गांगरून जाशील तूं. तें ऐकून तुला धडकी भरून तुझं काळीज चूर्ण होऊन एकदम फाटून जाईल—अन् माझ्यावर तुझं जेवढं म्हणून प्रेम आहे तेवढं सारं एका क्षणांत गोठून जाऊन तें होतं कीं नव्हतं असं होऊन जाईल! इतकंच नव्हे, पण उलट तूं मग माझा अत्यंत तिरस्कार आणि द्वेष करूं लागशील. इतकं घोर आणि भयंकर आहे, तें कृत्य! अन् इतकंहि असून मीं सांगितलं तुला तें, अन् शेवटीं तूंच जर माझा सगळा विश्वासघात केलास, तर—तर काय मग?

**कमळजा**—शपथ घेऊं कां मी?

**जयाजी**—तुला, अन् शपथ घ्यायला लाऊं? अन् तुझ्यावर माझा विश्वास नाहीं असं मीं आपल्या स्वतःच्या कृतीनं दाखवूं! छेः छेः छेः छेः इतकं क्षुद्र आणि

नीच नाहीं होऊं देणार मी आपल्या मनाला ! मीं जगावं अन् आपलं आत्तां आहे असंच चिरकाल प्रेम रहावं असं तुला वाटत असेल, तर तूं आपलं अंतःकरण अगदीं कोटबंद करून त्याच्यांत मीं सांगितलेलं गुपित अगदीं कडेकोट बंदोबस्तानं ठेव. तें गुप्त ठेवण्याविषयीं मीं देवाधर्माची आणि या जगांत मला जें जें म्हणून प्रिय आहे त्याची अर्थात् या माझ्या प्राणाची शपथ घेऊन,-तें शेवटपर्यंत गुप्त ठेवण्याविषयीं-मीं बांधून घेतलं आहे आपल्याला.

**कमळजा**—हें काय बाई, सांगावं तरी अगोदर कशाबद्दल ही शपथ घ्यायची झालं आहे तें.

**जयाजी**—ऐक ! ऐक ! एक घोर-भयंकर-राक्षसी कृत्य करण्याबद्दल मीं ही शपथ घेतली आहे !

**कमळजा**—( कांपूं लागते ) अगबाई ! कोणचं-कोणचं असं तें कृत्य ?

**जयाजी**—हं. कांपूं नकोस अशी. त्या पिलाजीरावांना कंठस्नान घालून या जगांतून अजिबात नाहींसं करायची !

**कमळजा**—पिलाजीरावांना ! म्हणजे माझ्या बाबांना—बाबांनाच ना ?

**जयाजी**—होय ! होय ! त्यांनाच. आणि तेंहि या माझ्या हातानं ! त्यांना एकट्यांनाच नाहीं पण दरबारांत आणखी दुसरे जे जे त्यांचे साथीदार मंत्री आहेत त्यांचीसुद्धां तीच वाट लागायची आहे. त्यांच्या सगळ्यांच्याच रक्ताचे पाट वाहायचे आहेत. अन् हे माझे स्नेही, हे माझे भाऊ, अथवा हे माझे बापदादे, असं म्हणून जर कोणी आपली तरवार चालवायला कचरले तर त्यांची सगळ्यांच्याकडून हेटाळणी आणि छीः थूः होणार हें ठरून चुकलं आहे.

**कमळजा**—अगबाई ! काय-ऐकतें आहें तरी काय मी हें !

**जयाजी**—हं. अशी घाबरूं नकोस. शहारतेस कां, अन् दचकतेस कां अशी ? घाबरल्याचं अथवा दचकल्याचं एवढंसंसुद्धां दाखवूं नकोस बाहेर. नाहीं तर फटकन् कांहीं तरी दगा व्हायचा ! तुझ्या ह्या अशा घाबरट वृत्तीमुळं जर कांहीं दगा-फटका झाला तर—

**कमळजा**—तर-तर काय ? इथल्याइथं आपल्या या समशेरीला माझा बळी देणार, एवढंच कीं नाहीं ? ही तयार आहें मी या गोष्टीला ! खुपसावी, खुपसावी ! बेधडक आपली समशेर माझ्या छातींत. कां ? मागंपुढं कां पहायचं आतां ? मला कंठस्नान घातल्यावर मग दग्याची नाहीं अन् फटक्याची नाहीं—

कसली भीति म्हणून नाहीं उरायची मग ! हं ! प्रत्यक्ष माझ्या बाबांचा खून ! ज्यांनीं मला जन्म दिला त्यांचा खून ! हो, आजपर्यंत त्यांनीं माझा परोपरीनं छळवाद केला–मीं भीक मागावी इथपर्यंत देखील त्यांनीं मजल पोंचिवली. पण एवढ्याबद्दल कसाब खाटकांकडून त्यांची कांपाकांपी चालली असतां, तीं उघड्या डोळ्यांनीं आणि हंसतमुखानं पहात उभी राहून त्यांच्यावर सूड उगवून कृतकृत्य होऊं ? अन् हा सूड कोणावर ? तर ज्यांनीं मला जन्म दिला त्यांच्यावर ! अन् तेंहि त्यांच्या या अशा उतारवयांत ! पण हें सारं माझ्या हातून बघवेल तरी कसं ? हं: ! ज्यांनीं मला जन्म दिला त्यांच्या रक्तानं हे इकडचे हात विटाळून घेणार ? अन् करवेल–करवेल कां हें या हातानं ? छे:, यापेक्षां पक्कं राजद्रोही बनून ह्या वेणीपूरच्या राज्याची वाटेल तशी विल्हेवाट लावून टाकलेली काय वाईट ! इकडचं असं हें दिलदार मन–आणि असं हें नीच आणि राक्षसी कृत्य करायला तयार ! आणि तेंहि वेठीनं धरलेले गुलाम, ठोले, गळेकापूं आणि दींडदमडीचे मारेकरी यांच्याशीं संगनमत करून ? आणि हें सारं कशाकरितां तर निजलेल्या निरपराधी लोकांचे जागच्याजागीं गळे कापून मिळणाऱ्या दींडदमडींनं आपल्या मुठी भरून पोटं जाळण्याकरितां !

**जयाजी**—म्हणजे ? इतका नीच, नादान आणि गळेकापू समजतेस तूं मला ! निखालस चूक–चूक आहे ही तुझी. खऱ्या दिलदार आणि थोर मनाच्या मंडळींशीं मीं सख्य केलं आहे. भलत्यांशीं नाहीं. त्यांतील प्रत्येक इसमाच्या छातीचा कोट आणि त्याची धडाडी कांहीं विलक्षण आहे. यच्चावत् मनुष्यजातीला कलंक लागण्याजोगं असं यत्किंचित् गैर कृत्य अथवा वर्तन जरी कुठं घडलं तरी तें देखील त्यांना बिलकुल खपायचं नाहीं. त्यांना अद्याप कोणत्याहि दुर्गुणाचं अथवा दुसऱ्या तिसऱ्या लुच्चेगिऱ्यांचं वारं सुद्धां लागलेलं नाहीं. मनुष्यसृष्टि निर्माण झाल्यानंतर अगदीं प्रथमतःच जीं कांहीं थोडीबहुत देवमाणसं निर्माण झालीं असतील त्यांच्या तोडीची प्रामाणिक, विश्वासू, सद्गुणी, सच्ची, दिलदार, इमानी, आणि नेकजात मित्र मंडळीं आहेत ही सारी—

**कमळजा**—( साश्चर्य ) हो कां ? असं असेल तर मग मात्र ठीकच आहे म्हणायचं सारं ! हें पहा काल ज्या मेल्याच्या हातांत—आग लागो त्या मेल्याच्या हातांना–मला द्यायचं झालं तो दिखील हा असाच विश्वासू अन्—

**जयाजी**--( साशंक व साश्चर्य ) म्हणजे !

**कमळजा**--म्हणजे काय? त्या नीचानं सच्चेपणाचं फारच चांगलं वर्तन ठेवलंन् एकून ! अगबाई, ती सगळी हकीगत जर कां मीं सांगितली आतां इकडं तर भडका होऊन जाईल अगदीं इकडचा ! अन् मग काय होईल अन् काय नाहीं तें कुणीं सांगावं ?

**जयाजी**--कमल ! बोल, बोल, असं काय त्यानं वर्तन केलंन् ?

**कमळजा**--काय सांगूं बाई,-पण हें पहा किनई, कालच्यासारखं इथं नव्हे कांहीं आतां मला ठेवून जाऊं.काल रात्रीं,-काल रात्रीं किनई-( कांपूं लागते ).

**जयाजी**--हं बोल-बोल; सगळं बोल काय तें. कांपतेस कां अशी ? असें अर्धच बोलून माझं डोकं नको असं उगीच भणभणून सोडूस !

**कमळजा**--हें पहा किनई काल रात्रीं त्या मांगाच्या हातीं मला दिल्यावर जेव्हां मी इथं आलें अन् एकटीच तळमळत पलंगावर पडले तेव्हां तो-तोच मांग-तोच तेव्हां बेधडक माझ्या--

**जयाजी**--काय-बेधडक-तुझ्या आंगावर हात टाकायला सरसावला ?

**कमळ**--नाहीं, पलंगाजवळ आला. त्याला बघितल्याबरोब्बर इकडं अगदीं सगळ्या अंगास थरकाप कांपरं सुटलं; माझ्या उरांत धसकन् धडकी भरली, आणि भीतीनें गांगरून जाऊन माझी बोबडीच वळली. गळा दाटून आला, आणि एक क्षणभर तर माझ्या हातून बोलवेना दिखिल एक शब्दसुद्धां ! नको नको बाई ती कालची-कालच्या काळ रात्रीची ती नुसती आठवण सुद्धां नको--

**जयाजी**--कमल ! तुझ्या अंगावर तर कांटा उभा राहिला आहे ! भिऊं नकोस, घाबरूं नकोस अशी. काय केलन् त्या चोरानं तें सांग अगोदर ! ( स्वतःशीं ) जयाजीराव आपल्या डोक्याला असं भडकूं देऊं नकोस इतक्यांतच !

**कमळ**--मला त्या राक्षसाच्या हातीं निरवून, इकडून जातांना त्याला बजाऊन जी कट्यार त्याच्याकडे दिली होती ती भयंकर कट्यार उपसून ती मला दाखवून-तो मिस्किलपणानं हंसत हंसत इकडची निंदा करण्याच्या हेतूनं म्हणाला-' ज्याचं तूं आपल्यावर अत्यंत प्रेम आहे असं समजतेस तो तुझा जीव घेण्याकरितां माझ्या-कडे ही कट्यार देतो ! अन् त्याच्यावर तूं विश्वसतेस ! ' केवढं उलटं काळीज हें मेल्याचं ?-अन् असं म्हणून मला लगट करूं लागला तो माझ्याशीं. पण मीं जेव्हां

सारं आकाशपाताळ एक करून टाकून अगदीं गर्दी उसळून दिली, तेव्हां तोहि पण गर्भगळित होऊन मुकाट्यानं तिथून चालता झाला! एकंदरींत कालची रात्र म्हणजे-निभावली म्हणून निभावली म्हणायची! नाहीं तर केवढा कठीण प्रसंग गुदरला होता म्हणून सांगूं? अगबाई! हे असले इमानी आणि नेकजात मित्र! आणि ह्या दैत्यांच्या-नव्हे देवमाणसांच्या हातांत आपली अब्रू, आपला लौकिक, आपला मान, आणि आपले पंचप्राण द्यायचे!

**जयाजी**—आणि कमल! तसाच माझा हा सहावा प्राणहि दिला होता मी त्यांच्या हवालीं अगदीं निःशंकपणानं! धिःकार! धिःकार असो मला, अन् अशा गळेकापू सैतानांना!

**कमळ**—हें काय बाई पण असं म्हणून घ्यायचं स्वतःला दिखिल?

**जयाजी**—(विचार करून) बस्स, असंच! असंच कमल! (निःश्वास सोडून) यासंबंधानं यापुढं एक अवाक्षर दिखिल नाहीं काढायचं सध्यां! जसं कांहीं कांहींच झालं नाहीं! अगदीं आपल्या मनाशीं ठेव सारं-आणि त्याची जरी प्रत्यक्ष गांठ पडली तरीदेखील यासंबंधानं तुझ्या मनांत कांहीं एक नाहीं असं दाखीव. मुळीं ओळखसुद्धां नको देऊंस कशाची. जा, हें रहस्य मला आतां कळलं आहे. तूं स्वस्थ ऐस आतां अगदीं. आणि यापुढं माझ्यासंबंधानं भलतंसलतं, वेडंवाकडं कांहीं एक आणूं नकोस आपल्या मनांत. यापुढं ह्या माझ्या प्राणाला कध्धीं अंतर म्हणून नाहीं देणार, कीं एक पळभरही एकटी सोडून राहणार नाहीं. जा-जा तूं सध्यां-

**कमळ**—काय? इकडं सोडून जाऊं? हें कसं बाई होईल आतां माझ्या हातनं! माझ्यावर रागावून मला सर्वस्वीं एकटी टाकून तर नाहीं ना जायचं मनांत?

**जयाजी**—काय? तुला सर्वस्वीं एकटी टाकून! अन् हा इतका प्रकार झाला असतां? यापुढं असले अशुभ आणि अमंगळ शब्द उच्चारूं सुद्धां नकोस! कारण यापुढें तुला सोडून राह्याचं म्हणजे खुद्द मला प्राणसंकट होणार. मात्र ही आजची रात्र जाऊन आणखी एक रात्र उलटली पाहिजे!

**कमळ**—तर मग पुन्हां इकडची भेट केव्हां व्हायची बाई आतां?

**जयाजी**—लवकरच-लवकरच येईन मी पुन्हां. असा सुमार बाराच्या अंमलाला मी आपल्या या प्राणाजवळ ठेवलेलाच आहें म्हणून समज !

**कमळ**—खरंच कां पण बाई हें !

**जया०**—आतां खरं म्हणून काय आणखी विचारतेस ! ( तिच्या गळ्यावर हात ठेऊन ) तुझ्याच गळ्याची शपथ तर–

**कमळ**—(त्याचा हात काढून) हें काय बाई,शपथ कशाला पाहिजे घ्यायला ?

**जयाजी**—बस्स, इतका विश्वास असल्यावर आणखी काय पाहिजे ? जा, जा तर आतां. मात्र अगदीं सावधपणानं ऐस.

**कमळजा**—काय सांगू बाई ! आत्तां सोडून जायचं म्हणजे माझं काय होतंय अन् कसं होतंय ! कोणसं आलं वाटतं. जातें, पण बाराची मात्र आठवण असूं द्यायचीं. [ जाते.

**जयाजी**—त्याबद्दल नको तुला काळजी. तुझं प्रेम आणि तुझं पातिव्रत्य यांचं जर मला विस्मरण झालं, तर परमेश्वरालादेखील माझ्यासंबंधानं अजीबात विस्मृति पडेल ! या गोष्टीचा जर मला विसर पडला तर मग जनावरांत आणि माझ्यांत अंतर तें काय उरलं ? [ सयाजीराव येतो. ]

**सयाजीराव**—कोण ! जयाजीराव !

**जयाजीराव**—कोण आहे ? कोणीं हांक मारली मला ?

**सयाजी**—आहे, असाच एक तुझा दोस्त आहे ! ( जवळ येऊन ) अरे, पण अशा वेळीं तूं इथं या अशा ठिकाणीं–काय करतो आहेस ? माझी कल्पना होती कीं या वेळीं तूं मोठ्या जोखमीच्या मसलतींत असशील ! पण तूं तर इथंच वहिनीशीं–आपल्या बायकोशीं–गुजगुज गोष्टी करीत उभा आहेस ! काय म्हणावं काय तुला ? आजच्या कत्तलींत तुला तर मंडळींनीं आपला पुढारी म्हणून निवडला आहे. सगळ्यांची मदार सर्वस्वीं तुझ्यावर आहे. अन् तो तूं अशा ठिकाणीं येऊन अगदीं नादान अशा एखाद्या विषयलंपटाप्रमाणें निंद्य आचरण चालवून–सारा व्यूहच्याव्यूह ढांसळून पाडीत आहेस ! धिःकार, धिःकार असो तुला अन् तुझ्या या निंद्य वर्तनाला !

**जयाजी**—म्हणजे ? एक क्षणभर आपल्या पत्नीशीं बोलत उभं राहिल्यानं हातीं घेतलेलं सगळचं सगळं काम असं एकदम ढांसळतं ?

**सयाजी**—अलबत्,-अलबत् ढांसळतं ! संशय कसला यांत ? आपण हातीं घेतललं काम तसंच महत्त्वाचं आहे.

**जयाजी**—हें इतकं महत्त्वाचं आहे असं जर तूं समजत असशील तर तें व्यर्थ आहे. हा तुझा भ्रम आहे ! निव्वळ भ्रम आहे. हें आतांच मी जाणून चुकलों आहे. कारण कल्पनेनें आपण उभारलेल्या भव्य इमारतीच्या मुख्य अशा आधारस्तंभालाच मोठा जबरदस्त भुंगा लागला आहे; त्या कृष्ण भुंग्यानं तो स्तंभ अज्जीबात साराचा सारा पोंखरून टाकला आहे !

**सयाजी**—म्हणजे ? याचा अर्थ नाहीं मी समजलों.

**जयाजी**—याचा अर्थ ! तो गालाला सुरकुत्या पडलेला, रुपेरी केंसाचा, मोठा पोक्त–वृद्ध कपी–तो थेरडा वृद्ध गृहस्थ–रंगराव . नाहीं का,–तो काल रात्रीं तुझ्या वहिनीची भेट घ्यायला गेला होता. आणि तीहि मोठ्या ममताळूपणानं,–तिच्यावर देखरेख ठेवण्याकरितां ! तिची विचारपूस करण्याकरितां ! पण काय ! तिच्यांत कांहीं अज्जब मोहनी आणि जादू आढळल्यामुळं–

**सयाजी**—म्हणजे ? त्यानं बेमुर्वतखोरपणाचं कांहीं हलकट वर्तन केलंन् कीं काय ? छेः पण त्याची काय छाती लागली आहे असं करायची ?

**जयाजी**—छाती ! तो ज्या वेळेला तिच्या समाचाराला गेला ती वेळ म्हणजे अगदीं ऐन मध्यरात्रीची ! अन् अशा वेळीं, अन् थेट तिच्या निजायच्या खोलीपर्यंत जायचं ?

**सयाजी**—काय ? तर वहिनी निजली असतां तो निःशंकपणानं तिच्या खोलींत घुसला म्हणतोस ?

**जयाजी**—हो–हो खोलींत; अगदीं निजायच्या खोलींत ! ती पलंगावर गाढ निद्रिस्थ असून, अस्ताव्यस्त पडली होती अशा वेळीं ! सांगा–सांगा सयाजीराव ! तिच्या निजायच्या खोलींत अशा वेळीं जायचं काय–काय असणार कारण ? मनांत कांहीं तरी पापबुद्धि धरूनच तो तिथं आपल्या नीचपणाला झिलई द्यायला गेला असला पाहिजे. याशिवाय दुसरं काय–संभवतं तरी काय ?

**सयाजी**—( ओंठ चावून व दांत खाऊन ) अरे थेरड्या मांगा !–नाहीं, पण असं खवळून जाऊन नाहीं उपयोगी. ( जयाजीस ) पण त्यानं कोणच्याहि प्रकारें जुलूमजबरदस्ती तर नाहीं ना केलीन् तिच्यावर ?

**जयाजी**—काय जुलूम ! छेः छेः छेः छेः जुलूम कसला ! त्यानं जर तिच्या गळ्यांत हात टाकला असतान्, अथवा आपली रुपेरी दाढी जर त्यानं तिच्या गालावरून फिरविली असतीन्, तर जुलूम होता ! एरवीं कसा व्हायाचा जुलूम ?

**सयाजी**—अरे अरे अरे ! कोण अधमपणा हा ! पण जाऊं दे मरूं दे त्याला-

**जयाजी**—माझंय म्हणणं तेंच आहे. त्याबद्दल विचारच नको सध्यां कारण ह्या वेळेला आपण सर्वांनीं इथं शेवटची काय योजना आहे तें ऐकायला जमायचं होतं. वकीलसाहेब जातीनं इथं येणार आहेत किंवा कसें ?

**सयाजी**—छत्. ते नाहीं येत. त्यांनीं तें सगळं ह्या चोरावर-ह्या थेरड्या वृद्ध कपीवर-ह्या रंगरावावर सोंपविलं आहे ! ह्यावेळीं तुला फार संभाळून वागलं पाहिजे. नाहीं तर त्याला पाहतांच तुझं पित्त एकदम भडकून जाईन. तुझं भानहि नाहींसं होऊन जायचं. त्याच्या ह्या पापी आणि निंद्य कृत्याबद्दल त्याला आपण योग्य शासन करूंच.पण या प्रसंगीं आपल्याला त्याच्याशीं जरा शांत आणि जरा धिम्मेपणानंच वागलं पाहिजे. उगीच घिसाडघाई करून नाहीं उपयोगी.

**जयाजी**—कोण करतंय घिसाडघाई ! हा पहा मी अगदीं शांत-रणक्षेत्रांतील रणस्तंभासारखा शांत झालों आहे !

**सयाजी**—हं, तो पहा, तिकडून त्या दिवाणखान्यांतून इकडंच येत आहे स्वारी. कांहीं तरी-कसल्या तरी विचारांत गर्क असलेल्यासारखी दिसते आहे अगदीं.

**जयाजी**—मेहेरबानी करून यावेळीं तूं हो पाहूं कुठें तरी जरा आड. मी थोडी चांचणी करून बघतों ह्या स्वारीची. त्यांत हा कसा काय टिकाव धरून राहतो तेंच पाहायचं आहे मला.

**सयाजी**—पण फार सावधपणानं हां !

**जयाजी**—छेः त्याबद्दल नको तुम्हांला काळजी. एकदां गोष्ट ठरून चुकल्या-वर मग काय ? ( आपल्याशीं ) काय ? काळासारखे काकडे बनून आपल्या दायादांच्या, आप्तांच्या व साऱ्या गणगोताच्या रक्तानें वेणीपुराला माखून टाक-ण्याबद्दल घनघोर शपथा घ्यायच्या ! अन् ह्याबद्दल मनाला पश्चात्ताप होऊन जर त्यानं उलट खाल्लीन,तर यांत कांहीं पाप होईल ! छेः,पण हा रामोशी आलाच कीं !

[ आड होतो.

[ रंगराव प्रवेश करितो.]

**रंगराव**—तिला तशी पाहतांच माझं भानच सुटलं. मन बहकून अनावर झालं. अन् मी पशू बनलों. माझं डोकं ठिकाणावर राहिलं नाहीं. मनोविकारांच्या तावडींत सांपडणारा मनुष्य, मनुष्य कसला ? त्या मनोविकारांचा बंदा गुलामच तो ! पण गोष्ट होऊन गेली, आतां भिऊन काय होतं ? ( विचार करून ) बस्स ! आतां एकच मार्ग. यापुढं दुसरा मार्गच नाहीं. तिच्या नवऱ्याची–त्या जयाजीची–कशीबशी एकदां गर्दन उडवून–त्याची वाट लावली, कीं झालं ! मग सुटलोंच बहुतेक सहीसलामत. त्याशिवाय यांतून सुटतां येणं शक्यच नाहीं. ( चाहूल ऐकून कानोसा घेऊन ) कोण,–आहे कोण तिथं ?

**जयाजी**—मनुष्य आहे एक, मनुष्य ! (पुढें जातों.)

**रंगराव**—( त्याला पाहून ) ओहो ! तुम्ही तर आमचे नवे दोस्त. आम्हां क्रांतिकारकांत सामील झालेले वीर ! कसं काय ठीक आहे ? तुमच्या मंडळीबद्दल नको तुम्हांला काळजी. खुशाल–आनंदांत आहे ती.

**जयाजी**—अगदीं खात्रीपूर्वक सांगतां ना पण तुम्ही हें ? हिमखंडाप्रमाणं ती थंडबिंड पडली नाहीं ना ? अथवा अग्निस्फुल्लिंगाप्रमाणं गरम अथवा दाहक झाली नाहींना ? हो नाहींतर भलतंच होऊन बसायचं !

**रंगराव**—म्हणजे ? या तुमच्या म्हणण्याचा अर्थ काय तो नाहीं मी समजलों. ( एकीकडे ) याला शंका तर नाहीं आली कांहीं माझ्याविषयीं ?

**जयाजी**—अर्थ ? अंः यांत हो काय इतकं गूढ आहे ! हें पहा बायका जात्याच भित्र्या असतात. पण क्वचित् त्या धीट आणि करारीहि पण असतात. क्वचित् त्यांच्यांत चलबिचल आणि अस्थिरपणा हींहि दिसून येतात. यामुळं साहजिकच तिच्या वृत्तींत एकदम पालट होण्याचा संभव. असं असूनहि मी माझ्या प्रणयमोहिनीला तुमच्यासारख्या मर्द, बाणेदार, वृद्ध पण रंगेल जांबुवंताच्या हातांत अगदीं पहिल्या झूटबेधडक निरवून गेलों कीं नाहीं ? या एकाच गोष्टीनं माझं धैर्य आपल्या निदर्शनाला आलं नाहीं ? पाजी, हलकट, रंगेल, छटेल, वृद्ध जांबुवंत म्हणत असतील तुम्हांला. पण हें पहा, तें ऐकून मी म्हणजे तुमच्या चारित्र्याबद्दल आणि इमानाबद्दल कधीं शंका घेतली आहे, असं नका समजूं तुम्ही केव्हांहि.

**रंगराव**—माझ्यावर नसते दोषारोप करण्याची केव्हांही कोणाची छाती लागली आहे ?

**जयाजी**—आपल्यासारख्या तेजस्वी तरुणा—वृद्धां—संबंधानें हो कोण शंका घेईल ? आणि ती घ्यायला कारण काय ? आपल्या प्रामाणिकपणाची आणि सचोटीची मी केव्हांच परीक्षा करून ठेविली आहे ! आणि मी असें ठांसून सांगतों कीं मला जर कोणी माझ्या अब्रूचा अन् लौकिकाचा संरक्षक वीर निवडायला सांगितला तर मी पट्कन तुमच्याकडे बोट करीन. तुमचं पहिल्यांदा मनगट पकडीन ! कारण मी तुमची पुरीपुरी किंमत ओळखतो !

**रंगराव**—काय ? तुम्ही माझी पुरी किंमत ओळखतां ?

**जयाजी**—हो-हो, अगदीं पुरी. तुमच्यामध्यें फसवेगिरी अथवा लपंडाव यांचा गंधहि नाहीं. आपण जसें आहांत तस्सें दिसतां अगदीं ! मला तुमच्यासारखीं रोखठोकीचीं माणसंच फार प्रिय वाटतात ! चला, या पाहूं तर-आपण एकमेकांना अगदीं कडकडून भेटूं या ! ( हात पुढें करून भेटण्यास जातो, तों रंगराव भीतीनें मागें सरले ) कां ? आतां असें मागें मागें कां ? आणि कांपतां कां असें लटलट ? सर्वांच्या आधीं तुम्हींच क्रांतीला सुरवात केलीत कीं काय ? नाहींतर-हा असा कंप भरायची क्रांति तुमच्यासारख्या बुढ्या तरुणांत कां व्हावी ? ( पुढें होऊन त्याचा हात धरून व एकदम बदलून ) पाजी-मानभावी मर्कटा ! तुला आपल्या पापांतून सहीसलामत बाहेर पडायचं आहे ना ? चल, उपस तर तरवार, आणि उडीव गर्दन ! बोल, तूं उडवितोस कीं मी उडवूं ? क्रांतीला इथूनच आरंभ झाला पाहिजे !

**रंगराव**—( धीर करून ) छाती नाहीं तुमची असं करायची.

**जयाजी**—बुड्ढे जांबुवंत ! भ्रमांत आहांत तुम्हीं अजून-भ्रमांत ! ( कोणी येताहेतसें पाहून ) पण जाऊं दे. हें सारं जगच पापांनीं भरलेलं आणि रचिलेलें आहे. त्याच्यांत क्रांति होऊन तें निवळेल तेव्हां खरं. जा, आपली गर्दन बचाव जा.

[ रंगराव निसटून पुढें येतो, तोंच संपतराव, विठोजीराव, दयाळजी, रामराव, बळिराम व कटांतील इतर मंडळी येतात.]

**रंगराव**—कोण ? संपतराव, विठोजीराव ?

**संपतराव**—होय. तेच.

**रंगराव**—या. या. वेळेवर आलांत अगदीं.

**संपतराव**—पण तुम्हीं असें कांपतां आहां कां ?

**रंगराव**—अहो, अगोदरच ही रात्रीची वेळ; त्यांत हा गारठा; अन्

तशांत साठीपार वय; मग काय विचारतां? वयाच्या मानानें तरुणासारखी उमेद अन् ताकत राह्यची कशी? ताकद नाहीं कीं अवसानहि नाहीं, मग ह्या असल्या गारठयाचा पहिल्यांदा कंबरेवर परिणाम होतो! (एका बाजूनें सयाजीराव व जयाजीराव प्रवेश करून बाजूस उभे राहतात) दोस्तहो! उद्यां क्रांति झाली म्हणजे हा गारठा आपोआपच हटला जाऊन चांगली ऊब येईल!

**सयाजी**—(एकीकडे जयाजीस) छेः छेः! हें नाहीं चांगलं केलंस तूं. इथं अशा नुसत्या टोल्यांनीं काय व्हायचं आहे? खाडकन् एक श्रीमुखांत चमकावून थोबाडच रंगवायला पाहिजे होतसं तूं त्या थेरड्याचं!

**जया०**—हें पहा त्याला पुरी ओळख देऊन, त्याला झोंबेल असं मर्मी बोलून त्याच्या मागं भुंगा दिलाय सोडून. तो आतां त्याचं डोकं खास आंतून पोखरून काढील! (आपल्याशीं) आपल्या पापानंच तो मरेल! परमेश्वरा! मी कुठून या चक्रांत सांपडलों! माझ्याभोंवतीं सारे दगलबाज आणि गळेकापू असे नराधम आहेत या कंपूत! अन् मला भीति वाटते,–हे सारे माझा दुर्लौकिक, नालस्ती, आणि बदनामी करायलाच टपून बसले आहेत! मनुष्य हा, मनुष्यपणाच्या बाहेर-अटकेपार जाऊन–जेव्हां वर्तन करतो, तेव्हां तो मनुष्यच राहत नाहीं. तो मग राक्षसच अथवा दैत्यच बनतो! पण जाऊं दे याचा विचारच नको आतां. हे इकडंच आले. (सर्व कटवाले रंगरावांसह पुढें येतात.)

**रंगराव**—दोस्त हो! बराच उशीर झाला आहे आपल्याला इथं सगळ्यांना जमायलाच. पण झाडून सगळेजण जमलों तरी आहोत कां? कां कुणी राहिले आहेत अजून यायचे? (यादी पाहून) धनसिंगराव! धनसिंगराव आले आहेत?

**धनसिंगराव**—हा मी इथं आहें.

**रंगराव**—संपतराव!

**संपतराव**—हजर आहें मी.

**रंगराव**—बळराम!

**बळराम**—मीहि पण.

**रंगराव**—धनाजीराव, बाबाजीराव!

**दोघे**—आम्हीं केव्हांचे इथं हजर आहोंत. तुमच्या हुकुमाचीच आम्ही वाट पहात आहोंत.

**रंगराव**—ठीक-ठीक. मानाजीराव आणि रामराव तर हे इथंच आहेत; तसेंच हे त्रिंबकराव आणि रणधीररावहि पण. तुम्हीं सारे जातिवंत रणझुंझार मर्द आहांत. उद्यांचा सूर्योदय म्हणजे तुमच्या भाग्याचा सूर्योदय! उद्यां तुम्हीं सगळेजण आपापल्या दौलतीचे खरेखुरे खास आधारस्तंभ होऊन राहणार! वेणुपूर पालथें घालूं पहाणारे-तुमच्या-तुमच्या सर्वांच्या पथकांतील-सगळे सैनिक तयार आहेत?

**सर्वजण**—सगळे,-सगळे, अगदीं कडेकोट तयार आहेत!

**रंगराव**—धनसिंगराव, तुम्हीं आपला पांच हजारी घेऊन राजवाडा रोखा. रामराव, तुम्हीं सचिवांच्या मोहल्ल्याकडे जा. तुम्हीं जयाजीराव, पिलाजीराव सरसुभ्यांना गांठा. सयाजीराव ठरल्याप्रमाणें तुम्हांला मदत करतील; आणि बळराम, तुम्हीं आणि संपतराव दोघं मिळून कोतवाल अन् सेनापति यांना गांठा. (इतरांकडे वळून) आणि तुम्हीं सगळेजण तुम्हांला पूर्वींच आंखून दिल्याप्रमाणें आपापल्या ठरलेल्या जागा रोखून धरून, आपापल्या शिकारींच्या अगदीं गुपचुप-पणें पाळतीवर रहा. ठरल्याप्रमाणें आमच्याकडून इषारा मिळाला कीं मग सगळे-जण एकदम जो जो म्हणून तुमच्या तावडींत सांपडेल त्याच्या छातींत बिलकुल मागंपुढं न पाहतां आपापल्या कट्यारी अन् जंबिये भोंसका; नाहींतर त्यांच्यावर आपल्या तलवारी चालवून एकसहा त्यांची कत्तल करीत सुटा. प्रत्येकाच्या तरवारीनें कितीजणांच्या काळजांचीं आज म्यानं बनविलीं होतीं त्याची दखल कत्तलीनंतर प्रत्येकानं केली पाहिजे!

**जयाजी**—(स्वगत) अरे, अरे, अरे! किती घोर, भेसूर आणि आसुरी विचार हे आहेत या गळेकापूचे! हा पक्का उलट्या काळजाचा दिसतो!

**रंगराव**—हें पहा धनाजीराव, तुम्हीं सगळ्यांच्या पुढें जाऊन पाहिल्यांदा वेणुपुरांतल्या साऱ्या नाक्यांवर आपल्या चौक्या बसवा आणि सारे रस्ते आपल्या कबजांत घ्या. तुम्हीं जातीनं आपला रिसाला घेऊन फेरफटका करून त्यांची देखरेख करा. आणि त्याचप्रमाणें दयाळसिंग, तुम्हीं आपला तोफखाना-आराबा-नगराच्या चारी बाजूला एकदम पसरून द्या; असा कीं, कोणालाहि नगराबाहेर पळून जायला वाव न मिळेल, अन् शत्रू जागच्याजागीं अडकून पडेल! दारूखाना पहिल्याझुट आपल्या ताब्यांत घ्या. हें न जमेल तर सुरुंग

घालून दारूकोठाराचा दरवाजा उडवून देऊन, एकच भडका उडवून द्या ! म्हणजे शत्रू अर्धा। अधिक ठार होईल ! हें काम उरकतांच आम्हांला वर्दी द्या. म्हणजे सार्वत्रिक कापाकापीचा आमच्या कडून इषारा दिला जाईल. हा इषारा मिळाला कीं एकदम कापाकापीला सुरवात ! ही कापाकाप—हीं कत्तल–सुरूं झाली म्हणजे तिथं मग हा पुरुष, ही स्त्री, हा पोर, हा वृद्ध, ह्याकडे बिलकुल लक्ष द्यायचं नाहीं. मग नुसती कत्तल आणि खून ! मुडद्यांचे ढीगचे ढीग पडले पाहिजेत ! सध्यांच्या मुत्सद्यांपैकीं, मंत्र्यांपैकीं आणि अधिकाऱ्यांपैकीं उद्यां सकाळला एकहि जिवंत राहतां उपयोगी नाहीं. यांच्यापैकीं एखादा जरी जिवंत राहला तरी तें फार जाचक होईल. अन् तुमची सारी कर्तबगारी मातीमोल होईल ! मंत्री, मुत्सद्दी आणि अधिकारी यांचं नांव औषधालाहि राहतां कामा नये. त्यांचीं नांवं त्यांच्याच रक्तांत पार बुडवून सोडलीं पाहिजेत.

**जयाजी**—( आपल्याशीं ) हा तर निव्वळ निधड्या छातीचा बेरड आहे ! काळाचा काकडा आहे ! भूतदया आणि माणुसकी यांचा यानं फन्ना उडवून टाकला आहे ! तीं कशाशीं खातात हें देखील हा पार विसरून गेला आहे. रक्ताचे पाट ! कत्तल ! खून ! आणि मुडद्यांचे ढीग ! याशिवाय दुसरंतिसरं याला कांहींहि दिसत नाहींसं झालं आहे! ह्या वृद्धकपीची पैदास खुद्द यमलोकांतून झालेली दिसते !

**रंगराव**—दोस्त हो, आणखी एकच शब्द, आणि तो अखेरचा. मग तुमचा आमचा शेवटचा रामराम ! शेवटचा म्हणण्याचं कारण–यशापयशाचा केव्हांच नियम नसतो हेंच. यांतून आपण जगलोंवाचलों तर पुन्हां भेट ! अन् यांतच दगावलों,–तर हीच अखेरची भेट ! प्रयत्न मर्दाचा आणि विजय जगेल त्याचा ! पण तुमच्यापैकीं प्रत्येकानं एवढं लक्षांत वागिवलं पाहिजे कीं निव्वळ तुमच्यांपैकीं प्रत्येकाच्या नेकीवर, कर्तबगारीवर, आणि हिम्मतीवर,–विशेषतः शीलावर आणि सद्‌गुणांवर सगळ्यांचा लौकिक, सगळ्यांचं हित, आणि सगळ्यांचं जीवित हीं अवलंबून आहेत. तुमच्यापुढें दोन गोष्टी आहेत. कायमचं नांव, किंवा बदनाम ! यांतून वाटेल तें उचला ! (जयाजीस) कां जयाजीराव ! तुम्हीं का असे हात पाय गळठल्यासारखे दिसतां ?

**जयाजी**—कोण मी ? छेः छेः छेः ! आपण म्हणतां तसा प्रकार मुळींच

नाहीं. उलट आपलं हें वीरश्रीचं आणि आवेशाचं भाषण ऐकून मी अगदीं थक्क होऊन जाऊन मला नवी वीरश्री आणि नवं अवसान चढलं आहे! शीलाचे आणि सद्‌गुणाचे पोवाडे इतक्या सुंदर रीतीनं आपल्याशिवाय दुसरं कोण पटवून देणार? [ बाजूस उभा राहतो व सयाजीरावांशीं कांहीं कुजबुजतो ] येतों तर मी, सयाजीराव!

**सयाजी**—तुम्हीं पुढें व्हा मी आलोंच तुमच्या पाठोपाठ.

**जयाजी**—ठीक-ठीक! ( जातां जातां ) यावेळीं मला तें कमळचं चित्र दिसतं, आणि तिचे शब्द आठवतात! तिनं मला या स्वप्नांतून जागं केलं! कमल! कमल! या वेळीं माझ्या मनाची सारी शांति ढांसळून जाऊन तें अगदीं क्षुब्ध होऊन गेलं आहे! ह्या भयंकर संतापाची ही आग, हा भडका, अन् ही धग आतां माझ्यानं सहन करवत नाहींत. हीं शांत करायला,-कमल! तुझ्याशिवाय दुसरं कोण समर्थ आहे? तर आतां तिकडेंच जावं आणि तिथंच सयाजीची वाट पहात बसावं. [ जातो. ]

**रंगराव**—तर मग यापुढं कोणीहि न डगमगतां अथवा अंगीकृत कार्यांत माघारहि पण न घेतां दारूगोळा आणि समशेर यांच्यावर सारी मदार आणि भिस्त ठेऊन आपल्यांतलेच हे जुलमी, मदांध आणि उन्मत्त शत्रू-गोतास काळ झालेले कुऱ्हाडीचे दांडे-होते कीं नव्हते असे करून टाकले पाहिजेत! याशिवाय यापुढें तरणोपाय नाहीं. यांत यश येणं हें सर्वस्वीं आपल्या सर्वांच्या कर्तबगारीवर अवलंबून आहे!

**सयाजी**—छेः छेः हें सारं-रंगराव! त्या जगचालकाच्या इच्छेवर आहे अवलंबून. सत्कार्याला हात घालणाऱ्यांचा तोच वाली आणि साह्यकारी. त्याचंच कृपाछत्र आणि त्याचेच आशीर्वाद पाहिजेत. म्हणजे यशःसिद्धी ठेवलेली.

**रंगराव**—हो, हें तर खरंच. परमेश्वरावर इतकी निष्ठा असल्यावर आणखी काय पाहिजे? आतां इतकी सगळी सिद्धता करून देखीलहि आमच्यांतच जर कोणी एखादा दगलबाज, ठक, गळेकापू अथवा विश्वासघातकी निघाला, तर याबद्दल आपली काय योजना अथवा तजवीज आहे? अशा नराधमाला आपण काय शासन करणार? आणि त्याच्या बेइमानपणाबद्दल त्याच्यावर कसा सूड

उगवणार ? ही सर्वांत महत्त्वाची गोष्ट आहे. आणि ह्या गोष्टीवर कटाची सारी सुरक्षितता अवलंबून आहे.

**सर्वजण**—असल्या गळेकापूनां कंठस्नानाशिवाय दुसरी कोणची शिक्षा ?

**रंगराव**—पसंत-पसंत. अगदीं पसंत ! समजा,-ह्या कटांत असलेला माझाच प्रत्यक्ष भाऊ अथवा पोटचा पोर बेइमान झाला, त्यानं कच खाल्लीन अथवा तो शत्रूला फितूर झाला, तर तिथें दयामाया करून भागणार नाहीं ! तिथं आपली शस्त्रं चालवून—

**सर्वजण**—त्याला कंठस्नानच घातलं पाहिजे !

**रंगराव**—समजा, फंदफितूरीचा नुसता संशय आला—

**सर्वजण**—तरी देखील त्याला तिथल्यातिथं कंठस्नानाचीच शिक्षा दिली पाहिजे !

**रंगराव**—सगळ्यांना संमत आणि कबूल आहे ही गोष्ट ?

**सर्वजण**—हो, हो ! सगळ्यांना कबूल आहे. काय सयाजीराव ! तुम्हीं कां असे मुखस्तंभ ? तुमची कबुली आहे कीं नाहीं या गोष्टीला ?

**सयाजीराव**—म्हणजे ? मलाच मुद्दाम हा प्रश्न विचारण्याचं कारण ? माझ्यावरच दिसतो आहे तुमचा सगळा रोख ! माझ्याकरितांच तर नाहीं मुद्दाम आपण हा प्रश्न उकरून काढलांत ? खास, माझ्याकरितांच ! माझ्याविषयीं तुम्हांला शंका येते आहे कांहीं तरी, हेंच खरं. तर आतां असं करा, ही इथं माझी छाती आहे, आणि या छातीच्या आंतल्या भागांत माझं काळीज आहे. आपल्या कट्यारींच्या अन् समशेरींच्या टोंकांनीं छिनून पहा तें ! अन् मग ठरवा कीं मी फितुरी, द्रोही अथवा विश्वासघातकी आहे कीं तें !

**रंगराव**—अहो, तुमची गोष्ट नाहीं. पण तुमचे तें नुकतेच येऊन मिळालेले दोस्त-ते जयाजीराव आहेत कीं नाहीं ?-ते इतके कसाला उतरतील कीं नाहीं याची मला थोडी भीति वाटते ! कारण पिलाजीराव सरसुभ्यांचे ते जामात आहेत. तेव्हां भलत्याच गोष्टीकडे दुर्लक्ष करून अथवा तिची उपेक्षा करून भागणार नाहीं. भावी संकट जाणून जर त्याचा प्रतिकार केला नाहीं, तर पुढें नरडीला फांस बसेल ! कुठं आहे-कुठं तो तुमचा दोस्त जयाजीराव !

**सयाजीराव**—इथंच असेल कुठं तरी. जातो कुठं ? ( पाहूं लागतो )

**संपतराव**—हा इतक्यांत गेला तो इथून निघून. मात्र त्याची थोडीफार धांदल उडाल्यासारखं दिसत होतं.

**रंगराव**—धांदल! तुम्हांलाहि दिसली तर ती? " काहो, तुम्हीं कां असे गोंधळला?" म्हणून मी त्याला विचारलं मात्र तों त्याचा नूरच गेला एकदम पालटून! आणि त्यानं लागलाच पायहि काढलान् इथून मग! पहिल्यांदा माझं बोलणं तो अगदीं लक्ष्य लावून ऐकत होता. पण मध्येंच जरा तो गोंधळला. अन् मग त्याच्या चेहऱ्यांत असा कांहीं एकदम फरक पडला कीं ज्याचं नांव तें! त्याची मुद्राच पालटली. त्याचे ते दुःखीकष्टी डोळे, अन् तें कडवट आणि उत्साहहीन उतरलेलं तोंड पाहिल्याबरोबर पहिल्या झूट मीं ताडलें कीं, ह्या स्वारीनें खास कांहीं तरी कच खाल्ली आहे! त्याच्या मनांत परस्परविरोधी विचारांचं काहूर उसळून तो गोंधळून गेल्याचं दिसत होतं. इतकंच नव्हें, पण त्याचा निश्चय डळमळल्याचं स्पष्ट दिसत होत. आणि आतां इथून तो नाहींसा झाल्यामुळें तर मला त्याचा अधिकच संशय येतो. तेव्हां आपल्या सर्वांच्या सुरक्षिततेकरितां आणि अंगीकृत कार्याच्या यशस्वितेकरितां त्याला तो आपल्या तावडींतून निसटला नाहीं तोंच-हस्तगत केला पाहिजे आणि—

**सर्वजण**—त्याला कंठस्नान घातलं पाहिजे!

**रंगराव**—अशा बाबतींत-मीं बापाला बाप म्हणणार नाहीं, कीं भावाला भाऊ म्हणणार नाहीं.

**सयाजी**—( एकीकडे ) प्रत्यक्ष आईला आई म्हणणार नाहींस कीं कन्येला कन्या म्हणणार नाहींस तूं!

**रंगराव**—अन् अशा प्रसंगाकरितांच, ही पहा,-ही कट्यार मी आपल्या उराशीं बाळगून ठेविली आहे. ( जयाजीनें त्याचेकडे दिलेली कट्यार काढून दाखवितो ).

**सयाजी**—अन् पुढें?

**रंगराव**—'पुढें' काय? खुपसायची ही, अन् दुसरं काय?

**सयाजी**—( उपहासपूर्वक ) कुठें?

**रंगराव**—कुठें म्हणजे? त्याच्या छातींत!

**सयाजी**—( कट्यार हुसकून घेऊन ) रंगराव! ही कट्यार जयाजीनं आपली

बायको तुमच्याकडे ओलीस ठेऊन आपण दगलबाज ठरलों तर बेधडक ही तिच्या छातींत खुपसा, असं सांगून तुमच्या स्वाधीन केली आहे ना? असं असून तुम्हींच त्याच्याशीं दगलबाजी करूं पाहतां? तो तुमचा विश्वासघात करील ही कल्पनाच अत्यंत खोडसाळ आणि पापी आहे! तो आपल्या कटांत अशाप्रकारें सामील झाला, तेव्हांच तो तुमचा जिवाभावाचा दोस्त झाला. आज आपण सारे इथं एका दिलाचे दोस्त आहोंत; तेव्हां अशा प्रसंगीं इथं असले क्षुद्र विचार तोंडाबाहेर काढणंदेखील पाप आहे! त्याचा उच्चार केल्यानं दुसरं तिसरं कांहीं नाहीं; पण आपापसांत नसती यादवी माजेल, आणि हातीं घेतलेल्या कार्याचा नाश होईल!

**संपतराव**—( सयाजीचें बोलणें न ऐकतां ) उपसा, सगळेजण उपसा आपापल्या समशेरी! अन् हें सगळं घर धुंडाळून त्याला हुडकून काढून इथल्याइथं कंठस्नान घाला!

**सर्वजण**—तो ठार झालाच पाहिजे; त्याला कंठस्नान घालून रक्तबंबाळ करून सोडला पाहिजे!

**सयाजी**—त्याला ठार करणार? कोणाच्या तोंडून निघताहेत हे शब्द? कोण कोणाला रक्तबंबाळ करणार? माझ्या जिवलग दोस्ताला? बोला, कोणाची छाती आहे? ( प्रत्येकाकडे वळून ) तुमची,—तुमची,—तुमची? बोला, तुमची आहे कां संपतराव? कां कोणींच बोलत नाहीं! कां,—असे आँ करून कां उभे आतां? कांहीं शकूनबिकून पाहतां, कीं सध्यां जो तुमचा देव बनला आहे त्याच्या—त्या फत्तरफोडाच्या—तोंडच्या एकाद्या आज्ञेची वाट पाहतां? काय, अजून नाहीं तुमच्या तोंडून शब्द निघत? ( इतरांकडे वळून ) अन् तुमच्याहि तोंडून? ऐका—ऐका तर,—जे जातिवंत भ्याड असतात त्यांच्या अंगीं अतिशय मोठा गुण म्हटला म्हणजे त्यांचा संशयखोरपणा!

**रंगराव**—( तरवारीस हात घालून ) भ्याड! कोण भ्याड?

**सयाजी**—अहो, जांबुवंत वीर! आपली तलवार जरा बाजूलाच ठेवा. पहा, तिला हात घालतांच तुमचा हातहि कांपूं लागला! या अशा निकराच्या प्रसंगीं असा बेबनाव नाहीं उपयोगी. हें बेकीचं भगदाड ताबडतोब एकदम बुजवूनच टाकलं पाहिजे! या वेळीं माझं डोकं फार भडकून गेलं आहे. तरी पण या योगानं आपल्या दोस्तींत नको आहे माझ्या मनांतून अंतर यायला!

**संपतराव**—जोंपर्यंत आम्हां सर्वांचा सुरक्षितपणा निश्चित झाला नाहीं, तोंपर्यंत ही दोस्तीहि निश्चित नाहीं !

**सयाजी**—पुनः आपलंच ! कोण बोललं हें ?

**संपतराव**—मी तो संपतराव !

**दयाळसिंग**—अन् हा मी दयाळसिंग !

**रंगराव**—मीहि तेंच म्हणतों.

**सर्वजण**—आम्हां सगळ्यांचं असंच म्हणणं आहे.

**रंगराव**—बोला-बोला, माझ्यासारखं कोणाचं म्हणणं आहे ?

**संपतराव**—प्रत्येक इमानी क्रांतिकारकाचं. आम्हीं मर्दासारखे मारतां मारतां मरूं. आम्हांला गुलामासारखं मरणं नको आहे. दुसऱ्याच्या विश्वासघातानं गुलामगिरींत रखडणं कुणाला सहन होईल ?

**सयाजी**—'विश्वासघात ! गुलामगिरी !' पुन्हां एकवार हे शब्द बाहेर पडूं द्या. कीं हा सयाजी तडक मंत्री-दरबारांकडेच चाललाच म्हणून समजा ! अन् मग तुम्हां सगळ्यांना एका क्षणांत कुत्र्यासारखं एका दावणींत उभं करून तुमचीं सर्वांचीं मुंडकीं पटापट तोडवतों त्यांच्याकडून ! (कांहींजण तरवारी उपसतात तें पाहून) कां ? भित्र्या भागूबाईप्रमाणें आपल्या तरवारी अशा अर्धवट कां काढतां म्यानाच्या बाहेर ? चांगल्या सबंध उपसा, आणि चमकावा माझ्यासारख्या ! छेः छेः तुम्ही मृत्यूला भितां. मरणाला तोंड देण्याची छातीच नाहीं तुमची ! त्याला कंठस्नान घालण्याची आणि ठार करण्याची भाषा म्हणजे म्याडांच्या नुसत्या वल्गना आहेत !

**रंगराव**—भ्याड कोण तें दिसतंच आहे. जा-जा, दरबाराकडे अस्सेच्या अस्से तडक पळत जा ! अन् स्वतःची कातडी बचावण्याकरितां अगदीं बेफिकीरपणें ह्या कटाची खडान् खडा माहिती देऊन आमचा विश्वासघात करा, गळे कापा, काय वाटेल तें करा; आणि आपले प्यारे प्राण बचावा ! हंः ! मरायला आम्हीं भितों काय ? ज्यांनीं आपलीं शिरं हातावर घेतलीं आहेत, ते मरणाला कधींच भीत नसतात. तुम्हांलाच मृत्यूची धडकी भरलेली दिसते. आणि म्हणूनच दगलबाज होण्याशिवाय तुम्हांला गत्यंतरच उरलेलं नाहीं !

**सयाजी**—बुड्ढया गर्दभा ! हा तुझा आरोप निव्वळ खोडसाळपणाचा नाहीं ? या तरवारींच्या पात्यांत तुला तुझा मृत्यु दिसून शाहरे नाहीं भरत तुला ? भ्याड ! दगलबाज ! कोण ? जयाजींची बायको तुला अनुकूल होती तर ही दगलबाजी तुला आठवली नसती ! उः शीलभ्रष्टतेची कुजट घाण मारते आहे इथं ! मर-मर, आपल्या मरणानंच मर ! बोला-बोला, आणखी कोणाला मरायचं आहे ? ज्याला मरायचं असेल त्यानं माझ्या दोस्तावर आपलं हत्यार उचलावन्, बोला,-कोणाची शामत आहे शस्त्र उचलायची; तुमची,-तुमची,-तुमची, आहे छाती ! तुमच्या नादानपणाची-हीं तुमचीं रखरखीत, निस्तेज आणि चिपाडलेलीं तोंडंच-साक्ष देताहेत ! चला, म्यानबंद करा आपलीं हत्यारं अन् चालते व्हा घरोघर; आणि ठरल्याप्रमाणें उद्यां आपापल्या आंखून दिलेल्या ठिकाणीं वेळेला हजर व्हा. ज्याला आपल्या अब्रूची अन् लौकिकाची चाड असेल, शब्दाची किंमत असेल, आणि शपथेची स्मृति असेल, त्यानं त्यानं अगदीं ठरल्यावेळीं हजर राहिलंच पाहिजे. आणि मीहि पण-ज्याच्या रक्ताचा घोट घेण्याकरितां तुम्हीं इतके उतावीळ झालां आहांत, त्याला-तुमच्या बरोबरीनें वाटेल तिथं आपला जीव धोक्यांत घालण्याकरितां-आपल्याबरोबर घेऊन येतों ! त्याच्याबद्दल तुम्हीं अगदीं निश्चिंत असा. ठरल्यावेळीं आम्हीं दोघेहि त्या जागीं हजर आहोंत म्हणून समजा. चला, जा तर आतां निघून, आणि उद्यांच्या तयारीला लागा आतां-पासून. जा-जा म्हणतोंना मी ? [ रंगराव रागारागानें निघून जातो. ]

**संपतराव**—असं असेल तर मग सगळाच दोष आमच्याकडेच येतो म्हणा-यचा ! आणखी आमच्याकडून जरा वाह्यातच वर्तन झालं ! दिल्गीर आहें मी याबद्दल.

**दयाळजी**—खरंच सयाजीराव ! तुमच्या दोस्तासंबंधानं आमच्याकडून फाजील उतावीळपणाचंच वर्तन झालं !

**रामराव**—ह्या पहा, आम्ही आपल्या तलवारी खालीं ठेवल्या ! ह्या घ्या, अन् आपल्या पायाखालीं तुडवून-मोडून-तुकडे करून टाका यांचे !

**संपतराव**—( सयाजीरावास ) खरंच, दिल्दार दोस्त ! माफ करा आमचा हा अपराध !

**सयाजी**—इतकी दिलखुलाई झाल्यावर आणखी काय पाहिजे ? आतां या सयाजीला तुम्ही वाटेल तसं वांकवा आणि वाटेल ती नोकरी घ्या त्याच्याकडून-ती बजवायला मी एका पायावर तयार आहें. आतां तुमची इच्छाच असेल तर माझ्या ह्या दोस्ताला—जयाजीरावाला-मी आतांच्या आतां आणून तुमच्यापुढें उभा करितों. त्याला काय शासन करायचं असेल तें तुम्ही करा. तो माझा जिवलग दोस्त आहे—हें मला प्राणाहून प्यार-असं माझं हृदयरत्न आहे ! तुमची इच्छाच असेल तर मी तुमच्यावर विश्वासून हें माझं हृदयरत्न तुमच्या स्वाधीन करीन, पण दुसऱ्या कोणाच्याहि नाहीं. कारण ते दुष्टबुद्धि, पापात्मे, खळ माझी आणि त्याची ताटातूट होण्याची वाटच पहाताहेत ! ती होण्याचा अवकाश, ते दुरात्मे त्याला फाडफाडून त्याच्या चिंधड्या उडवतील !

**संपतराव**—छेः छेः सयाजीराव ! तुमच्यावर आमचा पूर्ण विश्वास आहे, तुम्हांला आणि तुमच्या दोस्ताला नसत्या संकटांत घालावं अशी कोण इच्छा करील ? झाल्या गोष्टी विसरून जा. उद्यांच्या लढयांत परमेश्वर तुम्हां दोघांच्याहि तरवारींना यशस्वी करो !

**सयाजीराव**—तुमचा गैरसमज दूर होऊन, तुम्हांला आमचा विश्वास आला, ही मी परमेश्वरी कृपाच समजतों ! पण मध्यंतरीं नसत्या गैर-समजानें आपल्यांत केवढी बेदिली संचारली होती ? तिच्यामुळं आपण एका प्रचंड गगन-भेदी वातचक्रांत सांपडलों होतों ! एका भयंकर-भेसूर कड्यावरून एकदम ढांसळून जाऊन खोल गर्तेत पडणार होतों ! आज कित्येक दिवस जे जे मनोरथ आपण उभारिले होते ते सारे पार रसातळाला जायच्या बेतांत आले होते. आणि हें मगळं कशानं ? तर एका अवास्तव संशयामुळं. जयाजिसारख्या नेकजात आणि करारी हिंमतबहाद्दराचा तुमच्या संशयाला बळी पडून जर का नाहक खून पडला असता—तर या लढयांत तुम्हाला जरी यश येतं, तरी त्याच्याबरोबर मोठी बद-नामी येऊन त्या यशाला मोठा काळिमा फांसला गेला असता ! जो आपण होऊन स्वयंस्फूर्तीनं तुमच्या मदतीला—तुमचं साहाय्य करायला धांवून आला, त्याचा तुमच्याकडनं खून म्हणजे केवढं पापी आणि अघोर कर्म ! माझी अन् त्याची जशी जानपछान आहे, तशीच तुमचीहि असती, आणि त्याचा सोज्वळ स्वभाव, त्याची सत्यनिष्टा, त्याची न्यायप्रियता, आणि त्याचें शौर्य, यांची

तुम्हांला यत्किंचित् जरी कल्पना असती तरी देखलि तुम्ही त्याच्या या साऱ्या अलौकिक गुणांनीं दिपले जाऊन त्याच्या पायाचाच आश्रय केला असतात; त्याच्यापुढं लोटांगणें घातलीं असतींत ! आणि असल्या मनुष्याबद्दल संशय घेण्यांत आपल्याकडून केवढी चूक होत होती हें लक्षांत येऊन तुमचा तुम्हांलाच पश्चात्ताप झाला असता ! तुमचा सर्वांचा संशय फिटला,ही मोठ्या आनंदाची गोष्ट ! चला, या आतां, उद्यां सगळेजण ठरल्याप्रमाणें जय्यत तयारीनं या. म्हणजे तिथल्या तिथं, तुमचा उरलासुरला सारा संदेह आपोआप मावळून जाईल; अन् मग तुम्ही आपण होऊनच 'ह्या सयाजीनं आमचा लौकिक आणि आपल्या मित्राचा प्राण बचावलान्' असं आपल्या इष्टमित्रांच्या जवळ सांगत सुटाल. चला, चलाच तर आतां.

[ सर्व निघून जातात.

**अंक ३ रा समाप्त.**



# अंक ४ था



## प्रवेश १ ला.



**स्थळ**—रस्ता.

**प्रवेश**—[जयाजी व कमळजा प्रवेश करितात.]

**जयाजी**—कुठं ? नेते आहेस कुठं तूं मला कमळ ? मी एकेक पाऊल टाकतों आहें, पण मला वाटतं कीं मी माझ्या दोस्ताच्या हाडामांसाचा चिखल तुडवीत चाललों आहें ! आणि त्या कर्दनकाळाच्या जबड्यांत मी आपलं एकेक पाऊल टाकीत आहें !

**कमळजा**—हें भलतंच काय बाई बोलायचं ? मी तर म्हणतें कीं हें काळाच्या जबड्यांत जाणं नव्हें पण उलट त्याचा जवडा फोडून, आपल्या बुडत्या देशाचं रक्षण करून, लौकिक संपादायला अन् आपली कीर्ति अजरामर करून घ्यायला, हें जाणं होत आहे. आणि हा आनंदाचा दिवस उगवला म्हणजे वेणुपुराचं रक्षण केल्याबद्दल नगरांतल्या सगळ्या बायका रस्तोरस्तीं फेर धरून नवनवीं गम्र्यांचीं गाणीं म्हणत एकच झिम्मड उठवितील ! शाहीर आणि गोंधळी इकडच्या लौकिकाचे मोठ्या वीरश्रीनें पोवाडे गातील ! अन् सगळ्या नगरभर वेणुपूरचं रक्षण करणाऱ्या वीराचे पुतळे उभारतील. ह्या पुतळ्यांना पुष्पमाळांनीं शृंगारून त्यांच्यापुढें अहोरात्र मंगलवाद्यांचा गजर सुरू करतील ! अशा रीतीनं सारं नगरचं नगर एकच गजबजून जाईल ! अन् मग ज्यांनीं वेणुपूर बचावलं त्याच्या एकट्याच्याच नांवाचा जयघोष सर्वत्र दुमदुमून राहील !

**जयाजी**—हंः ! कमल ! ज्यानं आणाशपथा खाऊन टाकल्या, उदार मित्रांच्या आणि दोस्तांच्या मैत्रीवर लाथ मारलीन्, प्रतिज्ञेचा भंग करून नरकवासाची जाड केलीन्,–आणि हें सारं एका यःकश्चित् स्त्रीच्या मोहपाशांत सांपडून तिच्या "अश्रूंनीं" विरघळून जाऊन–त्याच्या नांवाचा जयघोष ? किती

फसवी कल्पना आहे ही ? उलट ह्या बेहिमती, नामर्द, नादान आणि विश्वासघातकी जयाजीनं-मोठ्या प्रयत्नानं जमवून आणलेल्या कटाची राखरांगोळी आणि होळी केलीन्, तिच्यांत आपल्या तारक दोस्तांना ढकलून देऊन त्यांचा तो मारक झाला, असं म्हणून सारी दुनिया माझी नालस्ती करून, माझ्या नांवाचा एकच डंका पिटील! आणि सारं वेणुपूर माझ्या नांवानं खडे फोडील! बोल,-बोल, कुठं नेते आहेस तूं मला ? माझं बदनाम करून माझ्या तोंडाला काळोखी फांसायला कां मला एखाद्या रौरव नरकांत लोटून द्यायला ?

[ तो परत जाण्याचा प्रयत्न करितो. ]

**कमळजा**-हें काय बाई असं पुनः फिरायचं ! किती तरी बाई चंचलवृत्ति ही ! कितीदां बदलायचं माणसानं ? इकडं पश्चात्ताप होत असेल तर खुश्शाल परत जावं. माझ्याकडून एका काडीची देखलि हरकत नाहीं, मग तर झालं ना ? तडक आपल्या मित्रमंडळीकडे जावं आणि त्यांना सांगावं कीं, मी आपल्याला भयंकर प्रेमपाशांनीं अडकिवलं होतं, पण ते पाश तोडून हा मी परत आलों म्हणून. पण इथून जाण्यापूर्वी इकडचा हा जंबिया तेवढा द्यावा माझ्या उरांत खुपसून. म्हणजे आपला हा पारा कायमचा तुटेल, अन् वाटेल तें करायला आपल्याला मोकळीक मिळेल. अथवा हें रुचत नसेल आणि इकडचा आग्रहच असेल तर मला-ज्या चांडाळानं काल रात्रीं माझ्यावर तो भयंकर प्रसंग आणला होतान् त्या कर्मभ्रष्ट मांगाच्या हातीं द्यावी पाहिजे तर.

**जयाजी**--त्या कृतघ्नाचं-त्या वेरडाचं-त्या मांगाचं, नांवसुद्धां नको घेऊंस माझ्यापुढें ! ती आठवण झाली कीं माझ्या सर्वांगांत क्रोधाचा भडका होऊन, माझ्या डोक्याची कांहीं भयंकर स्थिति होऊन जाते ! ज्वालामुखी पेटल्यासारखं होऊन माझी अगदीं वेड्याची अवस्था होते! नको, नकोच ते विचार ! ( क्रोधानें ) हंः त्याला क्षमा ! आणि यापुढें ? क्षमेचं तर नांव नको ! या उप्पर त्याच्यावर सूड न घेतां मी जर असा षंढासारखा भिऊन गारठून बसलों तर माझ्यासारखा कमकुवत आणि नादान मीच. यापेक्षां माझ्या मस्तकावर आकाशांतून कडकडून वीज पडून तें विदीर्ण होऊन त्याचे सहस्रशः तुकडे होऊन जातलि तर-

**कमळजा**---काय बाई बोलायचं तरी हें असं अभद्र ? तें कांहीं नाहीं. आतां मनाचा धडा करावा अन् दरबारापर्यंत जायचं ठरवावं. यांत नये पाडूं आतां अंतर ! मग उशीर कां बाई उगीच ? तिथवर जाऊन इथं काय काय भयंकर बेत

चालले आहेत; कुणाकुणाचे कसकसे खून पडून लुटमार होणार आहे; कुणाकुणाच्या वाड्यांना आगी लागून ते जमीनदोस्त होणार आहेत; तोफा कशा, अन् कुठं कुठं रोंखल्या गेल्या आहेत, अन् काय काय केंव्हां केंव्हां व्हायचं ठरलं आहे हें सगळं सांगून आपल्या देशाचं, वेणुपुराचं, आणि इथल्या थोर, कुलीन आणि घराणदार सरदारांचं रक्षण करणं इकडच्या हातांत आहे ! ही येवढी रात्र कां व्यर्थ घालवायची झाली तर मग झालंच—मग वेणुपूरभर जिकडं तिकडं रक्ताच्या नद्याच वाहूं लागतील आणि त्यांतून छिन्नभिन्न मांसाचे खंड तरंगूं लागतील !

**जयाजी**—खरंच, कमल ! तुझ्या शब्दांत कांहीं विलक्षण जादू भरली आहे ! तुझे शब्द ऐकले म्हणजे मला असं वाटतं कीं ही काय प्रत्यक्ष आकाशवाणी आहे, कीं स्वर्गांतील देवांगनांच्या मुखांतून निघणाऱ्या या देवाधिदेवांच्या आज्ञा आहेत, कीं काय—आहे तरी काय हें ? तुझे शब्द ऐकून मी असा थक्क होऊन जातों अगदीं ! चल, कमल ! अगदीं–चल; कुठं जायचं म्हणतेस तूं ? हा तयार आहे मी तूं जिकडं घेऊन जाशील तिकडं यायला, आणि तूं सांगशील तें करायला ! हें बघ मीं माझं इमान, माझी सचोटी, माझा खरेपणा, माझे सद्गुण, अन् माझे सारे दोस्त या सर्वांवर पाणी सोडलं मीं या घटकेपासून ! ( अन्य विचार येऊन ) काय ? मीं आपल्या जिवलग मित्रांशीं सुद्धां बेइमान होऊं ! अरे, अरे, अरे ! काय हे विचार मनांत येताहेत ? [ एकदम बदलून ] कमल–कमल ! चल, चल—ने मला लौकर कुठं तें; दुसरे विचार माझ्या मनांत आले नाहींत तोंवरच इथून मला घेऊन चल. तूं योजलेल्या ठिकाणीं पोंचण्यापूर्वी जर मीं शुद्धीवर आलों तर मग मात्र मी कांहीं तुझा नव्हे !

**कमळजा**—म्हणजे ? माझ्यापेक्षांहि जास्त जिव्हाळ्याचं असं आहे तर एकून कोणी तरी आपल्या पाशांनीं इकडं बद्ध करून टाकायला ?

**जयाजी**—तुझ्यापेक्षां जास्त जिव्हाळ्याचं ? तूं तर माझा प्रत्यक्ष प्राण. मग तुझ्यापेक्षां दुसरं कोण असणार ? माझी सगळी संपात्ति, कीर्ति, दोस्ती, अन् प्रीति हीं सारीं इथं साठिवलीं आहेत ! माझं जग, माझं विश्व, माझं त्रिभुवन इथं एकवटलं आहे !

[ इतक्यांत कांहीं अधिकारी व पहारेकरी येतात. ]

**अधिकारी**—थांबा–थांबा. तिथंच थांबा. कोण आहे तें ?

**कमळ**—( मोठ्यांनें ) आम्हीं राज्याचं अभीष्ट चिंतणारे आहोंत.

**अधिकारी**—पण कोणाच्या बाजूनं ?

**कमळजा**—राजसभेच्या व वेणुपूरच्या दरबारच्या बाजूनं !

**अधिकारी**—तुम्ही कोणीहि असा. या अशा अपरात्रींचे जे जे म्हणून कोणी भटकत असतील त्या सर्वांना एकदम पकडून दरबारांत घेऊन येण्याबद्दल मला सरांस हुकूम आहे. आणि तो हुकूम पाळणं माझं कर्तव्य आहे.

**जयाजी**—चला. तयार आहें मी हा तुमच्या आज्ञेप्रमाणें यायला. आतां काय उलट पाऊल टाकलं आहे खरं एकदां ! दैवा ! राजीव, तुला आतां जो प्रताप गाजवायचा असेल तो खुश्शाल गाजीव ह्या जयाजीवर !

[ पहारेकरी त्यांस घेऊन जातात. ]

**प्रवेश १ ला समाप्त.**

---

## प्रवेश २ रा.

---

**स्थळ**—राजदरबार. [ प्रवेश मालोजीराजे बसले आहेत. व दरबारांत पिलाजीराव आदिकरून मुत्सद्दी बसले आहेत ].

**राजा**—पिलाजीराव, मुत्सद्दी व सरदारहो, बोला-बोला, या अशा अपरात्रीं-इतक्या तडकाफडकी असा दरबार भरविण्याचं कारण काय ? काय, असा कोणचा प्रसंग ओढवला आहे ? खुद्द वेणुपुरावरच ? कांहीं धाड आली आहे कीं काय ? कां ? असे दिलगीर कां दिसतां ? बोला, बोला.

**पिलाजी**—काय सांगूं महाराज ? माझी बोबडी वळून जाऊन तोंडांतून शब्दहि निघेनासा झाला आहे; रडें आवरेनासं होऊन अश्रूंना खळ पडत नाहींसं झालं आहे; हे फुकट आहेत हें मला समजतं. पण काय करूं तरी काय मी ? माझ्या एकट्यावरच नव्हें, पण आपणा सगळ्यांच्यावरच हा रडण्याचा प्रसंग आला आहे ! आतां हे शेले अन् हे रुबाबदार जरतारी अंगरखे फेंकून देऊन आपल्याला अगदीं कंगाल बनून त्या परमेश्वराची दीनवाणीनें-मोठ्यानं टाहो फोडून करुणाच भाकली पाहिजे ! कारण वेणुपूरची राखरांगोळी करून टाकण्याचे

भयंकर बेत आणि कट होऊन त्याचा केव्हां अन् कोणच्या क्षणीं भडका होऊन जाईल याचा कांहींच नेम उरलेला नाहीं !

**सर्व मुत्सद्दी**—म्हणजे ?

**पिलाजी**—म्हणजे काय सांगूं आतां ? कर्मच ओढवलं आहे म्हणाना आपलं साऱ्यांचं ! आज आपली, आपल्या बायकांची, आपल्या पोराबाळांची आणि साऱ्या सग्यासोयऱ्यांची—सगळ्यांची एकसहा कत्तल करण्याचं कटवाल्यांचं ठरून चुकलं आहे. इथलीं घरं, देवळं, उमरावांचे वाडे, ही दरबारची जांगा, अन् खुद्द राजभुवन, या सर्वांच्यावर आज गदा येणार; ते जाळून पोळून फस्त करून जमीनदोस्त करण्याचं ठरून चुकलं आहे ! या घटकेला शत्रूंच्या म्यानबंद तरवारी म्यानाबाहेर पडल्या असतील ! इतकंच नव्हे पण वेणीपूरच्या कोणच्या तरी एका बाजूनं कांपाकापीला अन् कत्तलीला सुरवातदेखील झाली असेल ! या कटाचा हा सुगावा मला कुठून अन् कसा लागला हें कांहीं मला नाहीं सांगतां येत. पण यापुढें एक क्षणभरहि स्वस्थ बसण्याची वेळ नाहीं ! याचवेळीं आपल्या बचावाची शक्य ती धडपड आपल्याला केली पाहिजे; त्याशिवाय आतां घडगत नाहीं, निभाव नाहीं ! नादानाच्या मरणापेक्षां मर्दाचं मरणं पुरवेल. तर आतां त्यालाच तोंड देऊन आपल्यांत सद्गुण, साहस, धैर्य, वीरश्री आणि करारीपणा यांचा अजीबात नायनाट झाला नाहीं हें सगळ्या जगाला पटवून देऊं म्हणजे आपला दुर्लौकिक आणि दुष्कीर्ति तरी टळेल.

[ इतक्यांत बाहेरून आवाज ऐकूं येतो. ]

**कोतवाल**—( बाहेरून ) वाट सोडा—वाट सोडा ! कैदी—कैदी आणले आहेत आम्हीं, वाट सोडा !

[ कोतवाल व पहारेकरी येतात ]

**राजा**—काय—दंगा काय आहे ?

**कोतवाल**—[ पुढें येऊन मुजरा करून ] पहारेकऱ्यांच्या ताब्यांत देऊन दोन कैदी आणले आहेत. त्यांचं म्हणणं आपल्याला सध्यांच्या भयंकर कटासंबंधाची कांहीं गुप्त बातमी खुद्द दरबारला अन् मंत्रिमंडळाला द्यायची आहे.

**राजा**—ठीक आहे. घेऊन या त्यांना आंत. [ जयाजी, नाईक, पहारेकरी वगैरे येतात. ]

[ कैद्यांस ] कोण ? कोण आहांत तुम्हीं ?

**जयाजी**—एक दगलबाज !

**१ ला मंत्री**—एका सुटसुटीत शब्दांत सांगतो आहे हा सारं ! ठीक-ठीक. प्रामाणिक मनुष्य दिसतो आहे हा.

**जयाजी**—माझ्यासारखंच प्रत्येकानं चोख आणि प्रामाणिक असावं। असं माझं म्हणणं.

**राजा**—आमच्या कानावर असं आलं आहे कीं आमच्या राज्याच्या विरुद्ध कांहीं गुप्त मसलती, कट अन् कारस्थानं झालीं आहेत, आणि त्यांत तुमचंहि पण आंग आहे. आपल्यास दगलबाज म्हणवून घेऊन तुम्हीं स्वतः ही गोष्ट कबूलहि करितां. पण हा दगलबाजपणाचा कलंक जर तुम्हांला धुवून टाकायचा असेल तर जी काय खरी हकीकत असेल ती सारी स्पष्टपणें मोकळ्या मनानं सांगून टाका; म्हणजे दरबार तुम्हांला दयाच दाखवील.

**जयाजी**—महाराज केवळ आपले स्वतःचे प्राण वचवावे एवढ्याच हेतूनें मी इथं आलों आहें असं आपण समजूं नका. माझ्या प्राणांची किंमत मी आपल्यापेक्षां जास्त जाणून आहे. मी सध्यां जो इथं आलों आहे तो केवळ ह्या घटकेला ज्यांचीं ज्यांचीं म्हणून पुरीं शंभर वर्षं भरून चुकलीं आहेत त्यांची मला कींव आणि दया आल्यामुळें. न होऊन मी तुमचा कोणी दोस्त अथवा हितचिंतक म्हणून नाहीं आलों इथं ! उलट ह्या वेणुपूरचा एक कट्टा दुस्मान तुमच्यापुढं उभा आहे असं समजा ! कटवाल्यांशीं माझ्या आणाशपथाहि होऊन चुकल्या आहेत ! आहे हें असं आहे. पण हें सारं पत्करूनहि तुम्हीं जर माझ्याशीं सरळ आणि प्रामाणिकपणानं वागाल तर मी तुमचा दुस्मान असलों तरी दुस्मानाचा दोस्त बनेन !

**राजा**—हं ! हा मगरूर-हरामखोर आम्हांला शरण येतो, पण उलट आम्हांवरच अटी आणि शर्ती लादतो ! याला खोडा दाखवा अन् याच्या साऱ्या अटी पार काढून टाका; आणि मग घ्या त्याच्याकडून काढून कटाची सारी बित्तंबातमी.

**जयाजी**—हंः तेवढी मात्र शामत नाहीं आपली कोणाचचि ! धमकावण्यांना आणि डुरकावण्यांना भीक घालणारा नाहीं हा जयाजी. भित्रे, बावळे आणि अर्धवट असतील ते भितील असल्या ह्या डरकावण्यांला; मर्दासारखे मर्द नाहीं भ्यायचे कधीं ! आणि कधीं कबूलहि पण नाहीं करायचें कांहीं ! पोरांसो-

रांच्या कुल्ल्यावर कोरडे ओढून त्यांना कबूल करून घेण्यासारखं सोपं काम नाहीं हें. इथं मनाचा एकदां ठाम निश्चय झाला कीं झाला; मग तें शरीराचा सल्ला अथवा विचार घेत नाहीं बसणार. मग त्याला खोड्यांत घाला नाहीं तर सुळावर चढवा. ही खोडाबेडीची गोष्ट पुन्हां नुसती तोंडानं उच्चारा मात्र कीं झालं,—ह्या ओठांना एकदम कायमचीं कुलुपं पडलीं म्हणून समजा! मग तुमचा तो खोडा अन् तुमचा तो सूळ यांची गुमान कोण करतो? तुम्ही आपली सारी शिकस्त करून पहा पाहिजे तर, अशानं माझ्या तोंडून एक ब्र निघेल तर शपथ! माझी जीभ एका काडीचादेखील मागमूस तुम्हांला लागूं देणार नाहीं. मग सगळं कबूल करण्याचं तर नांवच नको घ्यायला!

**राजा**—अस्सं? तर मग बोला, काय काय शर्ती आणि अटी आहेत तुमच्या?

**जयाजी**—मला स्वतःला आणि माझ्या बावीस दोस्तांना सरास माफी मिळून आमच्यांपैकीं कोणाच्याहि प्राणाला यत्किंचित्‌हि धोका पोंचतां कामा नये. त्यांच्या नांवांची यादी ही इथं आहे माझ्याजवळ. त्यांच्या नांवांचा बिलकूल बभ्रा होतां उपयोगी नाहीं, अथवा त्यांच्यावर या संबंधानं पुढें मागें कांहीं शेकतांहि कामा नये. अन् अशाबद्दल इथं भर दरबारांत सगळ्या मंत्रिमंडळींच्या आणा शपथा होऊन मला अभिवचन मिळालं पाहिजे. माझं म्हणणं मान्य करून तुम्हीं सर्वांनीं शपथा घेतल्यात कीं तुम्हांवर काय आणि कसें संकट गुदरणार आहे तें सगळं इत्थंभूत सांगतों मी मग तुम्हांला.

**राजा**—बोला, कोणाची शपथ घेतली असतां ती आपल्याला पटेल?

**जयाजी**—भावी सुख आणि शांति यांच्या प्राप्तीकरितां ज्या परमेश्वराची तुम्हीं आराधना आणि प्रार्थना करितां त्याचीच शपथ घ्या.

**सर्व मंत्री**—ठीक—ठीक—तर त्याच जगच्चालकाची शपथ घेऊन सांगतों कीं—ह्या जयाजीरावांच्या साऱ्या अटी आणि यांचं सारं म्हणणं कबूल आहे आम्हांला. (सर्व विनम्र होतात.)

**जयाजी**—ठीक आहे, तर आतां यापुढं तुमचं अन् तुमच्या पोराबाळांचं सारं-बरं वाईट—कल्याण—अकल्याण सर्वस्वीं तुमच्या ह्या वचनबद्धतेवर अथवा वचनभंगावर अवलंबून आहे! वचन पाळून धन्य व्हा, अथवा मोडून आपलीं बेचाळीस कुळं नरकांत लोटा.

**सर्व मंत्री**—हो, हें बदलेल त्याला लागू. आम्हीं तर शपथा घेऊन चुकलों आहोंत.

**जयाजी**—तर मग ही इथं आहे यादी माझ्या बावीस दोस्तांच्या नांवांची. ही पाहिल्याबरोबर तुम्हांला तुमच्या भयाचं कारण तेव्हांच कळून चुकेल. आणि धडकीहि पण भरेल! ( तो ती यादी अधिकाऱ्याचे हातीं देतो, व तो अधिकारी राजाचे हातीं देतो. ) मी तर ही यादी देऊन आतां सर्वस्वीं दैवावर हवाला टाकून बसलों आहें!

**राजा**—( यादी पाहून ) ही सर्व मंडळी तर अगदीं ठळक ठळक आहेत. [ कोतवालाचे हातीं तो कागद देतो ] यांना एकदम गिरफदार करण्याची तजवीज करा. प्रसिद्ध गराडेकर आनंदराव यांच्या आनंदमहालांत जमलेली आहेत ही सगळी मंडळी या वेळीं. तर प्रथम खडी शिबंदी घेऊन तिथं जा, आणि ती जागा घ्या अगोदर आपल्या स्वाधीन करून! अन् मग दुसरी गोष्ट. जयाजीराव, तुम्हांला आज उद्यां सकाळपर्यंत आमच्या कैदेंत राहिलं पाहिजे. नाइलाजामुळें करावें लागत आहे आम्हांला हें.

**जयाजी**—कैदेंत?

**राजा**—हो, कैदेंतच. कोतवाल, ठोका बेड्या.

**जयाजी**—मोठ्या आश्चर्याची गोष्ट! हातोहात वचनभंग! हा अशा तऱ्हेचा निकाल होणार म्हणून मला जर पूर्वींच कळतं तर मीं या लोखंडी बेड्या अडकवून घेण्यापेक्षां त्या कृतांत काळाच्या अंतकालच्या बेड्याच जास्त आनंदानें पत्करल्या असत्या!

**राजा**—कोतवाल, पाहतां काय? आपल्या कैद्याला नीट अक्कलहुषारीनं सभाळून न्या इथून! त्यांना सुरक्षित ठेवण्याची सारी जबाबदारी तुमच्यावर आहे, ही गोष्ट पक्की लक्षांत ठेवा.

**जयाजी**—( निःश्वास टाकून ) हं; चला, न्या मला. उशीर कां उगीच आतां? अशा ठिकाणीं न्या कीं जिथं माझ्या विचारशक्तीची अन् माझी कायमची ताटातूट होईल; माझी स्मरणसक्ति अजिबात नष्ट होऊन जिथं मला माझं स्वतःचंहि विस्मरण पडेल, आणि राहिलेलं आयुष्य भान न राहिल्यामुळें सहज कंठतां येईल! चला, अशा ठिकाणीं न्या कीं जिथं मला माझ्या आजच्या

या भयंकर आणि अक्षम्य अशा अपराधाचं अन् दगलबाजीचं यावज्जन्म स्मरण देखील होणार नाहीं ! ( त्यास पहारेकरी नेतात. ) [ पडद्यांत ] " चला, बाजू ! बाजू ! वाट सोडा. आणखी कांहीं राजद्रोही पकडून आणले आहेत ! "

**राजा**—हें कसं काय झालं ? हे तर कैद्यांचे पहारेकरी ! आमचे कुठें आहेत ? त्यांना म्हणावें, इथले हे दरवाजे बंद करा अगोदर. एकूण इथपर्यंत येऊन थडकला तर राजद्रोह !

[ एक अधिकारी येतो व मुजरा करून ].

**अधिकारी**—सरकार, यांचे कट आणि मसलती चालत असतांना यांना पकडून आणलं आहे. हे सारे हत्यारबंद होते अन् यांच्याकडे लढाईच्या हत्यारांशिवाय इतर हत्यारेंपात्यारेंहि पण कांहीं सांपडलीं. त्यांसकटच घेऊन आलों आहें ह्या सगळ्यांना.

[ विठोजीराव, दयाळजी, रंगराव, रामराव, सयाजी व कटांतील इतर मंडळीस कैद करून घेऊन येतात ].

**सयाजीराव**—अहो, वेणीपूरचे जनक, मंत्री आणि मुत्सद्दी हो, तुम्ही सर्वजण इथं न्यायाची खैरात करीत असतां असा तुमचा लौकिक आहे. असं असून वेणुपुराकरितां जे शेंकडों वेळ शत्रूंशीं झुंजले, ज्यांनीं वेणुपूरच्या बचावाकरितां आपल्या अंगावर मोठमोठ्या जखमादेखील मोठ्या धीम्मेपणानं सहन केल्या, व आपल्या प्राणांचीहि गुमान न करितां जे शत्रूवर एकसहा तुटून पडले आणि ज्यांनीं वेणुपुराकरितां कीर्ति आणि विजयश्री खेंचून आणली, त्यांच्या हातापायांत हे लंगर अडकवून त्यांचा हा सन्मान चालला आहे, कां त्यांच्या गळ्यांत या अलौकिक विजयमाळा घालून त्यांचा गौरव होत आहे, काय आहे तरी काय हें ?

**राजा**—चालूं द्या—चालूं द्या. तुमचं सारं म्हणणं आम्हीं शांतपणानं ऐकून घेणार आहों !

**एक मंत्री**—(एकीकडे) आणि अगदीं शांतपणानं फांसावरहि पण चढविणार आहों !

**सयाजी**—समुद्र खवळून जाऊन जेव्हां मोठं तुफान वादळ उठलं होतं, अशा स्थितींत सुवर्णपूरकर आणि त्यांचीं साथीदार राष्ट्रं यांचं लढाऊ आरमार जेव्हां आपल्या वेणीपुराला चाल करून आलें तेव्हां खुद्द राजेसाहेबांची कशी दीन

-केविलवाणी स्थिति झाली होती, याची आहे कां कांहीं आठवण? राणी-साहेबांच्याजवळ उभे राहून डोळ्यावाटें टपटप अश्रू टाकणारे आपणच कां ते राजे! त्यावेळीं भ्याड वेणुपुरकरांची काय अवस्था झाली होती? कोणाचाच पायपोस कोणाच्या पायांत राहिला नव्हता. अशा वेळीं पुढें होऊन केवळ आपल्या हिंमतीनें वेणुपूरच्या या असल्या नामर्द लोकांकडूनच मीं कशी मर्दुमकी करविली, आणि स्वतः जातीनं मीं आपला जीव धोक्यांत घालून, आपला, आपल्या अमीर-उमरावांचा, वीर मुत्सद्यांचा, व साऱ्या वेणुपुराचा लौकिक अन् अब्रू कशी बचावली या सगळ्या गोष्टींची आपल्याला अजिबात विस्मृति पडली कीं काय? अथवा या सगळ्या बहादुरीबद्दलच तर ही बक्षिशी अन् हा सारा मानमरातब नव्हे? आतां मला आपण दगलबाज, विश्वासघातकी, अथवा राजद्रोही ठरविलें असेल, तर माझ्यावर तसा स्पष्ट आरोप ठेवा! अन् त्याची शाबीतीहि पण करा! पाहूं दे, पाहूं देच मला, कोणता निधड्या छातीचा नराधम माझ्यावर हा दोषारोप करायला धजतो तें!

**राजा**--(गंभीरपणें) जयाजीराव या नांवाचे कोणी गृहस्थ आहेत कां तुमच्या माहितींतले?

[ जयाजीस घेऊन येण्याविषयीं संकेतानें कळवितो, दुसरीकडे सर्व कटवाले आपापसांत कुजबुजूं लागतात. ]

**सयाजी**--होय, आहेत. त्यांच्या आंगचे सद्गुण, त्यांची सत्यप्रियता, आणि त्यांची न्याय्यबुद्धि यांनाहि कांहीं आम्हीं पारखे नाहीं आहों. त्यांच्या-बरोबरच सारीं आम्हांला माहीत आहेत. त्यांच्यावर माझं जें पहिल्यांदा प्रेम बसलं, तें बसायला कारण त्यांच्या सासऱ्याचं त्यांच्याशीं जें अमानुषपणाचं आणि क्रूरपणाचं वर्तन होत होतं तेंच झालेलं आहे. त्या सासऱ्याच्या कठोरपणाला कांहीं सीमा? अहो! दगड विरघळले असते दगडः पण त्या फत्तरफोड्याच्या मांगाचं काळीज केव्हांहि द्रवलं म्हणून नाहीं.

[ जयाजीस पहारेकरी घेऊन येतात. ]

**राजा**--(शिपायांस) त्यांना पुढें घेऊन या इथं. (शिपाई तसें करतात.) सयाजीराव, हेच तुमचे दोस्त ना? भेटा आपल्या दोस्तानां!

**सयाजी**--(आपल्याशीं) एकून माझ्या दोस्ताला देखील यांनी कैद केलं

तर ? इथंच तर आमचीं पुरीं शंभर वर्षे भरलीं म्हणायचीं ! एकून सध्यां तें दैवच प्रतिकूल झालं आहे, हेंच? खरं! हा यांच्या हातीं कसा लागला कांहीं समजत नाहीं. पण हा असा अगदीं गळाठल्यासारखा, कां बरं दिसतो ? ह्याचं हित तें माझं हित, अन् माझं हित तें ह्याचं हित असं आमचं दोघांचं ठरलं असून हा असा खिन्न कां ? ( उघड ) जयाजीराव, हे वेणुपूरचे जुलमी आणि सत्ताधारी लोक आपल्यावर राजद्रोहाचा आणि विश्वासघाताचा आरोप करीत आहेत; बोला, मान्य आहे तुम्हांला हा आरोप ?

**जयाजी**—सयाजीराव ! मोठ्या लज्जेची गोष्ट,—तुझ्यासारख्या उदार, दिलदार, विश्वासू आणि जिवलग दोस्ताशीं मीं बेइमान होऊन निमकहरामी केली ! विश्वासघात करून मीं तुझा आणि आपल्या कटांतील झाडून साऱ्या दोस्तांचा गळा कापला ! आणि साऱ्यांच्याच नांवाला बदनामी आणली ! आपल्या हातानं आपला स्वतःचा दुर्लौकिक करून घेऊन तुम्हां सगळ्यांचा सत्यानाश करायला हा अधम, हा काळतोंड्या कारण झाला आहे ! मीं आपण होऊन, माझ्या तोंडानं आपल्या कटाचं सारं रहस्य फोडून टाकलं. शरम-शरम वाटते मला आतां आपलं तोंड दाखवायला ! उद्यां उजाडणारी सकाळ तुम्हांला मोठ्या उत्सवाची आणि आनंदाची व्हायची होती। पण ह्या नराधमानं आपल्या हातानं ती तुम्हांला अत्यंत दुःखाची ! क्लेशाची आणि संकटाची करून सोडली ! हाय ! हाय ! कसं-कसं दाखवूं मी हें आतां आपलं तोंड तुम्हांला यापुढं ? [ हातानं आपलं तोंड झांकून घेतो व चमत्कारिक हुंदका टाकतो ! ]

**सयाजी**—हंः असं असेल तर मग, इथंच आटपलं सारं ! सगळाच ग्रंथ आणि बाजार आटपला ! वेणुपुरचं स्वातंत्र्य, माझं जीवित, आणि त्याजबरोबरच आमच्या सर्व आशा, साऱ्या एकदम नष्ट झाल्या ! कुठें कांहीं उरलं नाहीं ! एका काडीचा देखील आशातंतु उरला नाहीं ! ठीक आहे. रामराम, शेवटचाच राम राम तर आतां माझा सगळ्यांनां !

**राजा**—बोला-बोला सयाजीराव ! तुम्हीं जे जे म्हणून कट आणि बेत केले होते ते ते सारे कबूल करा आणि क्षमा मागा. बोला, काय आहे तुमची इच्छा ? हे मर्द सरदार अन् हें मुत्सद्दी मंत्रिमंडळ तुमच्या सरास कबूलीनंच खास तुम्हांला क्षमा करितील.

**सयाजी**—तुमचे हे मर्द सरदार आणि तुमचं हें मुत्सद्दी मंत्रिमंडळ म्हणजे झाडून सारे बेवकूब आणि अधिकाराच्या धुंदीनं मदांध झालेले लोक !। यांची क्षमा मागायची ? हीं गोष्ट कालत्रयींहि होणार नाहीं ! याच मुत्सद्द्यांच्या चढेल, अरेरावी आणि उन्मत्त वर्तनामुळें तर इथले खानदानींचे लोक या कटाला प्रवृत्त झाले ! आणि तो कट फिसकटला गेला,- आणि त्यांच्या हातांत लंगर पडले,–म्हणून अशा बेवकूब लोकांची क्षमा मागायची ? राजा ! हें तुझं मंत्रिमंडळ मुळांतच पोंखरून जाऊन अत्यंत नादान आणि कुचकामाचं बनलं आहे. याच्यावर तूं विश्वासलास तर आज नाहीं उद्यां पुन्हां इथं अशीच धुमश्चक्री सुरू होईल, आणि तुमच्या अंगावरचीं हीं राजवस्त्रें तुम्हाला आमच्या या लंगराप्रमाणेंच अत्यंत असह्य होऊन तिरस्करणीय वाटतील.

**राजा**—( कडवेपणानें ) एकच गोष्ट. एक क्षमा अथवा दुसरं देहांतशासन ! बोला, यांतून कोणतं पत्करतं तुम्हांला ?

**सयाजी**—अस्सं ? तर हा तयार आहें मी देहांतशासनाला ! मरणाला कोण भितो ? अब्रूपुढें मरणाची काय किंमत आहे !

**रंगराव**—मर्दांना योग्य असं मरण पाहिजे आम्हांला. क्षमेचं नांव सुद्धां काढूं नका. मात्र हे निंद्य आणि लज्जास्पद लंगर नकोत !

**सर्व कटवाले**—हो–हो, मर्दांना साजेल असं मरण पुरवेल, पण हे लज्जास्पद लंगर नाहीं पुरवणार !

**राजा**—बस्स ! दरबार बरखास्त करा ! कोतवाल, जमादार, तुम्हीं आपापल्या कैद्यांना नींट संभाळून घेऊन जा. जयाजीराव, तुम्ही खुले आहांत या घटकेपासून! मात्र इतर साऱ्या कटवाल्यांचा निकाल चौकशीअंतीं !

**मंत्री**—हे सारे वाह्यात, कुर्रेबाज, कडवे, चढेल आणि रगेल आहेत !

[ जमादार जयाजीच्या बेड्या काढतात. राजा, सरदार व मंत्री एकदम निघून जातात. व जयाजी सयाजी–शिवाय सर्व बंडखोरहि पहारेकऱ्यांचे मागून जातात.]

**सयाजी**—चला. कुठं आहे माझी अंधारकोठडी ? न्या, न्या मला तिकडे. वेणुपुराकरितां कैद भोगण्याचा हा कांहीं पाहिलाच प्रसंग नव्हे ! रुळलेलों आहें मी !

**जयाजी**—थांबा–थांबा. जरा एक क्षणभर थांबा सयाजीराव !

**सयाजी**—दरबारच्या हुकुमाविरुद्ध वागायला सांगणारा कोण आहेस तूं

असा रगेल आणि बेमुर्वतखोर बंडखोर? चल, हट! ( त्याला ठोंसा देऊन शिपायांस ) चला–चला मला घेऊन.

**जयाजी**—शपथ–शपथ आहे तुला देवाची इथून पुढें एक पाऊल टाकशील तर! माझं म्हणणं तुला ऐकून घेतलंच पाहिजे. आणि तुझ्याशीं दोन शब्द बोलायची तूं परवानगीहि पण दिली पाहिजेस मला! सयाजीराव, तुम्हीं हा ठोंसा देऊन माझी इज्जत घेतली आहेत, माझा: अत्यंत असह्य असा अपमान आणि उपमर्द केला आहेत, यापेक्षां आपल्या कंबरेचा जंबिया काढून तो माझ्या छाताडांत खुपसून जर माझा अंत केला असतात तर तें तुम्हांला जास्त शोभलं असतं, आणि न्यायाचंहि पण झालं असतं. माझा वाटेल तसा धिःकार केलास, अथवा वाटेल तशी अवहेलना आणि निर्भर्त्सना केलीस तरी ती मला ऐकूनच घेतली पाहिजे. मुकाट्यानं ऐकून घेतली पाहिजे! कारण माझ्या हातून तसा गुन्हाच झालेला आहे. तरी पण तूं माझ्यावर निंद्य आणि खोडसाळ आरोप मात्र नाहीं ठेवावास; कारण माझ्या हातून जो अपराध घडला तो दुर्दैवाच्या फेऱ्यांत आणि अवदसेच्या तावडींत सांपडून घडलेला आहे. जाणूनबुजून घडलेला नाहीं. म्हणून प्रार्थना आहे माझी तुम्हांला कीं–जरा दयार्द्रदृष्टि करून पहा माझ्याकडे! माझी कींव येऊं दे तुम्हांला. एवढी भीक घाला, अन् नुसतं पहा तरी एकदां माझ्याकडे! मला पुरं ठाऊक आहे कीं तुम्हीं दयेचे आणि करुणेचे मूर्तिमंत सागर आहांत. म्हणून म्हणतों, थोडा शांतपणा स्वीकारून माझ्या विनंतीकडे जरा लक्ष द्या, अन् मी काय म्हणतों तें ऐकून घ्या. संभवतच नाहीं ही गोष्ट! जिथं देवांश आहे, तिथं दया आहे, करुणा आहे. तिथं हीं पूर्णपणें नांदताहेत! कर्माचा पश्चात्ताप झालेल्या आपल्या मित्राचे शब्द ऐकून घ्यायला आपण तयार नाहीं? छेः छेः—

**सयाजी**—मोठ्या साधूचा वेष घेऊन कोणीं चालिवली आहे ही नसती पिरपिर! अशा वेषानं–माझ्यासारखा भोळसट मनुष्य: पाहून,–त्याला असं लुच्चे-गिरीनं फसवूं पाहतोस? चल. चालता हो इथून! माझ्या डोळ्यापुढें उभा सुद्धां राहूं नकोस! कपटी–ढोंगी–भोंदू नाहीं तर! चल हो चालता! ओळखत नाहीं तुला मी; जा–काळं कर जा इथून!

**जयाजी**—काय! ओळखत नाहीं मला? ( गहिंवरून ) सयाजी, सयाजी-राव! ओळखत नाहींस तूं मला?

**सयाजी**—हो हो. ओळखत नाहीं मी तुला! कोण? कोण आहेस तूं?

**जयाजी**—मी, तुमचा दोस्त—जिगरदोस्त—जयाजी आहें! याच्यावर तुमचं एकवार फार प्रेम होतं. आणि याला तुम्हीं लेखताहि पण होतां तसेंच! आणि सध्यां याचा तुम्हीं जरी अगदीं रास्त रीतीनंच धिःकार आणि तिरस्कार करात आहां, तरी एक वेळ हा तुमचा अगदीं प्यारा दोस्त होता,—एवढं खरं आहे. आणि आज—त्याच्याशींच-तुम्ही असं हें कठोर अंतःकरणानं वागत आहांत!

**सयाजी**—कोण जयाजी? अन् तूं एक वेळ माझा प्यारा अन् जिगर दोस्त होतास? अन् तुझ्यावर माझं दिल् आणि प्रेम होतं! छेः खोटी—झूट—अज्जीबात झूट गोष्ट ही! देवाची शपथ घेऊन सुद्धां असंच म्हणेन मी! तूं म्हणतोस असा,—एकाकाळीं माझा एक दोस्त होता,—पण तो मोठा उदार, सच्चा, प्रामाणिक, न्यायी, आणि गाढ्या वीरवृत्तीचा होता; तसंच त्याचप्रमाणें त्याचं मनहि मोठं दिलदार, आणि दिसण्यांतहि पण तो तसाच फार सुरतपाक होता! त्याच्याकडे नुसतं पाहून देखील माझ्या डोळ्यांना आनंद होत असे. अन् त्याची ती करुण-मूर्ति पाहून माझ्या अंतःकरणाला पीळ पडत असे. तो कोणिकडे अन् तूं कोणीकडे! तुझ्यासारख्या दरिद्री, हलकट, अनुदार, विश्वासासभ्याड, आणि अशा कवडीमोल माणसाच्याकडे पाहिलं, आणि हें तुझं हिडिस्स स्वरूप आणि काळं ठिक्कर तोंड दृष्टीस पडलं म्हणजे तुझ्याकडे पाहूं नये कीं तुझं मुखावलोकनहि करूं नये, असंच वाटतं! मग तुझ्याकडे कुणाचं आणि कसं मन ओढलं जाणार? तुझ्याकडे नुसतं बघायचं म्हटलं तरी देखील सगळ्यांना खंतीच वाटणार! तर—कर, काळं कर इथून आपलं तोंड! एखादं—कांहीं तरी अमंगळ पाहून मनुष्य जसा गारठून जावा तशी स्थिति झाली आहे माझी तुला पाहून. चल—लांब हो. अशी लगट नको करूंस माझ्याशीं!

**जयाजी**—अहो, असे निष्ठुर होऊं नका माझ्याशीं. खरोखर, जाणून बुजून मी कांहीं तुमचा घातपात केला नाहीं? याची साक्ष माझे हे अश्रूच देतलि तुम्हांला. अहो, मी तुमचा पूर्वीचाच जयाजी आहे हो!

**सयाजी**—काय? तूं माझा घातपात केला नाहींस म्हणतोस? सारं करून सवरून वर आणखी असा दिमाख मिरविण्याची छाती आहे तर आपली? अन् तूं तर पूर्वीचा जयाजी? माझा जिगर—प्यारा? दिलदार दोस्त? वाः रे वाःदोस्त!

—प्यारे दोस्त! शपथपूर्वक सांगतां तुम्ही हें,—कीं तुम्हीं माझा खरोखर घातपात केला नाहीं म्हणून? तुम्हीं घातपात केला नसलांत तर मग हे लंगर कुठून आले माझ्या हातांत? आणि उद्यां सकाळीं त्या चांडाळांच्या त्या मांगांच्या हातानं जें पवित्र मरण मला लाभायचं आहे, तें कुणाच्यामुळें तर? कोणाच्या पुण्याच्या कमाईचं फळ हें? बोल, बोल, आतां कां असा काळाठिक्कर पडलास? बेइमान, दगलबाज, गळेकापू नाहींतर!

**जयाजी**—कबूल आहे, सारं कबूल आहे मला हें. पण एका गोष्टीची भीक घाला मलाः म्हणजे मग दुसरं तिसरं कांहीं एक मागायचं नाहीं मला.

**सयाजी**—कसली-भीक कसली घाल म्हणतोस?

**जयाजी**—दुसरी कसली भीक? दरबाराकडून ज्या शर्ती पुढें ठेवण्यांत आल्या आहेत त्यांना मान तुकवून आपले आणि आपल्या साऱ्या मित्रमंडळींचे प्राण वांचवा! तुम्हांला तुमच्या इतमामाप्रमाणें आणि अदबप्रमाणें वागविण्या-बद्दल त्यांचा शब्द गुंतून चुकला आहे.

**सयाजी**—काय,—प्राण! त्यांच्या शर्तीला मान तुकवून प्राण वाचवूं म्हणतोस मी आपले? अन् त्यांच्याकडे आपलं सगळं कारस्थान फोडून त्यांच्याजवळ सगळं कबूल करून? आणि हें सारं केवळ जगण्याकरितां? माझ्यासारखा मनुष्य यापुढं जगायला अगदीं नालायक आणि कुचकामाचा आहे! मी जन्मल्यापासून साऱ्या जगाचं अन् माझं सारखं द्वंद्व आणि झगडा सुरू आहे; अन् त्याला शेवटला रामराम ठोकून चालतं व्हायला सध्यां आली आहे हीच संधि उत्तम आहे! अशी संधि येऊं देत म्हटलं तरी येणारी नाहीं! आणि सध्यां तरी इथं तुला आणि तुझ्यासारख्या दगलबाज आणि विश्वासघातकी मनुष्यां-चाच धुडगुस चालू आहे. त्यांच्याच धुडगुसाला योग्य असं हें सध्याचं जग आहे.

**जयाजी**—जगांत जर कांहीं सत्य आणि न्याय्य म्हणून असेल तर: त्याची शपथ घेऊन सांगतों—

**सयाजी**—छेः छेः त्याची नको घेऊंस शपथ! दुसरं पहा कांहीं आपल्या शपथेला! कारण त्या पवित्र वस्तूची शपथ घेऊन, ती बेदरकार मोडून तूं केव्हांच मोकळा झालेला आहेस!

**जयाजी**—तर मग आतां कशाची शपथ घेऊं? त्या नरकलोकांची शपथ

घेऊन सांगतों,-कारण यापुढें तेंच माझं वसतिस्थान होणार आहे! आपण जगायचं कबूल करितों असं तुमच्याकडून आश्वासन मिळाल्याशिवाय, मी तुमचे हे पायच सोडणार नाहीं! मग तुम्हीच मला आपल्या पायांनीं सोडून जरी दूर झुगारून दिलंत तरी त्याची फिकीर नाहीं मला!

**सयाजी**--काय? माझे पाय सोडणार नाहीं म्हणतोस?

**जयाजी**--नाहीं, कध्धीं नाहीं सोडणार! अश्शी मगरमिठी मारून बसेन इथं! मला 'क्षमा आहे' असं म्हटल्याशिवाय मी हे पाय कांहीं केलं तरी सोडणार नाहीं! मग मला तुम्ही गुद्दे मारा, ठोंसे द्या, नाहींतर लाथा मारा, अथवा माझा तिरस्कार आणि धिःकार करून दुःशब्दांची लाखोली वहा माझ्या डोक्यावर; नाहीं तर आपल्या पायांनीं माझं डोकं तुडवून त्याचा चेंदा मेंदा टाका करून; मी हें सगळं अगदीं शांतपणानं सोशीन. तुम्ही अत्यंत निर्दयपणानं आणि क्रूरपणानं जरी माझा अव्हेर केलात् तरी तो देखील मला पुरवेल. तुमच्या पायाच्या ठोकरीनं माझ्या डोक्याच्या चिंधळ्या उडून मी रक्तबंबाळ झालों म्हणजे तरी खास, तुम्हांला माझी करुणा येईल, अन् मग तुम्ही मला आपल्या छातीशीं उचलून धरून, "तुला क्षमा आहे" असं म्हणाल, अशी माझी पक्की खात्री आहे! आणि असं होईल तेव्हांच उठेन मी हे पाय सोडून.

**सयाजी**—तर माझे पाय नाहीं सोडीत तूं?

**जयाजी**—नाहीं.

**सयाजी**—तर मग तूं हें सांग अगोदर—

**जयाजी**—काय सांगूं?

**सयाजी**—तूं हा नाहींस का?

**जयाजी**—हा कोण?

**सयाजी**—हा कोण! दगलबाज! दगलबाज नाहींसतूं?

**जयाजी**—आहे, कबूल आहे!

**सयाजी**—फंदफितूरी?

**जयाजी**—कबूल.

**सयाजी**—विश्वासघातकी?

**जयाजी**—कबूल.

**सयाजी**—गळेकापू?

**जयाजी**—कबूल. सारं-सारं एकूनएक कबूल !

**सयाजी**—नादान, भ्याड, बेहिमती, बेअब्रूचा, मसलतबुडव्या, फितुरी, लौकिकाची अन् कीर्तीची चाड नसणारा असा निर्लज्ज, पशू आहेस! आहेस कीं नाहींस ?

**जयाजी**—सारं कबूल, म्हणतों ना मी ! एवढंच काय पण यापेक्षांहि खंडोगणती अपराध घडले आहेत माझ्या हातून !

**सयाजी**—ज्या शर्ती पत्करून तूं आपले प्राण वांचिवले आहेस, त्या शर्ती पत्करून मी आपले प्राण बचावूं म्हणतोस ? तूं जितका नीच आणि दगलबाज आहेस, तितकाच तूं नीच आणि अधम आहेस !

**जयाजी**—तसं नव्हे ! मी एक नीचपणानं आपले प्राण वांचिवले हें मला कबूल; मीं दगलबाज होऊन सारं फोडलं हेंहि खरं; पण हें सारं करीत असतां माझा मुख्य उद्देश तुमचे प्राण वांचवावेत हा होता.

**सयाजी**—आग लागो तुझ्या उद्देशाला ! माझे प्राण वांचविण्याकारितां अन् तुझ्याकडून हें असं नियवर्तन ! मी मेलों असतों तरी काय फिकीर होती ? काय दुनिया ओस पडत होती ? [ विचार बदलून ] अथवा मीच मूर्ख ! तुझी त्यावेळची ती दीनावस्था पाहून माझं काळीज विरघळलं, म्हणून तुला माझ्या छातीशीं बिलगून धरलं; तुझे हाल बघवेनात म्हणून स्वतः झीज सोसून प्रसंगीं पैशा-अडक्याची देखील-तुला तोंड वेंगाडायला न लावतां मीं होऊन मदत केली; इतकंच करून नाहीं मी थांबलों, तर तुला मीं आपल्या दिलदार दोस्त-मंडळींच्या कटांतहि सामील करून घेतलं. आणि हें सारं तुला इमानाचा धड समजून केलं. पण हें सगळं फुकट गेलं ! तुझे बोल जसे फोल तशा तुझ्या शपथाहि खोट्या; तुझ्या शपथांना काडीचीहि किंमत नाहीं ! ही कट्यार तूं काय प्रतिज्ञा करून दिली होतीस ? स्मरण कर, स्मरण कर ! त्या वेळचा काय-बाणा काय होता तुझा ? तो सगळा एकदम कुठें नाहींसा झाला ? चल, घे ही आपली कट्यार. तुझी तुला मीं ही परत करतों. ज्या पंचमहाभूतांच्या शपथा खाऊन तूं ही कट्यार आपला विश्वास वाटावा म्हणून दिली होतीस,-आणि ज्या पवित्र शपथा तूं मोडल्यास, त्या सगळ्यांची शपथ घेऊन मीं सांगतों, कीं यापुढें माझ्या जिवांत जीव असेतोंपर्यंत तुझ्याशीं मी कोणताहि संबंध, स्नेह, अथवा

दोस्ती केव्हांहि ठेवणार नाहीं ! मग साऱ्या जगाच्या अंताच्या पलीकडे जरी कांहीं काल मला जगावं लागलं,–तरी यांत बिलकुल म्हणून अंतर होणार नाहीं ! ठीक आहे. येतों तर. राम राम ! हीच आतां तुमची आमची शेवटची भेट ! चल, हें घे आपलं हत्यार. [ कट्यार देतो ] आतां तुमचा आमचा कांहीं सुद्धां संबंध उरला नाहीं !

**जयाजी**—संबंध नको उरूं दे. पण हें पहा सयाजीराव ! " मी जगतों, प्राण नाहीं देत, "–एवढं वचन द्या मला, म्हणजे बस्स. मग आणखी कांहीं नको मला.

**सयाजी**—काय ? ' मी जगतों, प्राण देत नाहीं '–असं तुला वचन पाहिजे ? पण मला तर माझ्या प्राणांची आतां बिलकुल गुमान उरली नाहीं. उलट ते मला जड झाले आहेत. चल, तूं स्वतःच लाव त्याची वाट इथल्या इथंच !

**जयाजी**—( हुंदका येऊन ) सयाजीराव–सयाजीराव !

**सयाजी**—बस्स, पुरें इतकंच ! जास्त नको मजल यापुढें.

**जयाजी**—तुझ्यावर खिळून राहिलेले माझे डोळे तिथून हालत नाहींत. तुझ्याकडे एकसारखं पाहात राहिल्यामुळं–त्यांना गळ लागली तरी सुद्धां माझ्या डोळ्यांची अद्याप तृप्तीच होत नाहीं. याला मीं काय करूं ?

**सयाजी**—चल, सोड सोड मला ! नाहीं,–दूर नाहीं होत तूं ? चल, मीच चालता होतों तर इथून. तूं माझा नव्हेस अन् मी तुझा नव्हे ! ( त्यास लाथेनें दूर करून शिपायांस ) चला, चला ! हा तयार आहे मी. जिकडं न्यायचं असेल तिकडं घेऊन चला मला. [ तो शिपायांसह जातो. ]

**जयाजी**—संपला कारभार. हा तर निघून गेला ! मला हा माझ्या पित्याच्या आणि पालकाच्या ठिकाणीं होता. असा दोस्त–असा जिगरदोस्त मिळायचा नाहीं. जातां जातां हें एवढं हत्यार माझ्या हातीं देऊन तो चालता झाला ! ही त्याची अखेरची देणगी !—( कट्यार उचलून वर धरून ) ही कट्यार ! हिची मला पुरी जानपछान आहे. हिचि देऊन एक वेळ मीं केवढी घनघोर प्रतिज्ञा केली होती ? हिची आणि कमळजेची ताटातूट मला अगदीं एकाच वेळीं झाली होती ! पण नको, ती स्मृतीच नको व्हायला ! ती बुजेल तर

बरी ! नाहीं, ती गोष्ट यापुढें मी आपल्या डोक्यांत सुद्धां येऊं द्यायचा नाहीं ! माझ्या प्यार दोस्तानं ही शेवटची आठवण म्हणून मला दिलीन् एवढीच गोष्ट मी लक्षांत ठेवीन, आणि हिला मी आपल्या काळजाशीं अगदीं अश्शी घट्ट बिलगून ठेवून देईन ! म्हणजे या दोघांची—अशा निकट गांठीभेटीनं—जिवा-भावाची दोस्ती जमेल आणि हीं एकजीव होऊन जातील ! मग एकमेकांविषयीं साशंक होऊन त्यांना दचकण्याचं अथवा धडकी भरण्याचं कारणच उरणार नाहीं ! बस्स—बस्स ! ठरून चुकलं हें ! तेव्हां यासंबंधानं जास्त विचार नको आतां. पण त्यानं मला ठोंसा देऊन, ' तूं दगलबाज—गळे—कापू नादान—म्याड —बेहिमती—मसलतबुडव्या आहेस— ' एक ना दोन अशा अनेक दुःशब्दांचे वाक्प्रहार करून, शेवटीं मीं त्याचे पाय धरले. असतांहि त्यानं मला लाथाडलंन् ! पायाच्या ठोकरींनं लाथाडलंन् !—हें कसं विसरायचं ? थुत् ! जाना देव. हें विसरून जायला एकच उपाय ! आणि तो,—गाढ झोंपेचा,—कायमच्या गाढ झोंपेचा ! याशिवाय ही अपमानाची आठवण बुजणार कशी ? हिला कायमचीच —कायमचीच गाडून टाकून सूठमाती दिली पाहिजे ! ( मेंदूपासून कांहीं काढून टाकीत असल्याप्रमाणें हातवारे करितो. )

[ इतक्यांत कमळजा प्रवेश करिते. ]

**कमळजा**—कुठं ? दडूं कुठं आणि जाऊं तरी कुठं म्हणून बाई आतां मी ? अन् कुठें लपवूं हें तोंड ? हें दुर्दैव कसं हात धुऊन लागलंय माझ्या पाठीला ! या वेणुपुरकरांची ती सत्यप्रियता आणि वचनदक्षता कुठं गेली ? कत्तल होणार म्हणून यांना जें कापरं भरलं होतं त्यांत अथवा यांच्या निराशेंत तर ती गडप झाली नाहीं ना ? आतां मी आपलं हें तोंड तरी कसं दाखवूं बाई तिकडं ? माझ्याकडून कांहीं अपराध झाले तरी सगळं हंसण्यावारी घालवून आजपर्यंत एकदांसुद्धां माझं मन कधीं दुखाविणं झालं नाहीं ! अन् आतां तिकडं—माझ्यानं तर—डोळे वर करूनसुद्धां पाहवणार नाहीं,—माझी नजर भुई—लाच खिळून राहील ! काय—करूं तरी काय बाई आतां मी ? हो, असंच—माझ्या कृत्याचा मला पश्चात्ताप होतो आहे आतां, असं सांगून मी अगदीं दीन होऊन दया अन् करुणा भाकेन तिकडची !

**जयाजी**—हंः दया ! करुणा ! कमल ! दयाघन परमेश्वरानं तुझ्याकरितां ती अपरंपार सांठवून ठेवली आहे; तुझ्यावर त्याची पुरेपूर कृपादृष्टि आहे ! पण

माझ्यासारखा दुर्दैवी प्राणी मात्र या जगांत आजपर्यंत कोणीसुद्धां झाला नसेल! कमल! कमल! काय सांगूं तुला? आज माझ्या दोस्तानं-प्राणाहूनहि प्यार अशा जिगरदोस्तानं--कमल, तुझ्याशिवाय मला प्यार असा काय तो तोच होता एकटा-त्यानं आज माझा अत्यंत तिरस्कार करून कल्पनातीत माझी-निर्भर्त्सना केलीन्; मी त्याच्यामागं अगदीं कुत्र्यासारखा धांवत गेलों, पण त्यानं मला अगदीं झिडकारून टाकलंन्! तें कसं--हें जर तूं सगळं ऐकलंस तर तुझ्या अंतःकरणाचं पाणी पाणी होऊन, तुझं काळीज तिळतिळ तुटून जाईल!

**कमळजा**—असं काय--केलें नी तरी काय बाई त्यांनीं?

**जयाजी**—हंः काय सांगू? त्याला तिकडे ते शिपाई नेत होते, आणि इकडे माझ्या डोळ्यांतून हे असे अश्रूंचे पूर वहात होते; छाती धडधड उडत होती, अन् हुंदक्यावर हुंदके येत होते; अशा स्थितींत मीं आपलं डोकं त्याच्या पायावर ठेऊन--कसं तरी करून 'आपले प्राण बचाव'--म्हणून त्याला विनाविलें, आणि माझ्या अपराधाची मला 'क्षमा कर' म्हणून मीं त्याची दया भाकली, पण त्यानं तें कांहींएक न ऐकतां मोठ्या तिरस्कारपूर्वक माझ्यावर हात उगारून मला एक ठोसा लगावलान्, लाथ मारलीन्, आणि माझा धिःकार केलान्! नामर्द, भ्याड, दगलबाज, फितुरी, विश्वासघातकी, अशा तऱ्हेच्या दुःशब्दांचा माझ्यावर भडिमार करून मला अगदीं त्यानं नादान ठरविलंन्! इतकंच नव्हे, पण त्यानं मला लाथ मारलीन्! कमल-कमल! तूंच सांग--तूं न्यायी आहेस, सत्यप्रिय आहेस, तुला आजपर्यंत माझ्यांत कधीं नामर्दपणा, भ्याडपणा, अथवा सयाजी-राव म्हणतो तसला फितुरी अथवा गळेकापूपणा, कधीं पडला होता का दृष्टीला? चोरून नको ठेवूंस कांहीं माझ्यापासनं. तुला जें खरंखरं वाटतं तें स्पष्ट स्पष्ट सांग. त्याच्या म्हणण्याला तुझीहि जर कां संमति पडली, तर मात्र मग माझं डोकं फिरून जाऊन मला वेड लागेल! काय? मी भ्याड! नामर्द! फितुरी! गळेकापू?

**कमळजा**—हाय-हायरे कर्मा! काय हें? त्यांना क्षमा करावी गडे, याबद्दलच त्यांच्या मनःस्थितीकडं नको कां कांहीं लक्ष द्यायला इकडं? आणखी दुसरं असं कीं,-त्यांची सध्यांची ही स्थिति बघूनच जर इकडची ही अशी अवस्था होत आहे तर उद्यांचा दिवस उजाडला म्हणजे काय होईल बाई इकडची स्थिति?

**जयाजी**--( आवेशानें ) म्हणजे ?

**कमळजा**—म्हणजे काय ? उद्यां ते खाटीक, ते मांग त्यांची धिंड काढून जेव्हां त्यांना वधस्थानीं नेतील, अन् त्यांची सारीं आंतडींन् आंतडीं बाहेर काढून, तीं लोंबत आणि फरफटत इकडून तिकडे ओढून त्यांच्याच रक्तांत पायांखालच्या मातींत जेव्हां क्रूरतेनें आणि निर्दयपणानें लोळवतील, तेव्हां काय होऊन जाईल बाई इकडची स्थिति ? काय होईल इकडच्या काळजाचं ? छे: बाई, अथवा दुसरं काय व्हायचं ? आत्तां--या घटकेला माझ्या डोळ्यांतून जसे अश्रूंचे पाट वाहताहेत, तसेच पाट इकडच्या अंतःकरणांतून वाहूं लागतील, अन् दुसरं काय ?

**जयाजी**--म्हणजे ? काय म्हणते आहेस तरी काय तूं हें ? त्यांना ठार करायचं ठरलं कीं काय ? आणि तेंहि उद्यांच्या उद्यां ?

**कमळजा**--होय, उद्यांच्या उद्यां ! मेले सारे सरदार, मुत्सद्दी, आणि मंत्री उलटले आहेत आतां. अन् सगळेजण बेइमान होऊन, सगळ्यांनींच आपापल्या आणाशपथा मोडून टाकल्या आहेत ! कुणाचीदिखील मध्यस्थी आणि मिनतवारी नाहीं चालायची आतां त्यांच्याजवळ ! इतके बनले आहेत ते अगदीं उलट्या काळजाचे ! इकडच्या स्नेहीमंडळींतून कुण्णीदिखील क्षमा मागायला तयार नाहीं, जो तो मरायला सिद्ध ! एवढ्याच गोष्टीकरून त्यांना देहान्तशासन द्यायचंच त्यांनीं नक्की केलं आहे. त्याशिवाय दुसरी गोष्टच बोलतं नाहींत ते आतां ! सगळ्यांच्या मानेवरून उद्यां त्या मांगांच्या कुऱ्हाडी पडणार, हें ठरल्यासारखं आहे अगदीं ! कारण जिकडे तिकडे सारे हुकूमाविकूम दिखील पार सुटून ठरून गेलं आहे सगळं !

**जयाजी**—देहांत शासन ! अन् ठरून चुकलं आहे ! आणि त्यांत कोणाचीहि मध्यस्थी अथवा मिनतवारीहि चालायची नाहीं म्हणतेस ?

**कमळजा**--कोणच्या भयंकर आणि क्रूर रीतीनें त्यांची छळणूक करून त्यांना कबूल करायला लावावं—ह्याबद्दल चालले आहेत आतां त्यांचे बेत ! अगबाई ! ही अशी भयंकर मुद्रा कां केली ! डोळे कां फाडायचे हे असे माझ्यावर ! इकडच्या डोळ्यांकडे बघवत नाहीं बाई माझ्याच्यानं. अन् इकडचे हे ओंठ कां लागले असे एकदम थरथर कांपायला ? इतक्यांतल्या इतक्यांत इकडच्या चेहऱ्यांत कां बाई हा असा हा फरक पडला ? काय ! काय,--याचा अर्थ, तरी काय बाई !

**जयाजी**—चल, जा; निघून जा इथून ! निक्षून सांगतों आहे ना मी तुला इथून जा म्हणून ?—या वेळीं माझ्या अंतःकरणांत भयंकर विकारांचे काहूर उसळून त्यांनीं एकच हलकल्लोळ उडवून दिला आहे अगदीं !

**कमळ**—कां पण ?

**जयाजी**—कां-तें कांहीं विचारूं नकोस या वेळीं ! मुकाट्यानं निघून जा इथून एकदम.

**कम०**—अगबाई ! कां पण असं ?

**जया०**—कां पण असं ? काय सांगूं ? त्या सर्वसाक्षी परमेश्वराची शपथ घेऊन सांगतों कमल ! कीं तुझ्यावर माझं अगदीं बेहद्द निःसीम प्रेम आहे—म्हणूनच या वेळीं मी तुला इथून एकदम निघून जा म्हणून सांगत आहें. चल, जा इथून झटपट. यापुढें-या पापी हातांच्या आसपास एक क्षणभरहि तूं ठरतां कामा नयेस. नाहींतर—कमल, माझे हे हात गार नाहीं लागत तुला ? [ कट्यार अर्धवट उपसतो, व पुनः आपल्याच छातीशीं दडवितो. ]

**कम०**—छेः; मुळीं दिखील नाहींत बाई ! इथं इकडच्या हृदयाशीं— डोकं टेंकून.—मी अशी उभी राहिल्यें म्हणजे मला किती आणि काय सुख होतं म्हणून सांगूं ? गुलाबाच्या फुलांच्या पाकळ्या काढून जरी मखमलीच्या उशा भरल्या तरी त्या देखील नाहीं लागायच्या इतक्या मऊ आणि गुलगुलीत !

**जया०**—अरे ! अरे ! अरे ! इथं ह्या हृदयाच्या उशींत गुलाबाच्या पाकळ्या नाहींत, पण त्याचे कांटे मात्र भरले आहेत याची तुला कल्पना नाहीं ! कारण ते दिसत नाहींत तुला ! जा—पळ—पळ; निघून जा इथून झटपट. नाहींतर ते तुला ओरखडून रक्तबंबाळ करून सोडतील ! इथं एक कृष्णसर्प आपली फणा काढून —फुस्स् फुस्स् करून तयार आहे अगदीं तुझ्यावर उडी घेऊन तुला दंश करायला ! त्याचा रोख थेट तुझ्या काळजावर आहे ! भय नाहीं वाटत तुला त्याचं ?

**कम०**—नाहीं ! मुळींच नाहीं !

**जया०**—तूं काय केलं आहेस हें नीट लक्ष्यांत आण ! आणि मला तूं कुठं नेऊन सोडलं आहेस याचंहि पण नीट मनन कर !

**कम०**—अगबाई ! अस्सं कां ?

**जया०**—कुठं आहे ? माझा दोस्त कुठं आहे ? बोल–बोल. हं: असं मिस्किलपणानं हंसते आहेस का ? या सगळ्याचं कारण तूंच--तूंच ! हं, आतां कांपूं नकोस अशी! ती वेळ केव्हांच निघून गेली ! तुला पळायचं होतं तर तें यापूर्वीच: तुझ्या अपराधामुळेंच हें सारं घडून येत आहे हें जेव्हां तुला समजलं तेव्हांच निघून जायाला पाहिजे होतंस तूं इथून ! ती संधि तूं दवडली आहेस ! आतां माझ्या डोक्यांत एकच एक विचार घोळत आहे. आणि तो म्हणजे--जिचा सल्ला ऐकून माझ्या हातून मित्रद्रोहाचं भयंकर पातक घडलं, आणि त्याची मजल त्यांच्या हत्त्याकांडापर्यंत येऊन पोंचली—तिच्यावर सूड कसा उगवावा हा ! ( कांहीं ऐकलेंसें दाखवून ) ऐक, नीट ऐक ! तो कण्हत असलेलं नाहीं ऐकूं येत तुला ? ऐक–ऐक, हें त्याचं विव्हळणं ऐक ! तशाच ह्या त्याच्या अत्यंत दुःसह अशा आरोळ्या ! या माझ्या दोन्ही कानांत कशा घुमून राहिल्या आहेत. यांच्याशिवाय दुसरं--तिसरं कांहींएक ऐकूं येत नाहीं मला आतां ! तें–तें पाहिलंस,–त्यांनीं त्याला आतां सुळावर चढिवला, आणि ते त्याला आतां फाडफाडून त्याच्या अंगाचीं कशीं लक्तरं उडवायला लागले ते ! बघ, कोण भयंकर खून हा ? आणि हा या बदमाष आणि वचनभ्रष्ट मुत्सद्यांच्या हातून ! या खुनाचं आदिकारण तूं–खुनीहि तूं आणि गळेकांपूहि पण तूंच ! पहा--पहा तो खून ! तुझ्या–तुझ्याचमुळें घडून आलं हें सारं ! [कट्यारीकडे हात नेऊन ती चांचपडूं लागतो.] ( पुन्हां मोहवश होऊन मनोवृत्तींत चलबिचल होऊन ) पण तुझ्या डोळ्यांत हे अश्रू उभे राहिलेले पाहिले, आणि तुझ्या प्रेमाची मोहनी माझ्यावर पडली, कीं माझी चित्तवृत्ति एकदम बदलून जाते ! ( एकीकडे ) हिचे डोळेच कांहीं वेगळी भाषा बोलतात ! ( उघड ) खास, तुझ्यांत कांहीं तरी जादूटोणा, कांहीं तर चेटूक आहे ! उन्माद चढून मी भ्रमिष्ट अथवा वेडापिसा बनलों तरी तशा अवस्थेंतहि माझा हात तुझ्यावर उचलणार नाहीं ! चल, ये. अशी कांपूं नकोस. इथं–माझ्या छातीशीं–अगदीं निर्भयपणें -घट्ट बिलगून उभी रहा. हें तुझं निर्भयस्थान आहे; हा तुझा बालेकिल्ला आहे ! ( पुन्हां एकदम बदलून ) छेः पण–दूऽर –दूरच उभी रहा ! परमेश्वराला न्यायच रुचतो; आणि तोच झाला पाहिजे ! नाहींतर–माझ्या पापी वचनभंगामुळें जिथं त्याच्या दयेचे धागे पोंचूं शकणार नाहींत अशा स्थळीं मला खितपत पडावं लागेल ! ( कट्यार उपसून पहातो ) तर चल,–मी डोळे मिटतों–अन् डोळ्यांच्या एका उघडझांपीच्या आंत सारं उरकून टाकतों पार सारा निकाल——

**कम०**—काय मनांत तरी काय आहे इकडच्या निकाल कसला ? माझ्या-माझ्या प्राणांचा अन् प्रेमाचा तर नव्हें ? छातीशीं कां असा कां हात न्यायचा ? तिथं तर कांहीं होत नाहीं ना ?

**जया०**--तिथं हें होतं। [ तो कट्यार उपसतो व तिच्यावर चालवूं पाहतो ] हाच-हाच तो कृष्णसर्प !

**कम०**—अगबाई ! ही तर कट्यार ! अन् ही कां उपसा यची अशी ? माझ्यावर कां उपसायची झाली आहे ही ?

**जया०**--हो-हो, तुझ्यावरच.

**कम०**—कां पण ती ? असं काय बाई-घडलं आहे तरी काय माझ्या हातनं ? ( ती कांपूं लागते )

**जया०**--घडलंय काय ? किती तरी घडलं आहे ! तुझी अन् माझी जेव्हां ताटातूट झाली आणि मीं तुला त्यांच्या हवालीं केली तेव्हांच ही कट्यारहि पण मीं त्यांच्या हातीं दिली होती: मी बदललों तर ही तुझ्या छातींत--तुझ्या काळजांत-खुपसावी म्हणून दिली होती ! आणि तेव्हां कुठं त्यांनीं माझ्या शब्दावर विश्वास ठेवला ! पण ते शब्द पाळले कुठें मीं ? वचनभंग करून निमकहलाल बनून त्यांच्याशीं मीं निमकहरामी केली ! त्यांचा विश्वासघात करून त्यांच्या नरडीवर गळफांस आणून मिडिवले ! तेव्हां आतां माझ्या या दगलबाजीबद्दल माझ्या पापाचं क्षालन हें झालंच पाहिजे !—[पुन्हां तिच्यावर कटयार उगारतो.]

**कम०**--नका हो नका, असे कठोर होऊं नका ! (गया-वया येते व कांपते)

**जया०**--छत् आतां मी कांहीं एक ऐकणार नाहीं; मग धडपड कां ही आतां उगीच ?

**कमळजा**—( त्याचे गळ्यांत एकदम मिठी मारून ) आतां-आतां करावी मला ठार! माझ्याकडे किती तरी क्रुद्ध मुद्रा करून पाहायचं होत आहे; अन् रागानं हे ओंठ तरी किती थरथर कांपताहेत ! पण याचं नाहीं मला भय वाटत. ( एकदम त्याचें चुंबन घेऊन) ही पहा-हें अमृत पिऊन मी आतां अमर झाल्यें ! आत्तां मी मोठ्या आनंदानं मरेन ! असा आनंद यापुढं नाहीं लाभायचा. हं ! चालवावी, चालवावी ती कट्यार खुश्शाल चालवावी आतां माझ्यावर !

**जयाजी**—[ वृत्ति पालटली जाऊन] खरोखर-खरोखर, मी भ्याड, नादान आणि नामर्दच आहें ! पृथ्वी, आप, तेजवायु आदीकरून पंचमहाभूतांनों ! पहा,

तुम्हींच पहा-मी कसा, नादान आणि नामर्द झालों आहे तें! नुसत्या एका घांवाचंच काम होतं! पण आतां—आऽतां तुझ्यावर माझं जें अलोट अन् अभंग प्रेम आहे तें तुझ्यावर माझा हा हात अन् ही कट्यार उचलूंच देत नाहीं! [ कट्यार फेंकून तिला आपल्या हृदयाशीं घट्ट धरितो. ] माझे खुनी विचार कुठल्या कुठें मावळले! खचित, परमेश्वर तुझ्यावर फार प्रसन्न दिसतो! त्यानं आपलं दिव्य कवच तुझ्या अंगावर चढिवलं आहे. आणि तो तुझ्याकडून खास कांहीं तरी अलौकिक आणि अश्रुतपूर्व असा चमत्कार घडवून आणणार असला पाहिजे! खास, एक माझं तोंड उजळ करायला तरी, अथवा माझी पुरी बदनामी करून माझ्या तोंडाला काळोखी फांसायला तुला त्या परमेश्वरानं निर्माण केली असली पाहिजे! माझ्या प्राणांवर तूं जी ही विलक्षण अद्भुत शक्ति चालवीत आहेस ती, त्याचप्रमाणें हे तुझे मोह पाडणारे अश्रू, हें तुझं विजयी स्मित, आणि तसंच तुझं हें अजिंक्य आणि विजयी प्रेम, हीं सर्व या गोष्टीची साक्षच देत आहेत: प्रत्यक्ष तर यांचाच आश्रय कर, आणि अशीच्या अशी-अगदीं तडक धांवत-आपल्या बापाकडे जा; मग तो अंतःकरणाचा कितीहि क्रूर, निर्दय अथवा कठोर असूं दे. त्याला भेटून त्याचे पाय धर. आणि कसंहि करून माझ्या दोस्तांचे प्राण वांचीव! नाहींतर आपल्या साऱ्या भावी सुखावर आजच सर्वस्वीं कायमची आग पाखडली गेली म्हणून समज! त्याच्याकडे जा, त्याच्या हातापायां पड, त्याच्या कंबरेला मिठी मार, अन् डोळ्यांत आसवं आणून आपल्या डोळ्यांतून वाहणाऱ्या अश्रूंनीं त्याच्या कठोर—फत्तरफोड हृदयाला पाझर फोड. आणि तिथं जो एक कट्टर सैतान—खवीस—बसला आहे—त्याला तिथून पार हुसकून दे! घट्ट मिठी मारून त्याला अगदीं कवटाळून धर, सोडूं म्हणून नकोस. आणि आपल्या गोड, मृदु, आणि लाघवी बोलण्यानं कृतकर्मांचा त्याला पश्चात्ताप वाटेल असं कर. अथवा तुझे हे डोळे आणि हे अश्रूच आपल्या मूक भाषेनें त्याच्या हृदयाला पाझर फोडतील! त्याच्या साऱ्या कठोरपणाला विरघळून टाकतील! तुझ्या म्हणण्याला त्याच्याकडून रुकार मिळेपर्यंत तूं त्याला मारलेली मिठी सोडूं म्हणून नकोस! मला जिंकून माझ्यावर जसा आज तूं विजय मिळविला आहेस तसाच त्यालाहि जिंकून विजयी होऊन ये! तूं आज जा-जाच तर!

[ दोघेहि जातात.

**अंक ४ था समाप्त.**

# अंक ५ वा



## प्र. १ ला

**स्थळ.** पिलाजीरावांच्या घरांतील एक खोली.

प्रवेश [ **पिलाजीराव** प्रवेश करितो. ]

**पिलाजीराव**—देवा, माझ्यावर कां बाबा तूं असा कठोर झालास ? माझे हे शेवटचे दुःखाचे दिवस लांबविले आहेस कशाला उगीच ? ह्या म्हातारपणीं माझा नसता दुर्लौकिक होऊन व्यर्थ कलंक लागतो आहे मला हा. ह्यांत माझा कां कांहीं अपराध होता ? मी कां कोणाचा गळा कापला, कां कोणाचा विश्वासघात केला ? छेः असं तर कांहींच माझ्याकडून घडलं नाहीं. पण माझ्या एकुलत्याएक मुलीनं-त्या पोरटीनं--त्या कंगाल भिकारड्याशीं लग्न लावलं आहेन—माझ्या इच्छेविरुद्ध लग्न लावलं आहेन, यामुळं माझ्या कुळाला केवढा बट्टा लागून राहिला आहे ! हें एवढंच शल्य सलतंय मला रात्रंदिवस ! याची आठवण झाली कीं राहून राहून माझ्या डोक्यांत कांहीं तरी कोरल्यासारखं--पोंखरल्यासारखं--होतं ! काय होतं हें माझं मलाच कळत नाहीं ! मी असं कोणतं पातक केलं होतं कीं माझ्या पोटीं अशी कुलकलंक कन्या निपजावी ?

[ इतक्यांत **कमळजा** प्रवेश करिते. ]

**कमळजा**—अगबाई, हे इथं आहेत बाबा ! कोणच्या तोंडानं तरी म्हणूं यांना मी बाबा म्हणून ? पांच वर्षं झालीं अजून तरी यांचं पाषाण हृदय द्रवलं असेल, कां पूर्वीसारखंच कठोर असेल ? ह्या इतक्या वर्षांत मायेचा किंवा सुखाचा शब्द मला लाभला असेल तर शपथ ! एकदां जी इथून गेलें ती हा वेळपर्यंत ह्या घराचं पुन्हां दर्शनसुद्धां नाहीं ! माझ्या पाठीमागं माझं दुर्दैव जें हात धुऊन लागलं आहे तें अजून नाहीं माझी पाठ सोडीत. आणि रोज या नव्या नव्या संकटांनीं तर मला भंडावून आणि गांजवून सोडलंय अगदीं !

**पिलाजीराव**—कोण आहे ? कोण आहे तिथं ? कोणी दुःखानं गांजलेली पोरकी पोर आहे ! अन् हा असा मळवट भरून, अन् अंगावर ही अशी

लकतरं धारण करून कुठं चालली आहेस ? सुळावर बांधायला चालिवली आहे कीं काय तुला कोणी ? कां बळी द्यायला नेताहेत कोणी तुला मसणवटांत ? या तुझ्या दीन वेषावरून मसणवटाचीं वाटच सुधारल्यासारखी दिसत आहेस तूं !

**कमळजा**—ही एक हतभागी, कपाळकरंटी, दुःखानं पोळलेली दीन गाय आहे हो! ही मढ्याा गाळांत रुतली आहे ! त्यांतून काढाल कां हो हिला हिच्या-वर दया करून ? मी एकदां मोठ्या वैभवशिखरावर होतें, पण सध्यां तिथून कोसळून दुःखाच्या आणि संकटाच्या खोल गर्तेंत येऊन पडलें आहे हो !

**पिलाजी**—काय म्हणणं आहे तुझं ? खास तुझ्या ह्या मुद्रेवरून तुझ्यावर संकटांचा अन् दुःखांचा गहजब झाला असावा असं दिसतं. बोल, मी काय करावं म्हणतेस ? काय, तुझं काय आहे म्हणणं ?

**कमळजा**—म्हणणं काय असायचं माझं ? क्षमा आणि दया यांची भीक मागायला आलें आहे मी ! ( तोंडावरील बुरखा दूर करून ) अहो, बाबा ! ही दुर्दैवी कमळजा तुमची मुलगी--तुमची कन्या—आहे हो. ही काय म्हणते तें ऐकून तरी घ्याल कां आणि हिचे झाले अपराध पोटांत घालून हिला पुन्हां एकदां आपली लेक म्हणवाल कां ?

**पिला०**—काय माझी पोर !

**कमळ०**—होय, होय ! तीच ! बाबा, मी लहान असतां तुम्हीच ना लाडि-वाळपणानं माझ्या बाळपणीं माझ्या तोंडावरून हात फिरवून—माझे मुके घेऊन—माझा तोंडावळा हुबेहूब माझ्या आईसारखा दिसतो असं म्हणत होतात ?

**पिला०**—छट् ! त्यांपैकीं एक देखील गोष्ट नको काढूंस आतां. मागच्या आठवणी !—मागच्या आठवणी बिलकूल नको देऊंस आतां. त्या मी केव्हांच पार विसरून गेलों आहे. जवळ जवळ.

**कमळजा**—बाबा ! बाबा, हें असं कसं बरं म्हणतां ? मागच्या आठवणी कशा हो बुजतील ? तुमच्या एक बुजाल्या असतील पण त्या माझ्या कशा बुजायच्या ? आणि तुम्हांला त्यांची आठवण दिल्याशिवाय माझ्यानं कसं राह-वेल ? दिलीच पाहिजे—दिलीच पाहिजे ती मला. आणि तुम्हांलाहि पण ती ऐकलीच पाहिजे. माझं, अन् तिकडचं लग्न झाल्यापासून—

**पिला०**—लग्न ? आग लागो त्या लग्नाला. त्या लग्नाचं अन् त्याचं नांव सुद्धां काढूं नकोस माझ्यापुढं. देव त्याचं कध्धीं कध्धीं कल्याण करणार नाहीं !

**कमळ०**—बाबा ! बाबा ! नका हो नका, शापूं नका असं तिकडं. तुमच्या-संबंधानं तिकडून असा एक दिखील कठोर शब्द—खाचित नाहीं हो, जरी जीव जायची पाळी आली तरी दिखील कध्धीं कध्धीं नाहीं हो तोंडांतून बाहेर पडायचा झाला मग माझ्याशीं तिकडचं वागणं कसंहि असो !

**पिला०**—ऑ ! म्हणजे काय—म्हणतेस काय तूं ? कां, अशी कांपतेस कां ? बोल, बोल काय तें ?

**कमळजा**—बाबा ! बाबा ! त्या गोष्टीचा तुम्ही मला उच्चार करायला न लावलेलाच बरा. तें तुम्ही विचारूं नये अन् मी सांगूं पण नये ! तें माझ्यानं वदवणार दिखील नाहीं !

**पिलाजी**—म्हणजे ? याचा काय अर्थ ? असा काय--प्रसंग काय ओढवला आहे तुझ्यावर ?

**कमळजा**—प्रसंग ! बाबा, निर्वाणीचा—निर्वाणीचा प्रसंग ओढवला आहे हो माझ्यावर आणि म्हणून तर तुमची एकदां शेवटची भेट घ्यावी, तुमची क्षमा मागावी, अन् ती केल्याचं तुमच्या तोंडून ऐकावं अन् मग सुखानं मरावं, एवढ्याचकरितां मी तुमच्या पायापाशीं धांव ठोकली. म्हटलं कीं मरतांना तरी जिवाची हुरहुर दूर करून—सुखानं मरावं ! म्हणून म्हणतें—बाबा ! ह्या कमळला एकदां ‘ कमळ ’ म्हणून हांक मारून, एक क्षणभर कां होईना, आपल्या पोटाशीं धरा आणि ‘ तुला क्षमा केली आहे. ’ एवढं म्हणा, म्हणजे झालं. मग माझी कांहींहि इच्छा उरणार नाहीं ! बाबा ! बाबा ! माझी आई असती तर—पण आतां मला आईच्या ठिकाणीं तुम्हीच आहांत. तुमच्याशिवाय दुसरं मायेचं असं कोण आहे आणखी मला ?

**पिलाजी**—( एकीकडे ) हिच्यावर काय प्रसंग ओढवला आहे कांहीं कळत नाहीं ! पण हिचे हे शब्द माझ्या काळजाला घरें पाडीत आहेत ! ( उघड ) कमल--कमल ! काय--काय आहे तुझं म्हणणं ?

**कमळ**—माझं म्हणणं ? माझं म्हणणं दुसरं तिसरं कांहीं नाहीं. (आनंदानें) अहाहा ! हे शब्द—बाबा ! मी किती दिवसांनीं, नव्हे किती वर्सांनीं ऐकतें आहे मी तुमच्या तोंडून ? खरंच, बाबा ! आतां मी अगदीं सुखानं मरेन ! पण

माझ्या झाल्या गेल्या अपराधाबद्दल ' तुला क्षमा केली आहे ' एवढं म्हणा, म्हणजे मग माझ्या ह्या आनंदाला पारावार उरणार नाहीं ! हो, मग अगदीं एक शेवटची विनंति करीन मी—

**पिलाजी**—कमल ! क्षमा--क्षमा आहे तुला. पण शेवटची विनंति काय म्हणालीस तूं ?

**कमळ**—शेवटची विनंति एवढीच कीं जिथं माझ्या आईची शेवटची राख पडली, तिथं-अगदीं तिथंच बरं का बाबा, माझीहि राख पडावी ! म्हणजे ती दिखील माझ्या अपराधाची मला क्षमा करील ! ती आज जिवंत असती तर—

**पिलाजी**—(तिला पोटाशीं धरून) कमल-कमल ! पोरी ! बोल, तुझ्या-वर असा काय-प्रसंग तरी काय-आला आहे ?

**कमळ**—आतां मी धन्य झालें बाबा ! यावेळीं माझ्या आईनंच मला पोटाशीं धरली आहे असं मला वाटलं ! खरंच, बाबा ! मी आतां अगदीं सुखानं आणि आनंदानें मरेन ! तुम्हीं मला क्षमा केलीत, मला पोटाशीं धरलीत एवढ्या-नंच मी सारं भरून पावलें. आतां माझी कांहींहि वासना उरली नाहीं. आतां त्या मरणाला कोण भिईल ?

**पिलाजी**—पण कमल, तुझ्यावर असा काय-प्रसंग तरी काय आला आहे तो तर सांगशील ?

**कमळ**—तो मी कसा सांगणार बाबा ? तिकडचं मी नांव काढलेलं दिखील जर तुम्हाला खपत नाहीं.–

**पिलाजी**—कमल–! तूं तें बिनदिक्कत सांग,–मी तूं सांगशील तें सारं ऐकायला तयार आहे. नाहीं, तूं तें सांगितलेंच पाहिजेस.

**कमळ**—असंच असेल, तर ऐका बाबा ! पण कोणच्या तोंडांनीं आणि कसं म्हणून सांगू तें ? बाबा, ज्या ह्या दुर्दैवी कमळजेवर तिकडचं अलोट आणि अतोनात प्रेम होतं, ह्या तिच्याच काळजांत खुपसण्याकरितां म्हणून तिकडून आतांशा आपल्या छातीशीं कट्यार तय्यार ठेवलेली असते !

**पिलाजी**—कट्यार अन् ती तुला ठार करायला ?

**कमळ**—हो हो ! मला ठार करण्याकरितांच ! आणि तें कां म्हणाल तर ऐका, बाबा ! वेणीपूरच्या विरुद्ध मसलती जेव्हां सुरू झाल्या आणि बंडखोरांच्या कंपूत जेव्हां जाऊन मिळायचं झालं अन् त्यांचा इकडच्यावर जेव्हां जेव्हां विश्वास

बसेना तेव्हां मला एका: कट्यारीसकट त्यांच्या हातीं द्यायची झाली, अन् ' मी फिरलों ' तर ही कट्यार बेलाशक हिच्या ' छातीत खुपसा ' असं सांगितलं ! त्याबरोबर अगदीं चर्र झालं माझ्या पोटांत आणि पुढचं सगळं माझ्या डोळ्या-पुढं उभं राहिलं ! पुढें संधी आल्याबरोबर मी माझ्याकडून असं भलतंच न करण्याविषयीं मन वळविण्याचा प्रयत्न केला. त्यांत अंबाबाईनें मला यशहि दिलंन. त्याप्रमाणें इथवर येऊन सगळं कबूल करून आपल्या कटांतल्या अगदीं जिविश्चकंठश्च मंडळींचीं नांवं दिखील सांगायचीं,—अन् हें सारं दरबाराकडून पूर्वी अभयवचन मिळालं म्हणून ! आणि आतां तर त्या सगळ्यांच्या प्राणांवर येऊन बेतलं आहे ! आपण वचन काय दिलं, पुन्हां फिरलों कसें आणि तें कोणच्या आशेवर ?—आणि त्यामुळं आज प्रसंग काय आला ह्या विचारानं तिकडचं डोकं फिरून गेलं आहे. आणि हें सारं माझ्या नादाला लागून केलं ! ह्या सगळ्या गोष्टींचं कारण मी असं आपल्या मनाशीं ठरवायचं होऊन त्या मंडळींचा विश्वास-घात केल्याबद्दलचं प्रायश्चित्त आपल्या स्वतःलाच घेतलं पाहिजे. आणि घेतलेल्या शपथेंतून मुक्त होण्याकरितां पहिल्यांदा ती कट्यार माझ्या काळजांत भोकसून माझा बळी द्यावयाचा असा तिकडचा निश्चय झाला आहे ! अगदीं माझं बलिदान ह्याकरितां आहे; आणि मी तरी याच्या आड कशी येणार ?

**पिलाजी**—(निःश्वास सोडून) अरे राम ! राम ! राम ! एकून असा निर्दय आहे तो ?

**कमळजा**—निर्दय ? छेः छेः माझ्यावर किती तरी प्रेम आहे तिकडचं म्हणून सांगूं ? पण आपल्या विश्वासघातामुळें त्यांचे प्राण जात आहेत म्हणूनच ह्या गोष्टीला उद्युक्त व्हायचं !

**पिलाजी**— ( पुन्हा निःश्वास सोडतो ) कमळ !

**कमळ**—बाबा, तुम्हीं हा असा कां निश्वास टाकलांत ?

**पिलाजी**—कां टाकला कमळ, त्याचं तुझ्यावर इतकं प्रेम आहे तर एकून ? तर सांग मी काय करूं तुझ्याकरितां ?

**कमळ**—बाबा ! माझ्यावर जर तुमचं यत्किंचित् प्रेम असेल तर आत्तांच्या आत्तां दरबारापर्यंत अगदीं धांवत जा, आणि ह्या तुमच्या हतभागी कमळजेच्या उरांतून ती कट्यार जोंपर्यंत आरपार भोंसकून बाहेर निघाली नाहीं तोंपर्यंत तिकडच्या स्नेहीमंडळींचे प्राण वांचवा !

**पिलाजी**--अरे ! अरे ! अरे ! कोण भयंकर प्रसंग हा ! राम--राम--राम ! कमल ! कमल !

**कमळजा**—बाबा ! बोला-बोला; एवढं सुद्धां कां नाहीं व्हायचं तुमच्या हातून ? रडतां कां ? रडूं नका असे. उगीच टिपं कां टाकतां अशीं ? जा ना-जा ना एकदम तिथवर ह्या आपल्या कमळकरतां जा. नाहीं नका म्हणूं.

**पिलाजी**—छेः छेः कमल ! तुला कोण नाहीं म्हणेल ? रामजीची शपथ तर, हा बघ मी याच पावलीं चाललों. त्या कटवाल्यांपैकीं एकाच्या देखील केसाला धक्का म्हणून नाहीं लागावयाचा आतां. बाळे ! आजपर्यंत मी तुझ्याशीं अत्यंत कठोरपणानें वागलों. ह्याबद्दल क्षमा कर तूं मला ! यापुढें बापानं आपल्या लेकीवर जसं प्रेम करावं तसं करीन मी तुझ्यावर. तुला अशी उघडी करून देशोधडीला नाहीं लावणार भटकायला. माझ्या प्राणापेक्षांहि तूं मला अधिक प्यारी आहेस. आतां जोंपर्यंत माझ्यांत धुगधुगी आहे तोंपर्यंत तुझ्यावरील हें माझं प्रेम बिलकूल नाहीं कमी होणार ! तूं लहान असतांना तुला आपल्या अश्रूंनीं न्हाऊं घालून जिनं तुझ्याकडे बघत बघतच शेवटीं आपले प्राण सोडलेन, तिच्यासारखीच सध्यां माझ्या मनाची स्थिति होत आहे ! हं, रडूं नकोस अशी. आणि धीरहि पण नको सोडूंस. हा बघ चाललोंच मी. मी परत येईपर्यंत स्वस्थ ऐस तूं आतां इथं. येतों-येतों तर मी.

**कमळ**—या ! पण बाबा ! एवढं लक्षांत असूं द्या कीं तुम्हीं दरबारांत जी तरफदारी करायला जात आहां तें केवळ आपल्या पोटच्या ह्या गोळ्याकरितां—ह्या कमळकरतां—म्हणूनच जात आहांत वचन दिल्याप्रमाणें सगळे जण जिवंत सुटले तरच ही कमळजा यापुढें तुमच्या दृष्टीला पडेल. नाहीं तर ही कमळजा—नाहीं आतां माझ्यानं—

**पिलाजी**—( तिचे तोंडावर हात ठेवून ) कमल ! कमल ! यापुढें एकहि अभद्र शब्द तूं उच्चारूं नकोस. त्यानं माझं हृदय—हें पहा कसं—पण जाऊं दे तें. मी जाऊन येतोंच इतक्यांत.

[ दोघे दोन्हीकडे जातात.

**प्रवेश १ ला समाप्त.**

---

## प्रवेश दुसरा.

**स्थळ**—एक बाग.

प्रवेशः-[ जयाजी प्रवेश करितो ]

**जयाजी**—हे आकाशस्थ देवांनों! ह्या पापी जगावर-ह्या पृथ्वीतलावर-हें आकाश कोसळून पडून ह्या साऱ्याचा चक्काचूर कां नाहीं उडवून टाकीत-अन् त्याबरोबरच सर्व जीवजंतूंचा? ह्या वेणुपुरावर तर याहिपेक्षां भयंकर प्रसंग कोसळून, माझ्याप्रमाणेंच इथल्या प्रत्येक प्राण्याचा एकच आगडोंब होऊन गेला पाहिजे!

**कमळजा**—( त्यास पाहून ) अगबाई, इकडं कोणीकडं? अन् वेणुपुरासंबंधानं हे भलतेच उद्गार काय काढायचे? अस वेणुपुराचं असं झालं तर माझं कसं होईल मग?

**जयाजी**—( तोंड फिरवून ) ही साडेसाती कुठून आली इथं? मरीआई कां येईना त्या वेणुपुराला अन् त्याचबरोबर—

**कमळजा**—मला--असंचना म्हणायचं होतं मनांत? तर मग आतां काहीं धडगत उरली नाहीं म्हणायची! मला आपल्या कट्यारीला बळी पडलं पाहिजे, —हें ठरलंच तर एकून?

**जयाजी**—यापुढें आपल्या मनांत हे असले मरणाचे विचार मात्र बिलकूल येऊं देऊं नकोस आपल्या डोक्यांत! कारण सध्यां मृत्यूला भयंकर मृत्युकांड उरकायचं असल्यामुळं त्याला क्षुद्र जीवांकडं लक्ष द्यायला फुरसतच नाहीं! तूं आपल्या बापाकडून माझ्या दोस्तांचे प्राण वांचविण्याकरितां रदबदली करवलीस, पण त्यांत तुला यश आलं नाहीं--ही दुर्दैवाची गोष्ट आहे! पण तुम्हां दोघांच्याहि या कामगिरीबद्दल मी तुमचा ऋणी आहेः अत्यंत-अत्यंत ऋणी आहे! पण त्या सर्वांचा असा विश्वासघात करून मी मात्र अद्याप जिवंत वावरतों आहें! मी वचनभंग केल्याची गोष्ट मला डांचत आहे. याचें प्रायश्चित्त-माझं मलाच घेतलं पाहिजे!

**कमळजा**—हें कायबाई असं म्हणायचं? असं म्हटलं तर या प्रायश्चित्ताची वांटेकरीण मी आहे, असं नव्हे का? इतकंच नव्हे, पण इकडचं मन

मळवून-मी या सगळ्या गोष्टीला कारण झाल्यें म्हणून सगळाच दोष माझा आहे. तेव्हां हें सारं प्रायश्चित्त मलाच मिळालं पाहिजे !

**जयाजी**—कमल ! असं वेड्यासारखं भलतंच बोलूं नकोस.

**कमळजा**—मी म्हणतें केल्या गोष्टीचा इकडं इतका पश्चात्ताप आणि दुःख होतं आहे तर तीं कट्यार आपल्याच हातांनीं: इथं खुपसून आपल्या शपथेंतून मोकळं व्हावं ! इकडच्या हातून मला मरण आलं तरी मी मोठ्या आनंदानं मरेन. हूं का चूं दिखील करणार नाहीं. पहावी-माझी परीक्षा. पहावी हवी तर ! ( स्फुंदून स्फुंदून रडते ).

**जयाजी**—कमल ! कमल ! हें रडं आणि हे अश्रू काय या वेळीं ? ( विषय बदलून ) कमल, मला तुला एकदोन प्रश्न विचारायचे आहेतः त्यांचीं उत्तरं देशील कां ?

**कमळजा**—हें काय बाई विचारणं ? आपल्या प्रश्नांना मीं उत्तरं दिलीं नाहींत असं आजपर्यंत कधीं झालंय कां ? अन् आजच कां असं विचारायचं ?

**जयाजी**—तसं नव्हे ग. तूं या वेळीं जरा दुःखांत आहेस म्हणून तुला असं विचारलं.

**कमळजा**—विचारावं काय विचारायचं असेल तें.

**जयाजी**—आपल्या लग्नाला किती दिवस झाले आज ?आणि तें कोणच्या कु-मुहूर्तावर झालं होतं ? आठवण आहे कां तुला याची ? तें कोणत्या महिन्यांत झालं, अन् त्या दिवशीं तीथ, वार कोणता होता ? आठवतं कां कांहीं ? कर, नीट आठवण कर.

**कमळजा**—अगबाई ! ( रडें येतें ).

**जयाजी**—हं-हं.

**कमळजा**—हें कां विचारायचं पण ? देवाची शपथ तर, मला नाहीं बाई इतकी आठवण ! पण कशासाठीं हवीं आहेत तीं तिथीन् वार ? ( रडं येतें ).

**जयाजी**—हं हं, एवढं नको.

**कमळजा**—कित्ती आवरलं तरी आवरत नाहीं हें. काय, करूं तरी काय बाई मी याला ? हे पहा पाट चालले आहेत अगदीं जसे !

**जयाजी**—चल-चल, अशी ये तर ( तिला छातीशीं धरून ) या तुझ्या

पाटांना मी माझ्या चुंबनानं आडवून धरून त्यांना कोरडे ठणठणीत करून सोडतों!

**कमळजा**—काय बाई, तर मग इतका कां वाईट मुहूर्त होता तो!

**जयाजी**—वाईट मुहूर्त म्हणून विचारतेस काय? अगदींच वाईट मुहूर्त असला पाहिजे तो! खास, त्या दिवशीं माझा घातवारच असला पाहिजे!

**कमळजा**—" पण आजवर असा आनंदाचा दिवस कधीं यायचा नाहीं " असं कित्तीदां तरी बाई म्हणायचं होत असेल! त्या वेळीं तिथीचं अन् वाराचं कुणाला भान होतं? पण आजच कां हीं तिथीन् वार आठवलीं?

**जयाजी**—हा असा घातवाराचा दिवस उजाडला म्हणून!

**कमळजा**—हों—हो, हें विसरल्येंच होतें मी अगदीं. आज माझा घातवार उजाडला आहे खरा! एकून म्हणून विचारायची झाली· तर लग्नाची तीथ अन् वार?

**जयाजी**—छेः छेः! छेः छेः! कमल, हे असले अशुभ उद्गार मात्र काढूं नकोस. ह्या उद्गारानं माझ्या हृदयाला घरें पडतात; कारण, तुझ्यावर माझं तसंच विलक्षण प्रेम आहे!

**कमळजा**—अगबाई! एकून अजून देखील प्रेम आहे तर माझ्यावर?

**जयाजी**—शंका कसली? कमल! तुझ्यावर माझं जें प्रेम आहे त्याच्या तोडीचं प्रेम या साऱ्या दुनियेंत नाहीं कुठें कोणाला आढळून येणार! कमल! तुझा नाहीं, माझाच तो घात वार होता असं मला आतां कळून चुकलं आहे. आणि एवढ्याचकरितां आलों आहें मी या वेळीं तुझी इथं गांठ घ्यायला. आपलं लग्न होऊन तीन वर्षं झालीं आज; अजूनपर्यंत नाहीं कधीं आपण एकमेकांपासून दूर राहिलों. प्रसंगच नाहीं आला कधीं तसा.

**कमळजा**—इडापिडा टळो अन् येऊं देय पण नको कधीं असा प्रसंग! मरण जरी आलं आपल्याला तरी तें देखील एकदम येऊं दे दोघांना. म्हणजे अंतर्वैरी तरी नको व्हायला कोणी कोणाचं! एका चितेवर—चिता कसची ती—एका पलंगावरच—निजूं दोघेजणः तिथं कुणी नाहीं नाहीं यायचं मग आपली झोंप मोडायला! वाटेल तितके दिवस निजूं, अन् ही मोठी रात्र सरून उजाडलंच जर कधीं, तर मग दोघेहि मिळून एकदमच उठूं! आणि मग हीं जी येईल ती अगदीं शाश्वतची पहांट!

**जयाजी**—कमल ! तुला असलं अमंगल चिंतायला नाहीं आलों मी इथं ! तुझं कांहीं अभीष्ट—तुझं कल्याण चिंतावं म्हणूनच आलों आहें मी इथें या वेळीं.

**कमळजा**—मग मी कधीं नको म्हटलं आहे इकडं असं करायला ?

**जयाजी**—होय ना ? ऐक तर मग—हे करुणासागर, हे उदारचरित, हे दयाघन परमेश्वरा ! गंगाजलाप्रमाणें निर्मल आणि पवित्र अशा या चंद्रमुखी कमलवर तूं आपल्या आशीर्वादांचा आणि कृपाप्रसादांचा वर्षाव करून सोड. कारण कशाहि स्थितींत हें कमल प्रसन्न राहून आपल्या सुगंधित परिमलानं दाही दिशा दरवळून सोडील असंच आहे. तर यापुढें हिला सदोदित शाश्वतची शांति आणि सुरक्षितता, सन्मान आणि लौकिक, आदर आणि गौरव हीं लाभूं देत. हिला केंव्हांहि कशाचीहि वाण पडूं देऊं नकोस. कोणताहि दुःखद प्रसंग पाहण्याचं हिच्यावर येऊं देऊं नकोस ! आणि तसंच हिच्या पवित्र अंतःकरणाला केंव्हांहि अमंगल, अशिव, आणि अशुभ गोष्टींचं वारंसुद्धां लागूं देऊं नकोस. तसंच यापुढील हिच्या रात्री आणि हिचे दिवस मोठ्या सुखांत जाऊं देत; कारण ह्या दिवसरात्री हिच्या पवित्र आणि पुण्य विचारांना सदृश अशाच आहेत. आणि एवढी कृपेची देणगी दिल्यावर हे सच्चिदानंदा, हिच्यावर ज्याचं अगदीं निष्कपट आणि निस्सीम प्रेम होतं—त्याचा वियोग सहन करायला आणि उरलेलं आयुष्य सदाचरणानं कंठायला सामर्थ्य आणि बळ दे. आमची ही कायमची ताटातूट—आमचा हा वियोग—परमेश्वरा, तुझ्याच इच्छेनं होत आहे !

**कमळजा**—अगबाई ! काय—ताटातूट ! कायमची ताटातूट ? अन् कां—

**जयाजी**—हो—हो, ताटातूट ! कायमची ताटातूट !! त्याबद्दल मी शपथ देखील घेऊन चुकलों आहें ! तुझा माझा वियोग होऊन त्यामुळं तूं मला अंतरणार आणि माझा सर्वस्वीं घात होणार, हें मी जाणून आहें. पण निरुपाय आहे माझा या गोष्टीला. याला मी तरी काय करूं ? गोष्ट होऊन चुकली. ती चुकवणं शक्य नव्हतं. आतां त्याचा विचारच नाहीं करून उपयोग मुळीं देखील. तेंव्हां आतां या घटकेला तुझी माझी कायमची ताटातूट ही झालीच पाहिजे !

**कमळजा**—काय ? कायमची ताटातूट ? काय ऐकल्यें मी हें ? अरे देवा ! एकून हेंच वाटतं अभीष्ट अन् कल्याण चिंतायचं माझं ? यापेक्षां माझ्या जवळ राहायचं करून, माझं अगदीं अनिष्ट आणि अकल्याण जरी चिंतलं असतं तरी

देखील तें मला पुरवतं. मग मी कश्शाची दिखील पर्वा केली नसती ! [ रडें अनावर येतें, तें ती आवरूं पाहातें. ]

**जयाजी**—हं हं कमल ! हें काय ? ही वेळ असे अश्रू गाळण्याची नव्हे. चल-आटप, आवरून धर-आवरून धर आपलं रडं.

**कमळजा**—( अधिक संवेगानें ) कसं-कसं आवरूं हें ? ही ताटातुटीची कल्पनाच केवढी असह्य आहे ! मला वाटतं ह्या कल्पनेनंच माझं मस्तक फिरून जाऊन मला वेड लागेल ! लग्न झाल्यापासून इकडच्या बरोबर मी कसकशी वागत आलें आणि कसे दिवस काढले याची कांहींच कां आठवण नाहीं झाली ? कां-बोलायचं कां नाहीं आतां ?

**जयाजी**—नको, ती आठवण नको देऊंस आतां.

**कमळजा**—हेच हात, हेच आतांसारखेच अस्से इथं ठेऊन मी किती वेळ तरी उभी असे; [ त्याच्या गळयास घट्ट मिठी मारते ] आणि हेच ते डोळे-ह्यांतूनच अश्रूंचे एकसारखे पाट चालत-त्यांना खळ म्हणून पडत नसे. अशा स्थितींत मी इकडच्या डोळयांकडे टक लाऊन पहात असे.

**जयाजी**—खून, खून! चल, लांब हो! सोड-सोड मला! मोठा दुर्दैवी प्राणी आहे मी! [ जंबिया उसून ] या घटकेला माझी तर पुरीं शंभर वर्षें भरून चुकलीं आहेत ! आतां यापुढें एक क्षणभर देखील ज्यास्त जगायची माझी इच्छा नाहीं ! एक-मला जाऊं तरी दे इथून मुकाट्यानं, अथवा दुसरं-मी हा खंजीर खुपसून घेत असतां माझें प्राणोत्क्रमण किती आनंदानं होत आहे हें तरी पहा आपल्या डोळ्यानं !—[ इतक्यांत एक घंटा ऐकू येते. ] ऐक-ऐक, नीट ऐक ही काळघंटा ! बघ हिचे ठोके कसे घण् घण् पडताहेत ! माझ्या जिवलग दोस्ताला-माझ्या सयाजीला,-सयाजीला कसचा-ह्या जयाजीलाच-सुळावर चढवायला नेताहेत ! त्याचा-त्याचाच हा घंटानाद आहे ! ऐकलास-ऐकलास हा ? सयाजीकडून मला निरोप आला आहे कीं कसंहि करून माझ्या अंतकाळापूर्वी मला एकदां भेटून जा; मला तुला क्षमा करायची आहे तेव्हां येतों तर मी आतां ! हीच आपली आतां अखेरची भेट ! ( सद्गदित होतो; व जातां जातां मध्येंच मागें वळून पाहतों. )

**कमळजा**—ती तेवढी इकडची कट्यार तरी द्यायची होती मला. इकडची आठवण म्हणून द्यायची होती. तेवढीसुद्धां कां नाहीं देववत ? एकून कश्शावरच

कां नाहीं माझी सत्ता ? अगबाई ! ( धावून त्याचे गळ्यांत पडून ) आणखी एकदां अखेरचं नाहीं कां हें मला अमृत पाजायचं ! ( तो चुंबन घेतो व ती जाऊं लागते. )

**जयाजी**—हो, पण थांब, जरा थांब ! तुला कांहीं सांगायचं आहे आणखी थोडंसं मला ! आपलं एक चिमुकलं बाळ आहे ना ? त्याच्यासंबंधानं सांगायचे आहेत तुला मला एकदोन शब्द ! माझ्या मागं आतांपेक्षां त्याच्यावर तूं दुप्पट प्रेम कर-तुझं अन् माझं मिळून ! त्याला सद्गुणी करून सोड. आणि जगांत येऊन लौकिक आणि कीर्ति मिळवायला जे जे मार्ग असतील त्या साऱ्या मार्गांचा अवलंब करीव त्याच्याकडून. मात्र या दुर्दैवी जयाजीचं नांव कध्धीं देखील कळवूं नको त्याला ! शपथ आहे तुला—तूं त्याला हें कळवशील तर. हेतू हा कीं माझ्या नांवामुळें त्याचा दुर्लौकिक अथवा बदनामी होऊं नये. म्हणून म्हणतों कीं एवढ्याबद्दल खबरदारी ठेव. ( दोघे एकमेकांस बिलगतात ) चल ये, अगदीं कडकडून भेट-यापेक्षां आणखी किती कडकडून भेटायचं ? मला वाटतं हे माझे हात-इथं अस्से-हे हात सदोदित असे कायमचे खिळून राहतील तर किती सुखकर जीवन होईल ! पण ? पण काय ! तिकडं-माझा दोस्त-माझी प्रतिज्ञा-आणि माझी आणभाक-हीं-( चुंबन घेऊन ) बस्स. पुरे आतां !

**कमळजा**—आणखी एकदां गडे ! त्या आपल्या चिमुकल्या बाळाकरितां तरी बाई एकदां होऊं दे. खचित पोंचवीन मी हें त्याचं त्याला; ठेवून नाहीं घेणार मी हें !

**जयाजी**--[ चुंबन घेऊन ] झालं, आतां तर झालं तुझ्या मनासारखं ? येतों तर आतां ! हीच भेट !

**कमळजा**—अगबाई ! म्हणजे ? शेवटची कीं काय ?

**जयाजी**--शेवटचीः कीं काय तें एक परमेश्वरालाच ठाऊक ! येतों मी आतां ! यावेळीं तरी मोहांत नाहीं आतां गुंतून उपयोग ! हें पंचमहाभूतांनों, तुमच्या स्वाधीन करतों आहे मी आतां हिला. तुम्हींच करा आतां हिचा सांभाळ !

**कमळजा**—[ त्याच्या जाण्याकडे कांहीं वेळ पहात राहून ] अरे देवा ! एकून टाकून-टाकूनच जायचं तर मग मला ! नाहीं तर अर्थ काय ह्या अशा

जाण्याचा ? जायचं-अन् तेंहि या भुताच्या स्वाधीन करून ! खरंच या घटकेला या भुतांनीं-या खवीसांनीं-या समंधांनीं-या डाखिणनीं अन् या वेताळांनीं, मला अगदीं कशी पिसाळून सोडिली आहे ! आतां यापुढं माझ्या दिवस आणि रात्री सुखांत आणि आनंदांत जायच्या कां ? ( विचारनिमग्न ) हो हो, तिथं गेल्यावर मग सारं सुख आणि आनंदच ! ( गलितधीर होऊन ) छेः छेः बाई, माझ्या उरांत कुणी तरी खंजीर खुपसला आहे असं वाटतं मला ! मग खरोखरी-चाच खंजीर कां नाहीं कोणी खुपशीत ? अथवा एखाद्या आगीच्या भडक्यांत लोटून देऊन मला जाळून कां नाहीं कोणी टाकीत ? अथवा समुद्रांत फेंकून देऊन बुडवून कां नाहीं कोणी टाकीत मला ? मला हें सहन होत नाहीं ! काय-करूं तरी काय मी आतां ! माझं डोकं भणाणून जाऊन तिथं कसा एकच आग-डोंब भडका होऊन गेला आहे ! आणि हृदयांत एकच कालवाकालव होऊन माझ्या आंतड्यांना कसा भयंकर पीळ पडत आहे ! मला काय होतं हें माझं मलाच समजत नाहीं ! माझे मस्तकांत एखादा ज्वालामुखी भडकल्याचा भास होत आहे ! मी कुठं आहे-काय करते आहे-हें माझं मलाच कळेनासं झालं आहे ! हीं पंचमहाभूतं-हीं कसचीं आतां माझा सांभाळ करणार ? ही इथली हवाच पाहिली तर ही इतकी पातळ आणि विरळ झाली आहे कीं माझ्या ह्या भडकलेल्या डोक्यालाहि झोंबते आहे जशी कांहीं ! सोसवत नाहीं ही मुळीं देखील ! समुद्रांत उडी घेऊन त्याचा तळ गांठावा म्हटलं तर तेंहि नाहीं उपयोगी ! कारण तिथून एकदम मी पाताळांतच जाऊन पोंचायची आणि तिथं अमृत भरलेलं आहे ! हें अमृत मला तर आतां विषासारखं आहे. तेव्हां आतां इथंहि राहतां येत नाहीं आणि तिथंहि जाण्याची सोय नाहीं ! मग आतां जायचं कुठं ? तेव्हां आतां निराळीच कुठली तरी जागा काढली पाहिजे हुडकून म्हणजे मला सुखानं विश्रांति घेतां येईल ! कुठली बरं काढावी अशी जागा हुडकून ? ( सुचलेसें करून ) हो, बरी आठवण झाली ! अगबाई, तो नरकलोक आहे कीं-यावेळीं जितकी माझ्या अंगाची आग होत आहे इतकी आग जरी तिथं असेल, तरी देखील पुरे आहे ती मला ! कारण त्या तेवढ्या आगीनं ही माझी आग मला सहन करितां येईल. वेळेस तिथली आग फारच भडक असेल तर माझी ही आग त्या आगीपुढें गारहि पडेल ! तर अस्संच-अस्संच आतां ! हे नरकलोकाच्या लोक-पाला,—मी उभी आहे इथपर्यंत तूं आपल्या लोकाचीं कवाडं पोंचवून तीं एकदम

खाडकन् उघडी टाक, अन् या दुर्दैवी कमळजेला पटकन् आंत ओढून घे ! हो ! हो ! उघडलीं–उघडलीं हीं नरकलोकचीं दारंच उघडलीं !

[ धांवत जाते.

**प्रवेश २ रा समाप्त.**

## प्रवेश ३ रा

**स्थळ**—वधस्थान ( सयाजीस सुळावर नेत आहेत. सूळ तयार केला आहे. )

**प्रवेश**--[ सरकारी अधिकारी, सयाजी, पहारेकरी, मांग आणि प्रेक्षकांचा घोळका असे येतात. ]

**सयाजी**--काय ? माझा दोस्त अजून नाहीं येत ?

[ जयाजी येतो. ]

**जयाजी**--सयाजीराव, हा पहा--हा पहा आला तुझा दुर्दैवी दोस्त जयाजी !

**सयाजी**—ये–ये. भेट ये मला !

**जयाजी**--तुला कोणच्या तोंडानं भेटूं सयाजीराव ?

**सयाजी**--झालं गेलं तें कांहींएक मनांत आणूं नकोस. चल, ये अगदीं कडकडून भेट. मला यावेळीं कित्ती भेटलं तरी पुरेसं नाहीं होत. तुझ्याकडून माझ्या लौकिकाला जरी यापेक्षां काळोखी आली असली तरी देखील तुझ्यावरचं माझं हें प्रेम एक रेसभरही कमी झालेलं नाहीं. जयाजीराव, रागाच्या सपाट्यांत ह्या सयाजीनं तुला ठोसा दिला आणि लाथाडलेंन्‌देखील आपल्या पायानं तुला. पण अपराध झाला तो माझ्याकडून. क्षमा कर त्याबद्दल मला; कारण मी आतां जिथं चिरकाल शांती वास करीत आहे अशाच पुण्यस्थळीं जाणार आहे. तेव्हां अशासमयीं तुझ्यासारख्या उदारमनस्क दोस्तांच्या प्रेमळ शुभचिंतनाची अपेक्षा आहे. तरच माझा प्रवास सुखकर होईल, एरवीं तो होणार नाहीं.

**जयाजी**--ठीक--ठीक या जगांत माझ्यासारखा विश्वासघातकी आणि मित्रद्रोही मीच ! माझ्याचमुळें तुझ्यावर हा प्रसंग ओढवला आहे ! पण हें सारं विसरून तूं माझ्याशीं वागत आहेस. केवढं—केवढं थोर मन हें ! आणि मी ? तुझ्यासारख्या निरपराधाच्या यातना या दगलबाजानं पाह्यच्या !

**शिपाई अधिकारी**--तुझ्या कंपूतल्या इतर सगळ्यांनीं सूळ पाहिला. तूं एकटाच उरला आहेस आतां, चल, आटप भेटून घे लौकर !

**जयाजी**--काय ? सगळ्यांनीं सूळ पाहिला ?

**सयाजी**--हो--हो सगळ्यांना केव्हांच दिलं सुळावर चढवून ! जयाजीराव, ते सगळे एकजात अगदीं मर्दासारखे मेले. एक ब्र नाहीं निघाला त्यांच्या तोंडून !

**जयाजी**--(दीर्घ निःश्वास टाकून) हं तर आतां मी काय करावं म्हणतोस ?

**सयाजी**--(सद्गदित कंठानें) जयाजीराव काय काय सांगूं मी तुला ?

**जयाजी**--बोल, बोल, अगदीं ओठाशीं आलेलं दिसतंय तुझ्या; परत नको नेऊस तें आतां. तुझ्या मनांत जें कांहीं डंवचत असेल अन् ज्याच्याबद्दल तुला अत्यंत खेद होतो आहेस. दिसतें तें सारं या आपल्या समदुःखी दोस्ताला सांग आणि हो मोकळा. हा बघ हा बघ इथ माझ्या काळजाला तुझ्याकरितां कसा पीळ पडतोय तो !

**सयाजी**--दोस्त अन् समदुःखी ! काय ! शक्य कोटींतली गोष्ट आहे ही ? अशा कठिण आणि बिकट प्रसंगीं माझ्या बरोबरीनें दुःखाचा वांटेकरी होण्याइतका उदार दोस्त इथं आहे ? असं होईल तर आज माझं मोठंच भाग्य उदय पावलं असं मी समजेन. या वेळेला अशा दोस्ताचा मीं किती भुकेला आहे हें एक त्या देवालाच ठाऊक !

**जयाजी**--असं असेल, तर हा पहा इथं आहे तसा दोस्त. कृतकर्माचा पुरा पश्चात्ताप होऊन जो हा आंतल्याआंत त्याच्या धगीनं जळून जात आहे. आपल्या दोस्तावर मरणाचा प्रसंग आल्याचं ठाऊक असूनहि जगण्याची आशा धरून बसेल, असं कां वाटलं होतं तुला ? हें बघ, ( जंबिया दाखवितो. ) ह्याच्या एकाच घावानं इथल्या इत्थंच--

**सयाजी**--छत्, सयाजीराव ! हें एवढें मात्र नको करूंस साहस. शपथ आहे तुला. जग, तूं जग !

**जयाजी**--होय, जगेन-जगेन, खास जगेन मी ! पण कशाकरितां ? तुला सुळीं दिल्याबद्दलच सगळ्या वेणुपुरकरांवर सूड उगवायला ! तुझ्या एकट्याच्या हत्येबद्दल सगळ्या वेणुपुरचीं पाळंमुळं काढीन उपटून ! अन् तीं अशीं कीं या हरामखोरींच्या नातवापणतवंडापर्यंत त्याची आठवण रहावी !

**सयाजी**—काय ? माझ्याबद्दल असा सूड ?.

**जयाजी**—खास, देवाची शपथ घेऊन सांगतों. यांत काडीमात्र अंतर पडायचं नाहीं !

**सयाजी**—तर मग अजून देखील तूं पूर्वीच्यासारखाच उदार मनाचा आहेस तर ! तर मग आतांपर्यंतचे तुझे सारे अपराध मला पार विसरलेच पाहिजेत. छेः छेः पण-तुझ्यावर पुनः असा विश्वास कसा–ठेवावा कसा ?

**जयाजी**—खरंच, हा वेळपर्यंतच्या माझ्या मित्रद्रोही आणि विश्वासघातकी वर्तनामुळें पात्र नाहीं मी आपल्या विश्वासाला ! मला तोंडंच नाहीं उरलं आतां दाखवायला ! तरी पण माझी परीक्षा पहा एकदां.

**सयाजी**—तर मग माझ्यावर तुझं अगदीं पहिल्यासारखं निःसीम प्रेम आहे म्हणतोस ?

**जयाजी**—हो–हो, अगदीं निःसीम ! पण तें मी होऊन आपल्या तोंडानं काय सांगूं ? अजूनहि जर तुला माझा विश्वास येत नसेल तर हें माझं काळीज माझ्या छाताडांतून बाहेर काढ आणि तें मधोमध चिरून पहा हवें तर ! म्हणजे तुझ्यावर माझं किती निःसीम आणि अकृत्रिम प्रेम आहे हें तेव्हांच कळून येईल तुला !

**सयाजी**—(रडून) हाय ! हाय ! एकूण मीच फाजील शंकेखोर तर !

**जयाजी**—काय ! अश्रूंचे पाट ! अन् तुझ्या डोळ्यांतून ! खरोखर, फार आश्चर्याची गोष्ट आहे ही ! आजपर्यंत तुझ्या अंतःकरणाला हे अशा तऱ्हेचे पाझर फुटलेले नव्हते कधीं मी पाहिले. पहिलाच प्रसंग हा ! खास, तुझ्या मनांतून सांगायचं आहे कांहीं तरी मला. सयाजीराव ! टाक,–ओकून टाक तें एकदां. पोटांत साचवून नको देऊंस तें उगीच ! मला बेइमान अन् दगलबाज समजून कचरूं नकोस, उगीच असा. सांग. आंत दडवून ठेवण्यांत नाहीं आतां अर्थ.

**सयाजी**—तो बघ, तो सूळ पाहिलास का ?

**जयाजी**—म्हणजे ? याचा अर्थ ?

**सयाजी**—याचा अर्थ ! अरे, जो मर्द खऱ्या जातिवंत शिपायाप्रमाणें आजपर्यंत लढला; ज्यानं आपल्या राष्ट्राकरितां आतांपर्यंत कित्येकप्रसंगीं हमरी-तुमरीनें लढून मर्दुमकी गाजविलीन्; व मोटा लौकिक संपादून ज्यानं विजयश्री-

वर विजयश्री मिळविलीन्; त्यानं एखाद्या भिकारड्या चोरासारखं या दरिद्री अन् भ्रष्ट सुळावर मरावं? मर्दाला केवढं लांछनास्पद आहे हें! शोभतं कां हें मर्दाला?

**जयाजी**—( निःश्वास टाकतो ) हंः! प्रश्न कसला?

**सयाजी**—बोल-बोल, शोभतं कां हें मर्दाला?

**जयाजी**—काय? शोभतं का-म्हणून विचारतोस? कोणत्या मर्दाला शोभेल हें?

**सयाजी**—नाहीं ना शोभायचं? तर मग—...

**जयाजी**—काय? करावं काय म्हणतोस तर मग?

**सयाजी**—असं कांहीं कर कीं ज्या योगानं "सयाजीराव सुळावर दिला" असं म्हटलं जाऊन त्याच्या नांवाची लोकांत छीः थूः होऊं नये.

**अधिकारी**—आटपा-आटपा. उशीर चालला आहे फार!

**सयाजी**—झालं, आटपलंच. उशीर नाहीं करीत मी आतां! ( जयाजीस ) जयाजीराव, हें पहा-एक वेळ जरी तूं दगा दिला असलास, तरी आतां ह्या एवढ्या वेळीं तरी जाग तूं आपल्या इमानाला.

**जयाजी**—बस्स, त्याबद्दल नको आतां मला कांहीं सांगायला! सगळं तुझ्या इच्छेनुरूप करतों मी. पण काय? माझं इमान्! अन् त्याबद्दल अद्याप संशय? हा तुझा संशय दूर करायला वाटेल तें करायला तयार आहे मी. माझ्या बायकोला अन् माझ्या चिमुकल्या मुलाला दोघांनाहि तुझ्यापुढं आणून उभं करतों अन् त्यांचं चराचर बलिदान करतों तुझ्यापुढं! मग तर फिटेल कीं नाहीं तुझा संशय? नाहींतर माझाच बळी देतों इथं प्रथम.

**सयाजी**—( त्याच्या हातास धरून ) छत् ही अशी गोष्ट मात्र पुन्हां उच्चारूं देखील नकोस! तर हें पहा-( त्याचे कानांत कांहीं सांगतो ).

**जयाजी**—( आश्चर्यानें ) अस्सं! एवढंच कीं नाहीं?

**सयाजी**—हो, येवढंच.

**जयाजी**—मग माझ्याकडं लागलं तर हें!

**सयाजी**—पहा हां—

**अधिकारी**—आटपा, महाराज आटपा लौकर.

**जयाजी**—झालं-झालंच. हा पहा-तयार आहे मी अगदीं. ( सयाजी व जयाजी दोघे सुळावर चढतात.) अहो कोतवालसाहेब, तुम्ही मोठे दिलदार आणि अब्रूदार आहांत तर मेहेरबानी करून या बाजारबुणग्यांची ही गर्दी मोडा जरा इथून. म्हणजे माझ्या वांट्यास आलेल्या ह्या मरणाला मोठ्या सुखासमाधानानं आणि मर्दपणानं तोंड देईन. चला आटपा.

**अधिकारी**—( लोकांस ) चला-हटा.

[ सयाजी अंगावरील अवजड कपडे काढून टाकतो; व शिपाई त्यास बांधण्यास तयार होतात ].

**सयाजी**—( जयाजीस एकीकडे ) लक्षांत आहे ना मी सांगितलेलं ?

**जयाजी**—हो पुरं आहे लक्षांत. तें कसं विसरेन ?

**सयाजी**—जयाजीराव ! ठीक आहे, येतों तर मी आतां.

[ शिपाई त्याचे हात बांधतात. ]

**जयाजी**—( सयाजीवर एकदम कट्यार चालवून ) चल, हें घे तर ! यं रे मर्द आणि दिलदार दोस्त ! आणि हा पहा-हा जयाजीहि पण आला तुझ्या बरोबरच ! [ स्वतःच्या छातींत कट्यार खुपसून घेतो. ]

**सयाजी**—शाबास-शाबास ! जयाजीराव ! तूं इमानाचा धड आहेस, मर्द आहेस, आणि जिवाला जीव देणारा दोस्त आहेस ! आपण दोघांनीं तरी ह्या मंत्र्यांना पुरं चकवलं आहे !

**जयाजी**—तूं छातीचा कोट केलास आज !

**सयाजी**—सुखानं-सुखानं मरतों आतां मी ! जयाजी ! हें पहा-रा-म-रा-म रा-म—[ मरतो ].

**जयाजी**—हे वेणुपूरच्या बेताल आणि जुलमी मांगांनों ! तुम्ही आमच्या रक्ताचा आज इथं सडा घातला आहेत, पण जिथं जिथं म्हणून आमच्या रक्ताचा थेंब पडला आहे तिथं तिथं त्या प्रत्येक थेंबागणिक भयंकर रोग आणि साथी उत्पन्न होऊन त्या तुमच्या अन् तुमच्या पोराबाळांचा फन्ना उडवूं देत ! परचक्र, बंड आणि दुष्काळ यांचा एकच सुळसुळाट होऊन सारं वेणुपूर उजाड व उध्वस्त होऊन जाऊं दे ! ( विचार बदलून ) कमल ! एकूण तुझी माझी ही कायमचीच ताटातूट होती तर ! मीच तुला दगा दिला ! कायमचा अंतरलों !

क्षमा कर याची मला. ( आठवलेसें करून, अधिकाऱ्यास ), अहो, कोतवाल-साहेब ! माझ्यावर कृपा करा, आणि ( त्याचे हातांत कांहीं देऊन ) हें एवढं अगदीं सुरक्षितपणानं त्या पिलाजीरावाच्या कन्येकडे–माझ्या पत्नीच्या–त्या कमला-देवीच्या अगदीं हातांत नेऊन द्या कसंहि करून, आणि तिला सांगा कीं, मरतांना तुझी आणि आपल्या चिमुकल्या बाळाची आठवण करून या जयाजीनं प्राण सोडला ! बोलवत नाहीं आतां माझ्याच्यानं. माझी जीभ अडखळूं लागली ! राम–राऽम–राऽऽम ! [ प्राण सोडतो ].

[ प्रवेश ३ रा समाप्त ]

---

## प्रवेश ४ था

**स्थळ**—–पिलाजीरावांच्या वाड्यांतील एक खोली.

**प्रवेश**—–[ पिलाजीराव, त्यांचे नोकर व मस्तक भ्रमण झालेली कमळजा. ]

**पिलाजी**—–हे दयाघना, करुणाकरा ! हिच्या अंतःकरणाला स्वास्थ्य देऊन हिचं मन जरा शांत कर.

**कमळ**—–( भ्रमिष्टपणें ) अगबाई, यावं यावं यावं कीं ! यावं म्हणतेना मी ? मग भीड कसली इतकी ? निजणार ना अंमळ ? हें काय बरं पण ? बोला-यचं दिखील नाहीं बाई ! नकोशी कां झालें मी ? अगबाई, कोण तरी हें वारं सुटलं आहे. भुतानं बडवलं आहे जसं कांहीं याला ! कोण सोसाट्यानं एकसारखा स्सू स्सू करून वाहतो आहे पण हा ! श्रावणाला दिखील ऊतच आला आहे जसा. काय फडाफड बडवतो आहे पण ! काय ही भयंकर हवा पडली आहे तरी ? दचकीच बसते ही असली हवा बघून ! काय ? आतां आणखी पुन्हा रागवायचं झालं वाटतं माझ्यावर ! नेहेमीं बाई तेंच तेंच तेंच झाल्यावर मग कोण करतंय त्याची इतकी फिकीर ? ( बदलून ) करंटे, कमळजे ! कुणाला अन् काय म्हणते आहेस तूं हें ! शुद्धीवर आहेस का तूं ! काय वदली ही तुझी जिभली ! गळून कां नाहीं पडली ती ? ( पुनः भ्रमानें ) मी खचित–खच्चित नाहीं बाई

जाऊं द्यायची आतां इथून ! जायचंच तर आपल्या हातानं मला दूर लोटून द्यावी अन् जावं मग पाहिजे तर ! ऐकलं न ऐकल्यासारखं करायचं वाटतं ! अगबाई, इतकं म्हटल्यावर पहा कसं आपल्या आपण जवळ यायचं झालं ? खरंच, राहवेल कसं बाई तिकडून ? ( इतक्यांत जयाजी पिशाच्चरूपानें दिसतो: त्यास पाहून पिलाजीरावास ) बाबा, पाहिलंत ? परत यायचं नव्हतं पण राहवलं नाहीं तिकडून इकडं मी आपल्या स्वत:ला सर्वस्वीं अर्पण केलं तें उगीच का ? माणसाची परीक्षा असल्याशिवाय कां केलं मी हें ? अन् ह्याबद्दल कां बरं मग तुम्ही माझ्यावर इतके रागावलां ? फुकटच नव्हता का तुमचा तो राग ? ( जयाजीला उद्देशून ) कां असं दूर दूर कां उभं राह्यचं अजुनी ? अजून नाहीं का राग गेला माझ्या-वरचा ! ( जयाजीचें पिशाच्च अदृश्य होतें). अगबाई, इथं तर कोणीच नाहीं कीं ! कुठं-जायचं तरी कुठं इतक्यांत ? ( पिलाजीरावाला उद्देशून ) बाबा, तुम्ही कां हो असे आम्हां दोघांच्या मध्यें उभे ? चला, दूर व्हा, असे आड नका येऊं गडे ! ( आवेशानें ) बाजूला व्हा म्हणतें ना जरा ! माझ्या प्राणाला माझ्या-पासून दूर कां करतां असे ? काय-मिळतं काय यांत तुम्हांला ? खचित, इथ्थंच असायचं कुठं तरी ! बाजूला व्हा म्हणतें आहे ना मी ? (जास्त भ्रमानें जयाजीला उद्देशून) काय, जायचं ! सोडून जायचं मला ! कोण बाई निर्दयपणा हा ! गळे-कापूपणा नव्हे कां हा निव्वळ ? ते कसाई सुद्धां नव्हेत कां बरें यापेक्षां ? सूड उगवीन हो सूड या सगळ्या छळणुकीचा सूड उगवीन म्हटलं सूड ! कोण मेली फसवेगिरी ही ! ( कोतवाल येतो ).

**पिलाजी**—अरे ! अरे ! काय हिची ही स्थिति ? ( इतक्यांत कोतवाल येतो त्याला ) काय--काय आहे बातमी ?

**कोतवाल**—बातमीऽऽऽ—( पिलाजीच्या कानांशीं कांहीं कुजबुजतो. )

**पिलाजी**—काय म्हणतोस !

**कोतवाल**—होय सरकार ! बातमी तर काळीज अगदीं चूर करून टाकणारी आहे ! सयाजीरावाला सुळाच्या पराचेवर चढविला असतां जयाजीराव त्याच्या बरोबरीनें वर चढले; आणि असलं नामर्दासारखं मरण अज्जीबात टाळण्याकरितां त्यांनीं आपली कट्यार सयाजीरावांच्या छातींत खुपसून त्यांचा अंत केला आणि

तीच कट्यार पुन्हां तिथून काढून आपल्या छातींत खुपसून घेतली ! आणि आतां दोघांचीहि तिथं शेवटची तडफड चालली आहे !

**पिलाजी**—कमळ ! कमळ !

**कमळ**—( कोतवालाच्या भाषणाचे डोक्यावर कांहीं तरी परिणाम होऊन दुःखावेगानें पण भ्रमातच ) होः होः होः अँ ! बाबा ! बाबा ! हें पाह्यलंत कां काय तें ? ते सयाजीराव दिसले कां तुम्हांला ?—आणि त्यांच्या जवळ ते दुसरे कोण उभे आहेत ते ? अगबाई, दुसरं कोण असणार आणखी ! पण अगबाई ! पण हे दोघंहि असे रक्तबंबाळ कसे ! पांट चालले आहेत जसे यांच्या अंगांतून लालभडक रक्ताचे ! खून—खूनच केलाय हो यांचा कोणी तरी ! कोणा मेल्या मांगांचे हात वाहवले यांच्यावर ? ( पुन्हां वेडाची दुसरी लहर येऊन ) कां—बोलायचंहि कां नाहीं माझ्याशीं अजून ? वेडीच का विचारितें आहे मी ही एकून इतका वेळ ! पहा—पहा, ह्या कमळजेकडे पहा तरी एकदां ! ही तुमची कमल—तुमच्या पायां पडून। अगदीं दीन गाय होऊन विचारतें आहे हो ! अगबाई ! पण इथं आहे कोण ? कुण्णीच नाहीं दिसत इथं. तर मग काय ? ( हुंदका येऊन ) भास—भासच हा सगळा ? छेः पण इतक्यांत मी तिकडं पाहिलं; तर तो भास कसा ! हो—हो, इथं इतक्यांतल्या इतक्यांत ह्या दरींत गडप्प व्हायचं झालं ! ही अशी जातें आणि ही सारी दरी मी आपल्या ह्या कोंपरांनीं उकरून काढतें अगोदर ! छेः छेः बाई, माझ्याशीं नाहीं—खचित नाहीं चालायची ही असली फसवेगिरी ! ( पुन्हां आनंदानें ) अगबाई ! ती पहा—तीच—तीच माझ्या प्रियाची मूर्ति ! पुन्हां चक्क दिसूं लागली ! आतां नाहीं मी ही अशी दूर राह्याची ! बाबा, अहो बाबा ! माझं सगळं सुख, माझा सगळा आनंद, अन् माझं सगळं सौभाग्य ज्यांत सगळंच्या सगळं सांठिवलं आहे, ते माझे प्राण—मिळाले—पुन्हां मिळाले मला. आतां कध्धीं नाहीं मी यांना सोडून राह्यची ! छेः पण पुन्हां कां बरं असं लांब जायचं ! अगबाई, हें पहा—मला कसं खुणेनं बोलवायचं होत आहे आपल्याकडेच ! आल्यें—आल्यें बरं कां. ( पिलाजीस ) येतें, येतें हो तर मी आतां. हां !

[ एकदम धांवत जाते ].

**कोतवाल**—अरे! अरे! अरे! छाती फाटून टाकणारा काय भ्रम हा हिचा! ते तिकडं आपल्या छातींत कट्यार भोंसकून घेऊन त्या सुळाजवळ विव्हळत पडले आहेत, आणि हिला ते इथं दिसताहेत! शिवाशिव! कोण भयंकर भ्रम हा!

**कमळजा**—(कोतवालाचे शब्द ऐकून एकदम परत येऊन) काय—काय म्हटलंत? सुळाजवळ कट्यार खुपसून घेऊन विव्हळत पडले आहेत म्हणून? ही पहा, तिकडंच चालली तर ही कमळजा! खरंच खरंच, ते पहा--इथून दिसताहेत ते मला! आल्यें हो, पण कण्हायचं कां बाई असं! अगबाई! कित्ती तरी पण भयाण आणि खोल दरी ही! नका—कण्हूं नका गडे, हें असें! ही आल्येंच पहा मी—धांवतच आल्यें! [ एकदम धांवत जाते ].

[ वधस्थानाचें दृश्य. जयाजी व सयाजी; विव्हळत पडले आहेत. सभोंवतीं जागजागीं मंडळीचे थवे उभे आहेत. इतक्यांत कमळजा धांवत येते. ]

**कमळजा**—अगबाई! कोण हें विलक्षण प्रेम तरी? माझ्यापेक्षां दिखील ही दरी, हे आपले स्नेही, आणि ही कट्यार हींच इकडं अधिक प्रिय झालीं तर एकून! अन् मी कवडीमोल झालें! छेः असं कसं होईल बाई. हें पहा—माझ्याकडे एकसारखं निरखून पाह्यचंय कसं तें! काय—काय म्हटलं?--ही कट्यार खुपते आहे फार छातींत—म्हणून? काढतें-काढतें हो तर ती मी तिथून. (ती कट्यार काढते त्याबरोबर छातींतून रक्त येतें तें पाहून) अगबाई, हें काय केलं मी? (सभोंवतींच्या मंत्री मुत्सद्यांना पाहून थोडी भानावर येऊन त्यांना उद्देशून). अरे चांडाळांनों, तुमच्या खोट्या शपथा अन् तुमचा गळेकापूपणा रे हा! कुठें भोगाल याचीं फळं! (जंबिया घेऊन धावते) कुठं कशाला? इथंच लावते भोगायला! (ते पळून जातात व कांहीं धरायास पुढें सरसावतात तों ती पुनः जयाजीजवळ येते) पळतात मेले आतां. पळा—पळा म्हणावं मेल्यांनों. पार-पार व्हा ह्या दरींतून! कां--तुम्ही कां आणखी आलांत? तुम्हालाय पाहिजे वाटतं कांहीं? (धांवून जाते व ते पळतात) आम्ही तिघंजण आतां इथं अगदीं शांतपणानं कालक्रमणा करणार! (इतक्यांत पिलाजीराव येतो त्यास पाहून) हे मेले इथंसुद्धां माझी पाठ पुरवायला आले! या—या! आणखी पुढं या. पुरवा—पाठ पुरवा.

अगदीं माझी ! ( आपल्या छातींत तीच कट्यार खुपसून घेऊन ) आतां कशी पुरवणार तुम्ही माझी पाठ ? इथं दोघंजणं आहेत माझं संरक्षण करायला अन् तिसरी ही कट्यार ! ( आपल्या हातांतील कट्यार आपल्या छातींत खुपसून घेते. ) डोंगरादरीची ताटातूट झाली आहे कधीं ?—अगं आई ! राम-राऽम-राऽऽऽम !

**पिलाजी**—रामजी ! रामजी ! काय घात हा ! हा पाषाणहृदयी बापच या सगळ्याचं कारण !

[ मुर्च्छित होतो.

पडदा पडतो.

समाप्त



# चांदीचा ताम्रपट.

लेखक—श्रीयुत **रा. प्र. कानिटकर**, एम्. ए.

—इतिहासाच्या पोटांत केवढा अजबखाना सांठविलेला आहे तो कल्पनेनें व तर्कानेंहि कळणें अशक्य आहे. भविष्याच्या उदरांतील गोष्टींचा जसा थांग लागत नाहीं किंवा पृथ्वीच्या पोटांत कोणकोणतीं द्रव्यें दडून बसलेलीं आहेत याचा उलगडा होत नाहीं त्याप्रमाणेंच इतिहासाचें आहे. मागचा इतिहास कितीसा धुंडून पहाणार ? एका काळाचा इतिहास मिळाला तरी त्याच्या मागच्या इतिहासाची काय वाट ? यावरून इतिहास कसा अनादि अनंत आहे याची साक्ष पटते. याच अनंताच्या अंतरंगांतील एक ऐतिहासिक सत्य—कथा आम्हांस येथें निवेदन करावयाची आहे.

( १ )

फार प्राचीनकाळची गोष्ट. त्या वेळीं महाबलाढ्य रोमच्या गादीवर नीरो नांवाचा बादशहा अधिष्ठित झालेला होता. रोम शहराला आग लागली असतां आपली सारंगी घेऊन आनंदाचें गाणें वाजवीत बसणारा जो सुप्रसिद्ध नीरो

त्याच्याच वंशातला हा झीरो होय. झीरोनें आपल्या कारकीर्दीच्या सुरवातीसुरवातीला बरीच लोकप्रियता संपादन केली होती. आपल्या प्रजाजनांचें हित साधणें हेंच आपल्या जीविताचें ध्येय आहे असे उद्गार तो वेळोवेळीं काढीत असल्यामुळें सामान्य जनता त्याच्याकडे आशावादीपणानें पहात असे. तोहि मोठमोठीं आश्वासनें देऊन आपला राज्यकारभार मन मानेल तसा चालवीत असे. प्रजेवर प्रत्यक्ष जुलूम न करतां प्रजेला लुबाडण्याची त्याची हातोटी मोठी अजब होती. प्रजेवर प्रत्यक्ष कर न बसवितां प्रजेकडून आपल्याला पाहिजेत तितके पैसे कसे वसूल करून घ्यावेत ही कला त्याला उत्कृष्ट साधली होती. त्याच्या अधिकारीवर्गानें लोकांचीं घरेंदारें लुटलीं, निरपराध लोकांवर व असहाय बायकांमुलांवर जरी त्याच्या लष्करशाहीनें आपली मर्दुमकी गाजविली तरी झीरो अगदीं थंड असे. प्रजाजनांचे प्रतिनिधि त्याच्याकडे दाद लावून घ्यायला आले कीं, तो मोठ्या कळवळ्यानें सांगे–' ह्या अधिकाऱ्यांकडे कशाला लक्ष देतां ? ते आज आहेत अन् उद्यां नाहींत. मी कायमचा आहे ना बसलेला ? प्रजा ही मला माझ्या मुलांबाळांसारखी आहे हें मी तुम्हांला अनेकदां सांगितलेंच आहे. माझी प्रजा माझा जीव कीं प्राण आहे. जोंपर्यंत राजसिंहासनावर माझ्यासारखा बादशहा बसलेला आहे, तोंपर्यंत तुम्हांला काळजी करण्याचें मुळींच कारण नाहीं. कांहीं झालें तरी रोमवर बादशहाचा अम्मल आहे, बादशहाच्या नांवाखालीं सर्व राज्यकारभार चाललेला आहे हें तुम्हीं विसरतां कामा नये.' झीरोच्या त्या मानभावीपणापुढें कोण बोलणार ? झीरोला आपला खजिना कसा तुडुंब भरावा यापलीकडे कांहीं सुचत नसे. त्यानें एकदां अशीच एक युक्ति काढली.

२.—

त्या वेळीं रोमन लोक शक्तीचे उपासक असल्यामुळें व्यायाम, खेळ, कसरती, चढाओढी यांचे मोठे ते शोकीन असत. त्या वेळीं ५०।५० मैलांच्या पळण्याच्या शर्यती होत. घोड्यावर बसून दहा दहा मैल मांड न हालवतां घोडे पिटाळण्याच्या चढाओढी होत. चार चार घोडे जुंपलेले रथ त्या वेळीं विशेष प्रचारांत असत व ह्या रथांच्याहि कधीं कधीं शर्यती होत. ह्या शर्यती करून आपला खजिना भरण्याचें झीरोच्या मनानें घेतलें व त्यासाठीं त्यानें एक प्रचंड वाटोळें पटांगण तयार केलें. चहूंबाजूंला प्रेक्षकांना बसण्याची सोय केली. घोड्यांची पैदास

वाढावी, हाच ह्या शर्यतींचा मुख्य हेतु आहे असें जाहीर करण्यांत आलें. रथवाल्यांना हुरूप येऊन त्यांनीं हजारों रुपये खर्चून उत्कृष्ट घोडे व उत्कृष्ट सारथी आणविले. झीरोनें घोड्यांवर व घोड्यांच्या किंमतीवर कर बसविला, प्रेक्षकांकडून फी घेतली व सर्वांवर पुन्हां करमणुकीचा कर लादला. झीरोची पैसे उकळण्याची आणखी एक युक्ति होती. जो सारथी सर्वांत पुढें येई त्यालाच फक्त झीरोकडून बक्षीस मिळे व ज्यांचा पराभव होई त्यांच्याकडून पराजयाचा दंड वसूल केला जाई. अर्थातच मागें पडलेल्यांची संख्या मोठीच असे.

तीच गोष्ट नर्तनाची. स्त्रियांचें शरीरसामर्थ्य व शरीरसौष्ठव वाढावें म्हणून त्या वेळीं नर्तनांचाहि बराच प्रचार होता. झीरोनें याहि गोष्टीचा असाच फायदा घेऊन आपला खजिना भरण्याचा सपाटा चालविला. सार्वजनिक नर्तनासाठीं एक 'गोल महाल' बनविण्यांत आला. बादशाही शृंगारसाज व रोषणाई यामुळें त्याचा थाट इंद्रभुवनालाही लाजवीत होता. शरीरसौष्ठवाला उत्तेजन देण्यासाठीं तेथें स्त्रीसौंदर्याचीं प्रदर्शनें भरूं लागलीं. मीना बाजारही भरूं लागले. अशा निमित्तानें जनतेच्या खिशांतील पैसा सरकारी तिजोरींत जमा होऊं लागला.

३—

झीरोच्या ह्या राज्यपद्धतीविषयीं जिकडे तिकडे असंतोषाचे उद्गार निघूं लागले व त्याचा कसा बंदोबस्त करावा याचा कांहींजण विचार करूं लागले.

झीरोच्या पूर्वीपासूनच ज्यांना वंशपरंपरा जमिनी व जहागिऱ्या मिळाल्या होत्या त्यांची बादशहाविरुद्ध ब्रहि उच्चारण्याची धमक नव्हती. ते झीरोचे मिंधे होते. झीरोचा नोकरवर्ग जरी झीरोला कंटाळला होता, त्याच्या करड्या अंमलाखालीं जरी त्रस्त झाला होता तरी तो कांहींहि करण्यास समर्थ नव्हता. पोटासाठीं त्या वर्गाला हें दिव्य करणें भाग होतें. रोम त्या वेळीं चित्रकला, शिल्पकला, नाट्यकला, नृत्यकला इत्यादि कलांचें माहेरघर असल्यामुळें असल्या कलावंतांची त्या वेळीं चांगलीच चलती होती. शिवाय कवींप्रमाणें कलावंतहि सभोंवतालच्या परिस्थितीकडे दुर्लक्ष करणारे असल्यामुळें व्यवहारशून्य पढतमूर्खांतच त्यांची गणना होत होती. झीरोची जुलमी राज्यपद्धति त्यांच्या खिजगणतींतहि नव्हती. ते आपल्याच तंद्रींत तुंद होऊन बसले होते. स्वतंत्र विचार करणारे, स्वतंत्र धंदा

करणारे व रोमच्या उद्धारासाठीं मनापासून तळमळणारे असे जे कांहीं लोक होते त्यांनीं झीरोच्याविरुद्ध जागृति निर्माण करून आपल्याला हवें तसें वातावरण तयार केलें. त्यांच्या प्रयत्नांचे पराक्रम सुरू झाले. लोकमत तयार करून झीरोकडे शिष्ट-मंडळें रवाना झालीं. पण झीरोनें बाहेरच्या बाहेरच त्यांना वाटाण्याच्या अक्षता लावल्या. त्यांचे तेजस्वी प्रयत्न सूर्यग्रहणाप्रमाणें कांहीं वेळ काळवंडल्यासारखे दिसले, त्यांची थोडीशी पिछेहाट झाल्यासारखी वाटली, पण क्षणभरच. ग्रहणमुक्त झालेल्या सूर्याची प्रभा आपला प्रभाव जगाला लवकरच भासविते. आपली उडी लांब पडावी म्हणून लांब उडी मारणारा जसा चार पावलें मागें जातो त्याप्रमाणेंच ही पिछेहाट होय. चार पावलें मागें गेल्यानें जो जोर मिळतो तो उभा राहिलेल्या जागेवरून मिळत नाहीं हा सिद्धांत आहे. ह्या ‘ तेजस्वी संघटनेची ’ अशी स्थिति होती. दुसरी एक ‘ आशावादी संघटना ’ आपापल्या परीनें कार्य करीत असे. पण फारसे हातपाय न हलवतां, सुखमंचकावर बसून जेवढें करतां येईल तेवढेंच करण्यांत ती भूषण मानीत असे. झीरोनें-त्यांच्या आशाळभूतपणा-कडे—नव्हे आशावादीपणाकडे—नजर देऊन त्यांना मोठमोठे अधिकारहि बहाल केले होते. तिसरी एक संघटना होती, ती होयबाप्रमाणें होती. झीरोनें कांहींहि केलें तरी त्याची स्तुतीच करावयाची, त्याचें कृत्य योग्यच आहे असें म्हणावयाचें. अशाप्रकारें आपणहूनच भाटागिरी करण्यांत ह्या संघटनेचें वैशिष्ट्य होतें. राजाचा प्रतिहारी ( म्हणजे भालदार ) जसा राजा येतांना ‘ निगा रखो ’ म्हणून ललकारीत असतो तसा ह्या संघटनेचा स्वभाव असल्यामुळें ह्या संघटनेला ‘प्रतिहारी संघटना’ असें सूचक नांव मिळालें होतें. झीरोनें आपला पक्केपणा ह्या संघटनेच्याहि बाबतींत दाखविला होता. म्हणजे इतकीं स्तुतिस्तोत्रें गाऊन कोणत्याच प्रतिहारीला मान-मरातब—पदवी—अधिकार कांहींच मिळालें नव्हतें. तरी त्यांचा तेलंगी लोंचटपणा कमी झाला नव्हता.

४—

त्याच वेळीं ग्रीसमध्यें नगर-संस्थानें ( City-States ) अस्तित्वांत येऊं लागल्यामुळें प्रत्येक शहर स्वतंत्र संस्थान गणलें जावें असें ठरलें व त्याचा राज्य-कारभार त्या शहरानें पहावा व शहरावर दुसऱ्या कुणाची हुकमत असूं नये असे नियम झाले. शेजारच्या ग्रीसमधल्या ह्या सुधारणांची झळ रोमला लागणें अप-

रिहार्य होतें. रोममध्यें ग्रीसप्रमाणें नगरसंस्थानांची कल्पनाच रुजावयाला कित्येक वर्षें लागलीं असतीं. पण कांहीं तरी लोकसत्तानुवर्ती राज्यकारभार असावा अशा मागण्या मात्र सर्व संघटना एकजुटीनें करूं लागल्या. आपापला स्वार्थ शाबूत ठेवून व बाजूला काढून फक्त तत्त्वाच्याच दृष्टीनें त्यांच्यांत मतैक्य होतें. झीरोच्या बादशाही हृदयावर हजारों आघात केल्यावर तें एकदांचें थोडेंसें द्रवलें व त्यानें लोकसत्तेचे चार दोन दिखाऊ तुकडे प्रजाजनांच्या अंगावर फेंकून देण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें तो आणि त्याचा लष्करशाही अधिकारीवर्ग या गोष्टीची चर्चा करण्यांत दिवसच्या दिवस घालवूं लागला. आशावादी लोकांच्या तोंडाला पाणी सुटलें व ते जिभा चाटूं लागले. प्रतिहारीनें आधींच स्तुतिसुमनांची ललकारणी ठोकली व तो आ करून डोळे ताणून पाहूं लागला.

अखेर मोठ्या मिनतवारीनें झीरोनें एका प्रतिनिधि--सभा स्थापन करून लोकसत्तेचें बुजगावणें निर्माण केलें. तेजस्वी संघटनेनें त्याचें हें मुत्सद्दीपणाचें कुटिल कारस्थान अगोदरच हेरलें असल्यामुळें ती त्या सोंगाला भाळली नाहीं. अन्यायाचा प्रतिकार करणें हें त्या तेजस्वी संघटनेचें ध्येय असल्यामुळें ही संघटना 'प्रतिकारी' या नांवानें ओळखली जाऊं लागली. प्रतिहारीचें धोरण शक्य तितकें सहकार्य हें असल्यामुळें ह्या संघटनेला कोठेंच स्थान मिळेना. त्रिशंकूप्रमाणें ती अधांतरीं लोंबत राहिली. धड पुरुषही नाहीं आणि धड स्त्रीही नाहीं अशा बोलाई-भक्ताप्रमाणें प्रतिहारीची अवस्था झाली. झीरोशीं कधीं सहकार्य करावयाचें तर कधीं त्याच्या-वरें बहिष्कार घालावयाचा देखावा उत्पन्न करावयाचा हा प्रतिहारीचा परिपाठ असल्यामुळें झीरोला ह्या अर्धवट संघटनेची चीड येई. दिलदार व तेजस्वी शत्रू पुरवला पण नेभळट मित्र नको या म्हणीप्रमाणें प्रतिहारीला कोण जवळ करणार ? तिसरी सुखमंचकावर बसून राजकारण करणारी संघटना आशावादी खरी पण केवळ शब्दशूर होती. कधींकाळीं रोमला चांगले दिवस येतील अशी नुसती आशा करीत ही संघटना आपले दिवस सुखांत कंठीत होती. नुसती आशाच ! हातून कृति मात्र मुळींच नाहीं. फक्त तोंडपाटिलक्या करण्यांत ह्या संघटनेचा हातखंडा असल्यामुळें तिला ' शब्दशूर ' हें समर्पक नांव मिळालें होतें. झीरोच्या एकाद्या कृत्याबद्दलचा आपला असंतोष व्यक्त करावयाचा असला म्हणजे हे शब्दशूर निषेधप्रदर्शनाचा एक भलाजंगी, ठराव करीत व सभेंत टेबलावर मुठी

आपटण्यांत आपलें शौर्य गाजवीत. ' निषेध ' ' तीव्र निषेध ' ' भयंकर निषेध ' हींच काय तीं त्यांचीं शस्त्रास्त्रें व हाच काय तो त्यांचा रणावेश. ह्या शब्दशूरांची ही शिखंडीची वीरश्री पाहून झीरो सुद्धां त्यांना भाळला व त्यानें त्यांच्यावर आपल्या कृपेचें वस्त्र टाकून त्यांना आपलेंसें करून घेतले. प्रतिनिधिसभेंत प्रतिहारी व शब्द-शूर यांचा बराच भरणा होता तरी त्यांना निर्विवाद बहुमत कधींच मिळत नसल्यानें त्यांचें शब्दपांडित्य निरर्थकच ठरे व ते खालीं माना घालून बाहेर पडत. प्रतिनिधिसभा ही झीरोचा बडेजाव दाखविण्याची जागा आहे असें 'प्रतिकारीं'ला मनोमय पटल्यामुळें त्या संघटनेनें आपलें गृहीत कार्य तसेंच जोमानें चालू ठेवलें. ह्या कार्याचा झीरोवर इतका जबरदस्त परिणाम झाला कीं झीरोला आपल्या राजसिंहासनावरून खालीं उतरून प्रतिकारीशीं मोठ्या आदरानें हस्तांदोलन करावें लागलें. प्रतिकारीची ही थोर योग्यता पाहून व झीरोनें प्रतिकारीबरोबर तह केला हें पाहून प्रतिहारी व शब्दशूर अगदीं खवळूनगेले. त्यांच्या अंगाची अगदीं लाही लाही झाली. त्यांनीं प्रतिकारीला ' न भूतो न भविष्यति ' शिव्या दिल्या व बायकी निषेधाच्या निश्वासांनीं वातावरण भरून टाकलें. यापलीकडे ते काय करणार ? स्वतःच्या अंगीं कर्तृत्वच नाहीं, तर दाखवणार कोठून ? कृति कर-ण्याच्या नांवानें शून्य पण बोलण्यांत भाटाला मागें सारणारे शब्दशूर प्रति-कारीचा प्रतिकार कसा करूं शकणार ? प्रतिनिधिसभेची स्थिति वर सांगितल्या-प्रमाणें असल्यामुळें रोममधील प्रजाजनांचें काडीचेंही समाधान झालें नव्हतें. प्रजाजनांचा कल सहाजिकच तेजस्वीपणाकडे असल्यामुळें प्रतिकारीसंघटनेचें सामर्थ्य वाढूं लागलें. इतकें कीं झीरोचें चित्तस्वास्थ्य नाहींसें झालें व दारुण चिंतेनें त्याला घेरून टाकलें. प्रजाजनांच्या तोंडावर आणखी एकादा तुकडा फेकल्या-शिवाय गति नाहीं, असें त्याला दिसून आल्यावर त्यानें एक दरबार भरविण्याचें जाहिर केलें व दरबारच्या वेळीं ज्या हक्कदारांजवळ ताम्रपट आहेत. त्यांना चांदीचे ताम्रपट बहाल करून त्यांचा सन्मान केला जाईल अशी त्यानें घोषणा केली.

५—

प्रचंड दरबार भरणार म्हणून सर्वांचे डोळे तिकडे लागून राहिले. घरीं, दारीं, चव्हाट्यावर, चावडीवर जो तो ह्या दरबाराची चर्चा करूं लागला. लग्नमुंजींचीं व बाराव्याचीं याज्ञिकें करणारे भटभिक्षुकसुद्धां देवळाच्या कट्ट्यावर बसून या चर्चेत

भाग घेऊं लागले. कारण त्यांनाही आपल्या भिक्षुकीच्या हक्कांची शहानिशा करून सनदापत्रें व ताम्रपट मिळवावयाचे होते. आतांपर्यंत ' पत्रावळ ' हाच त्यांचा ताम्रपट होता व तो कोणी हिरावूनही घेऊं शकत नव्हतें. पण ' याचको याचकं दृष्ट्वा श्वानवत् गुरगुरायते ' या म्हणीप्रमाणें त्यांच्यांत धांदल उडाली होती. इतरत्रही तितक्याच जोराची चर्चा ऐकूं येत होती. पहिल्या ताम्रपटाऐवजीं चांदीचे ताम्रपट देण्यांत येणार आहेत म्हणजे काय याचा कोणालाच नीटसा उलगडा झाला नाहीं. पहिले तांब्याचे ताम्रपट झीरोनें कां मागून घेतले आहेत हेंही हक्कदारांना समजेना. झीरोनें आदल्या दिवशीं हे ताम्रपट आणविले होते व दुसरे दिवशीं भर दरबारांत ते परत देण्याचें जाहीर केलें होतें. प्रजाजनांना ह्याचा कांहींच बोध होईना. झीरोनें प्रतिनिधिसभेलाही एक चांदीचा ताम्रपट देण्याचें आश्वासन दिलें होतें.

अखेर दरबारचा दिवस उजाडला. हक्कदारांची व मानकऱ्यांची अगदीं तारांबळ उडाली. ते सकाळपासून नटून थटून बसले. भरजरी पोषाख व हिरे-माणकांचे दागिने घालून ते नंदीबैलाप्रमाणें सजले होते. आपल्याला आज चांदीचा ताम्रपट मिळणार म्हणून ते अगदीं आनंदून गेले होतें. चांदीचा ताम्रपट हा त्यावेळीं मोठा बहुमान समजला जात असे. त्यापेक्षांही सोन्याच्या ताम्रपटाचा अत्यंत मान मोठा होता. राजघराण्यांतल्या स्त्रीपुरुषांना, मुख्य सेनाधिपतीला व मुख्य प्रधानाला इतक्यांनाच तो मिळे. पण ह्याव्यतिरिक्त ज्याच्या वांट्यास तो येई त्याला राजाच्या खालोखाल समजण्यांत येत असे. चांदीच्या ताम्रपटा-चाही मान अद्यापपर्यंत फारच थोड्यांना मिळाला असल्यामुळें आजचा दरबार ही मोठीच पर्वणी होती. भालदारचोपदारांच्या ' निगा रखो 'च्या ललकारणींत बादशहाची स्वारी आली. प्रजाजनांचे व अधिकाऱ्यांचे मुजरे होऊन काम-काजाला सुरवात झाली. एकेका हक्कदाराचें व मानकऱ्याचें नांव उच्चारलें जाई व खुद्द बादशहाच्या हस्तें त्याला चांदीचा ताम्रपट देण्यांत येई. प्रत्येक जण स्मितवदनानें व मोठ्या आदरानें बादशहाला कुर्निसात करून आपल्या जाग्यावर येऊन बसत असे. सर्वांच्या शेवटीं प्रतिनिधिसभेच्या सभापतीला एक रौप्य ताम्रपट देण्यांत आला. त्यांत प्रजाजनांच्या हक्कांचा खालीलप्रमाणें नामनिर्देश करण्यांत आला होता.

१ पृथ्वीवर जोंपर्यंत सूर्यचंद्र अस्तित्वांत आहेत तोंपर्यंत बादशहाची रोमवर सत्ता आहे.

२ बादशहा आपल्या प्रजेला पुत्रवत् मानीत असल्यामुळें आपल्या पुत्रांचे लाड करण्याचा किंवा त्यांना प्रसंगविशेषीं शासन करण्याचा त्याला अधिकार आहे.

३ रोमची प्रजा ही खुद्द बादशहाचीच प्रजा असल्यामुळें तिला हक्क, अधिकार किंवा सवलती देण्याचें कारणच नाहीं.

४ प्रजेनें राजाविरुद्ध कोणतीही चळवळ केल्यास ती पितृद्रोही समजली जाईल व त्याप्रमाणें पुत्रवात्सल्याची दृष्टी ठेवून शासन केलें जाईल.

५ प्रजाजनांना स्वयंसिद्ध असे कोणतेच हक्क नाहींत.इ. इ.

दरबार बरखास्त झाल्यावर जो तो आपापल्या ताम्रपटांकडे निरखून पाहूं लागला. तों ते अगदीं कोरेकरकरीत व चकचकीत दिसूं लागले. ताम्रपटाच्या मागच्या पुढच्या बाजूवर इतक्या सफाईनें चांदीचा मुलामा देण्यांत आला होता कीं, मूळचीं सर्व अक्षरें नाहींशीं झालीं होतीं. ह्या ताम्रपटांवर पूर्वीं जे हक्क लिहिले होते त्यावर चांदीचा बोळा फिरवण्यांत आल्यामुळें कोणाच्या किती जहागिरी व कोणाचें किति उत्पन्न आहे हें कळणें दुरापास्त होऊन बसलें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे हक्कदारांचें, जहागीरदारांचें व मानकऱ्यांचें जें जें उत्पन्न होतें तें तें बादशहानें अशा खुबीनें जप्त केलें व त्यांच्या हातीं फक्त दिखाऊ चांदीनें मढविलेले पांढरे शुभ्र ताम्रपट दिले. चांदीचा ताम्रपट मिळणें हा त्यांना पहिल्याप्रथम मोठा बहुमान वाटला, पण त्यायोगें आपलें सर्वस्व गेल्याचें दृष्टीस पडतांच त्यांच्या शोकाला व क्षोभाला परिमितीच उरली नाहीं. झीरोच्या नांवानें त्यांनीं असंख्य खडे फोडले पण करतात काय ? त्यांना अतिलोभाचें चांगलेंच फळ मिळालें ! ताम्रपटावरील मूळच्या हक्कांना चांदीचा सफेता देण्यांत व हक्कदारांचे हक्क हिरावून घेण्यांत झीरोनें जी कल्पकता लढविली, ती मात्र असामान्यच, असें म्हणणें प्राप्त आहे. झीरोच्या ह्या अलौकिक चातुर्यामुळें त्याचा खजिना लवकरच भरला हें सांगावयास पाहिजे काय ?



# माणुसकीचें दान.

लेखक—**शांताराम.**

दारांत भिकारी पाहिला कीं, दादासाहेबांच्या कपाळाला आंठी पडलीच. भिकाऱ्याच्या बाबतींत त्यांनीं कधींहि दया दाखविलेली कोणास ठाऊक नव्हती ! कित्येकदां तर रागाच्या भरांत ते भिक्षेकऱ्यांना भय्याकडून मारही देववीत. त्यांच्या मोठेपणामुळें या बाबतींत त्यांच्या तोंडावर त्यांचा कोणी उपहास करणें शक्यच नव्हतें. पण त्यांची मित्रमंडळी मात्र कधींकधीं सौम्य शब्दांत निर्भर्त्सना केल्याशिवाय रहात नसत. अशा वेळीं दादासाहेब फक्त हंसून म्हणत, " काय वाटेल तें म्हणा. या बाबतींत माझ्या वर्तनांत केव्हांही बदल होणार नाहीं. रेसमध्यें किंवा लॉटरीमध्यें माझे पैसे गेल्याचें एक वेळ मला दुःख होणार नाहीं, पण या भिकाऱ्यांना मात्र एक कण जरी भिक्षा माझ्या घरांत मिळेल तरी तें मला खपणार नाहीं. अहो काय म्हणून या चोरांना भिक्षा घालायची ? चांगले धडधाकट असतात. पोराबाळांनाहि तुटवडा नसतो. भिक्षा मागून आयत्या अन्नावर चैन करतात. अन् आम्ही वेडे लोक धर्माच्या नांवाखालीं या आयतोबांना उत्तेजन देतों."

कांहीं कांहीं बाबतींत दादासाहेबांचीं मतें व विचार अगदीं विचित्र असत ! आणि तीं मतें अमलांत आणतांना ते कोणाचेंहि ऐकत नसत. त्यांच्या या विचि-

त्रपणाचें-कावेरीला, त्यांच्या छोट्या बहिणीला आश्चर्य व कधीं कधीं वाईटही वाटे. परवांच घडलेला एक प्रसंग. चळवळींत पडून नोकरी गमावून बसलेली —व तुरुं-गांतून सुटून—कांहीं तरी उद्योग दादासाहेबांच्या वशिल्यानें मिळेल या आशेनें एक गरीब सुशिक्षित विधवा त्यांचेकडे आली होती. दादासाहेबांनीं यत्किंचित्‌हि अनुकम्पा न दाखवितां चळवळींत पडण्याचा मूर्खपणा केल्याबद्दल तिची सडकून निर्भर्त्सना करून तिला घालवून दिलें. कावेरीच्या कोमल हृदयाला दादासाहेबांचें हें वर्तन अगदीं निर्दयपणाचें वाटावें यांत नवल नाहीं. अशा बाबतींत दादासाहेबांचें अन्तःकरण जितकें कठोर, तितकें कावेरीचें कोमल असें. या फरकामुळें त्या बहीणभावांचे कित्येकदां खटकेहि उडत. परंतु कावेरी लहान असल्या-मुळें तिचें दादासाहेबांपुढें कांहीं चालत नसे.

कावेरी लहानपणापासून सुस्थितींत वाढली होती, तरी श्रीमंती वातावरणाचे दोष मात्र तिच्यांत बऱ्याच कमी प्रमाणांत होते. तिला कळूं लागल्यापासून चांगल्या ग्रंथांच्या वाचनानें तिनें आपल्या मनाचा बराच विकास करून घेतला होता.

अलीअलीकडे दादासाहेबांच्या विचित्रपणाचा तिला भारीच राग येऊं लागला होता. आणि योग्य प्रसंग येतांच या बाबतींत दादासाहेबांचा निषेध करण्याचें तिनें ठरविलें होतें.

कांहीं कामासाठीं दादासाहेब आज बाहेरगांवीं गेले होते. कावेरीच्या शाळेलाहि आज सुट्टी असल्यामुळें ती घरींच होती. सुट्टीचा दिवस म्हणून तिनें आपल्या एका आवडत्या मैत्रिणीला जेवावयास बोलाविलें होतें. आणि सगळा स्वयंपाक आज ती स्वतः करणार होती.

थंडीचे दिवस असल्यामुळें सूर्योदय होऊन गेला तरी ती आपल्या उबदार बिछान्यांत पडून राहिली होती. आळसावलेल्या नजरेनें ती एक पुस्तक पडल्या-पडल्या चाळीत होती. पुस्तक चाळतां चाळतां तिनें सहज एक वाक्य मोठ्यानें वाचलें. तिला ते आवडलें—पटलें—म्हणूनच कीं काय तिनें तें पुनः एकदां अगदीं सावकाश वाचलें. व हातांतील तांबड्या पेन्सिलीनें तिनें त्या वाक्याखालीं खूण केली. तें वाक्य असें होतें, " मनुष्य कितीहि बुद्धिमान असला आणि त्याला गरीब लोकांचे हाल कसे होतात याचें जरी पूर्ण ज्ञान असलें तरी त्याच्या

अंगांत जर ' कारुण्यवृत्ति ' जागृत नसेल तर गरिबाला मदत करण्याची त्याला कधींहि इच्छा होणार नाहीं. ”

कावेरीनें पुस्तक मिटवून ठेविलें व ह्या वाक्यावर विचार करीतच—जांभई देऊन ती उठली व नित्यक्रमाला लागली. पण तिच्या मनांतून तें वाक्य जाईना. एकसारखें तेंच तिच्या डोक्यांत घोळूं लागलें.

केशरचना करतांना ती मनांत म्हणत होती, “ गरिबी हा मनुष्याचा दोष कां आहे ? मग श्रीमंतांनीं गरिबांची एवढी अवहेलना कां करावी ? नवल आहे ! ”

स्नान करून पातळ बदलतांनाही तिचे हेच विचार चालू होते. ती म्हणत होती, “ आमचे दादा बुद्धिमान आहेत. शिकलेले आहेत, वकील आहेत. त्यांना गरीबांच्या दुःखांची जाणीव नसेल ? मग त्यांचें वर्तन असें निर्दयपणाचें कां ? काय बरें याचें कारण ? ” तिला उलगडा पडेना. आपल्या मैत्रिणी- बरोबर आज याच विषयावर चर्चा करावयाची असें ठरवून ते विचार तिनें मनांतून काढून टाकण्याचा प्रयत्न केला. पण कांहीं केल्या ते विचार मनांतून जाईनात. त्या गरीब विधवेला, दादासाहेबांनीं अपमान करून घालवून दिल्याचा प्रसंग तिला आठवला व ती अगदीं खिन्न झाली.

आपल्या मैत्रिणीसाठीं तिनें किती तरी चांगले चांगले पदार्थ केले. पण हें सर्व करतांना तिच्या मनाला वाटावा तसा उल्हास वाटेना. कसली तरी हुरहुर तिच्या मनाला लागली होती. घड्याळांत ११ वाजले त्यावेळीं तिची बहुतेक पाकसिद्धि झाली होती. केशर आणण्यासाठीं म्हणून ती आपल्या खोलीकडे जावयास निघाली, तों खालीं दरवाज्यांत कोणी तरी मोठमोठ्यानें भांडत आहे असा तिला भास झाला. म्हणून तिनें खिडकींतून खालीं पाहिलें.

एक भिकारी आंत शिरण्याचा प्रयत्न करीत होता व भय्या त्याला धमकी देऊन बाहेर घालवीत होता. शब्दावरून शब्दवाढून त्यांची बाचाबाची चालली होती. कावेरीनें तें पाहिलें. त्या भिकाऱ्याकडे पाहतांच तिचें अन्तःकरण द्रवलें. दादासाहेब यावेळीं घरीं नाहींत हें एकप्रकारें तिला बरेंच वाटलें. त्या भिकाऱ्याच्या मुद्रेवरून तो भिकारीच आहे असें तिला वाटेना. त्याच्या मुद्रेवर—ती जरी मलूल होती तरी—एक प्रकारचा कुलीनपणा दिसत होता. त्याचे डोळेहि तेजस्वी असून त्यावेळीं ते तिला अगदीं कारुण्यपूर्ण दिसले. एक क्षणभरच तिनें विचार

केला; व भैय्याला ओरडून तिनें सांगितलें, " गंगाप्रसाद, त्याला आंत येऊं दे." गंगाप्रसादानें एक वेळ तिच्याकडे पाहिलें व कांहीं तरी पुटपुटत त्यानें त्या भिकाऱ्यास आंत जाऊं दिलें. दादासाहेबांच्या आज्ञेच्या हें विरुद्ध होत आहे हा भाव त्यानें दर्शविलाच. पण ताईसाहेबांच्या हुकुमापुढें त्याचें कांहीं चालेना.

तो भिकारी आंत आला. कावेरी माडीवरून ओटीवर आली. दोन मिनिटें कोणीच कांहीं बोललें नाहीं. विनम्र वृत्तीनें तो उभा होता. त्याच्या डोळ्यांतील अश्रु कावेरीला स्पष्ट दिसले.

ती मृदु स्वरांत म्हणाली, " सांगा, आपणाला काय मदत पाहिजे ? " तो आंत ओढलेल्या आवाजानें, वाळलेले ओंठ जिभेनें पुशीत म्हणाला, " ताईसाहेब, मी तीन दिवसांचा उपाशी आहे. मला कृपा करून आधीं अन्न द्या आणि नंतर काय तें बोला. भुकेनें मी अगदीं व्याकुळ झालों आहे. देवालाच माझी दया आली आणि त्यानें तुमच्या दयाळू अन्तःकरणांत प्रेरणा केली. जातीनें मी कोणी हीन नाहीं—मी मराठा आहे. "

कावेरीनें थोडा विचार केला. व त्याला स्नान करण्याची जागा दाखवून एक धडकें धोतर त्याला नेसावयास दिलें. तिची मैत्रीण अद्याप आली नव्हती;पण तो कांहीं विचार न करतां तिनें तयार केलेल्या स्वयंपाकांतून ताट वाढून तयार केलें व त्या मनुष्यास भोजनास बसविलें.

तो मनुष्य खरोखरीच भुकेला होता. पुढें आलेल्या सुग्रास अन्नाचा त्यानें भरपूर समाचार घेतला व कावेरीस अनेक धन्यवाद दिले.

भोजनोत्तर तिनें त्यास बसण्यास सांगून त्याची हकीगत विचारली. " सहज सांगण्यासारखी असली तरच सांगा. तुम्हाला शक्य ती मदत करावी हीच माझी इच्छा आहे.भलती जिज्ञासा मी दर्शवीत नाहीं. "

तो मनुष्य घसा खाकरून एक वेळ कृतज्ञतेनें तिच्याकडे पहात म्हणाला, " ताईसाहेब, तुमच्यासारख्या देवमाणसाजवळ मी आपलें दुःख ओकलें नाहीं तर मी मनुष्य कसला ? ताईसाहेब, माझी हकीगत मोठी नाहीं, पण मोठी दुःखदायक आहे. "

" मी कांहीं भिकारी नव्हे. महिना दीड महिना झाला माझी नोकरी सुटली. गतवर्षी प्लेगच्या तडाक्यांत माझी आई व तिच्यामागें बायको—दोघीही मरण पावल्या. त्या दुःखानें मी अगदीं खचून गेलों होतों. गिरणींत मला २०।२५

रुपयांची नोकरी होती. परवा गिरणींतले १०० लोक कमी केले त्यांत माझ्याहि भाकरीवर गदा आली. घर नाहीं, दार नाहीं, आप्तेष्ट नाहीं, शेतपोत नाहीं. अशा स्थितींत नोकरी सुटल्यामुळें माझी काय अवस्था झाली असेल याची कल्पना करा. जवळ होता नव्हता तेवढा पैसा आईच्या आजारपणांत खर्च होऊन गेला होता. अशा स्थितींत एका स्नेह्याकडे कांहीं दिवस राहून, कोठें तरी काम मिळेल म्हणून खटपट केली. कुठेंहि जमेना म्हणून जिवाचा हिय्या करून मुंबईचा रस्ता धरला. तिथल्या गिरण्यांतहि माझी दाद लागेना. रात्रीं विसाव्याला कुठें पडावयाचें हा प्रश्न होता. फूटपाथवर झोंपलों. तिथें पोलिसानें दम भरला आणि वहिमी म्हणून गेटावर नेलें. तिथूनं कशीबशी सुटका करून घेतली. जीव अगदीं मेटाकुटीस आला होता. खिशांत पैसा नाहीं, पोटांत अन्न नाहीं. अशा स्थितींत इथें आलों. दोन दिवस भटकलों. कोठें काम मिळेना. शेवटीं वैतागून—आज भीक मागण्याचें ठरविलें. तीहि कुणी घालीना. जिथें तिथें दुरुत्तरें आणि अपमान—" इतकें बोलून तो थांबला. पुढें त्याच्यानें बोलवेना. कावेरीचें हृदयहि त्याची कहाणी ऐकून भरून आलें.

" अरेरे " एवढाच कळवळ्याचा उद्गार तिच्या तोंडांतून बाहेर पडला.

ती सहानुभूतीनें म्हणाली, " आतां तुम्ही पुढें काय करणार आहांत ? सांगण्यासारखें असेल तरच सांगा—"

तो मनुष्य उठून उभा राहिला. कावेरीच्या अगदीं जवळ जाऊन त्यानें आपल्या कपड्यांच्या आंतून लपवून ठेविलेलें हत्यार बाहेर काढलें—

तें पहातांच कावेरी दचकून मागें सरली व भीतीनें ती आतां किंचाळणार, इतक्यांत तो म्हणाला, " ताईसाहेब, भिऊं नका. अन्नदात्यावर शस्त्र उगारण्याइतका मी नीच नाहीं. काल वैतागाच्या भरांत हें शस्त्र मीं पैदा केलें. सुध्या मार्गानें पोटाची खळगी भरेना म्हणून अन्नासाठीं वाममार्ग पत्करण्याचें ठरविलें होतें. तिरस्कारानें पाहूं नका. माझी माणुसकीच नष्ट झाल्यामुळें मी तसला अधम मार्ग पत्करण्याचें ठरविलें होतें. ताईसाहेब, तुम्ही मला देव भेटलांत. तुमचे उपकार अनंत आहेत. तुमच्या घरांतून मी आज विन्मुख परत गेलों असतों—तर-तर—माझ्यांतली माणुसकी कायमची नष्ट होऊन मी कांहीं तरी अनान्वित कृत्य केलें असतें. ताईसाहेब, तुम्ही माझा उद्धार केलांत. माझी माणुसकी तुम्हीं मला परत

दिली आहे. यापुढें—हें पहा हें शस्त्र आणि त्याबरोबर माझ्यांत संचरलेला सैतानी अधमपणा तुमच्यापायीं ठेवला आहे. आजपासून पोटांत कांटे भरीन, पण मी माणुसकी सोडणार नाहीं. माझ्या उद्धारासाठीं मी सतत झटेन. आणि तुमच्या दिव्य मूर्तीचें सतत स्मरण मला त्या कार्यांत उत्तेजन देईल." असें म्हणून त्यानें तिच्या पायांवर मस्तक ठेवून अश्रूंचा अभिषेक केला.

कावेरी आश्चर्यानें व सद्गदित अन्तःकरणानें पहात आहे तोंच तो मनुष्य झटक्यासरशीं निघूनहि गेला.



# मंतरलेला ताईत.

( लेखकः—श्रीयुत दयानंद गणेश कुळकर्णी. )

“ए व्ह. फा.” घरांत येतांच टेनिस–रॅकेट खुंटीला अडकवीत मी सुरवात केली. “व्ह. फा ऽऽऽ-”

“काय रे ओरडतोस असा दादा. कधीं बिचारा सरळ हांक मारील तर शपथ.” व्ह. फा. नें टोला दिला.

“अबबबब ! काय हा फणकारा ! म्हटलें आपल्या ‘जुने’ साहेबांकरितां हा गरमागरम मसाला थोडाबहुत शिल्केंत राहूं द्या.”

“इश्श ! तुला थट्टा केव्हां करावी तें मुळीं समजतच नाहीं. तें राहूं दे. तुला काय पांहिजे तें सांग पाहूं अगोदर.”

“यावेळीं मी मागून दुसरें काय मागणार ! एक ‘चांगला डबल कप’ दे म्हणजे झालें. तूं कांहीं म्हण ताई ! तुला चिडविल्याशिवाय मला चैनच पडत नाहीं बघ.”

“आणि कोणच्या पुरुषाला पडतें ? दुसरीकडे पुरुषार्थ गाजवायला हिंमत पाहिजे ना ! मग काय उठल्यासुटल्या थट्टा. तुम्हीच आम्हाला बिजवरांच्या गळीं बांधतां, अन् पुन्हां ‘जुनेरी’ ‘तिनेरी’ म्हणून खिजवावयाला तयार होतां.

तुम्हाला असल्या जुनेरी–तिनेरी बायका मिळत नाहींत म्हणून तर या गमजा आहेत. अप्पलपोटी जात ना पुरुषांची. फायदा तेवढा पुरुषांचा. चांगलें तेवढें पुरुषांना. संसारांतले जुलमी राजेच कीं नाहीं तुम्ही ! ”

“ वन्स मोअर. नो मोअर. व्ह. फा.!” खरोखरच आतांच्या आतां व्यासपीठावर उभें राहून, दंड ठोकून साऱ्या पुरुषजातींची मारे खरड काढावीशी वाटते. करूं सुरवात आतांच –“ बंधुभगिनींनो,—अरेच्या ! Slip of tongue. हं—भगिनींनों— ”

“ मी आपली जातेंच कशी. ”

“ अग पण प––ण –– ”

छेः बिघडलेंच काम. डंवचलेल्या नागिणीप्रमाणें त्वेषाचे फुत्कार टाकीत शेवटीं गेलीच ती.

२—

वाचकहो ! बजावून ठेवतों. मी आतां चहाचा पेला घशाखालीं उतरविला असल्यानें माझ्या कहाणीचा डोस तुम्हीं ‘ होय ’ म्हणा, चाहेल तर, ‘नाहीं’ म्हणा, तुमच्या घशाखालीं मी उतरविणारच.

म्हणजे त्याचें असें झालें.

‘ आणि प्रभु म्हणाला, माधवाच्या वडिलांना मृत्युलोकांत ठेवूं नका, आणि माधवचे वडील मृत्युलोकांतून गमन करते झाले. ’

मग काय ? साधारण खाण्यापिण्यापुरतें होतें घरीं. आई काय बिचारी जशी कांहीं चौदाव्या शतकांतली. नमूला मात्र मी शाळेंत घातली. हो, एकुलत्या एक बहिणीची एकुलत्या एक भावानें फिकीर करावयाची नाहीं तर ती करावयाची तरी कोणी ? तुम्ही —! वा ! वा ! खूप आहांत झालें. नमू यथाकालीं व्हर्न्याक्युलर फायनलची परीक्षा पास झाली, आणि तेव्हांपासून तिला मी चेष्टेनें ‘ व्ह. फा. ’ असें हांक मारीत असें. तिनें चिडावें असा त्यांत माझा उद्देश असे, व स्त्रीस्वभावानुसार तो साध्यही होत असे.

मी कांहीं तैलबुद्धीचा विद्यार्थी नव्हतों. त्यामुळें ‘ युवर मोस्ट ओबिडिअंट सर्व्हंट ’ तयार करणाऱ्या कारखान्याच्या चाळणींतून दोन चार वेळां अलगत वर राहिलों. यामुळें झालें एवढेंच कीं एकेकाळीं असलेला माझा सहाध्यायी व

जीवश्चकंठश्च स्नेही दिवाकर माझ्याच कॉलेजांत प्रोफेसर म्हणून आला, आणि मी ---वर आलेंच आहे झालें.

कृतींत कांहींकां असेना. निदान बोलण्याचालण्यांत तरी 'हिंमत मर्दा तो मदत खुदा ' या तत्त्वाचा मी पुरस्कर्ता होतों. वृत्ति खेळाडू असल्यानें उद्यांची काळजी मी करीत बसत नसे. दिवाकराची गोष्ट फार निराळी होती. लहानपणापासून त्याचा वाङ्मयाकडे फार ओढा असे. एकदां कां त्यानें वाङ्मयविषयक गप्पांना सुरवात केली कीं मग तो त्यांत तनमनेंकरून पूर्णपणें रंगून जात असे. आमच्या नमूची व त्याची याच कारणावरून विशेष गट्टी जमली होती. त्याच्या आग्रहानें व सहानुभूतीनें तिचा वाचनाचा व्यासंग फार वाढला होता. रशियाच्या पंचवार्षिक योजनेपासून चंद्रावर स्वारी करण्यापर्यंत व व्हाईट पेपरपासून वेदवेदांगांपर्यंत असतील नसतील तेवढ्या विषयांवर त्यांच्या अघळपघळ गप्पा चालत असत. याचा योग्य तो फायदा घेऊन आम्ही दोघांलाही एक दोन वर्षापूर्वींच चतुर्भुज करून टाकलें होतें. एवढें सांगितलें म्हणजे नमू सध्या माहेरपणाकरितां आली होती हें निराळें सांगावयास नको. सासर व माहेर गांवांतच असल्यानें व सासूपणाचा अधिकार दाखविण्यास सासरीं कोणीही नसल्यामुळें तिला माहेरीं रहाणें आवडत नसे.

प्रथमप्रथम दिवाकरानें वाङ्मयबाजीचा प्रयोग माझ्यावर करण्याचा इरादा बांधला. मी थोडाच त्याला दाद देणार! अगदीं गंभीर मुद्रेनें त्याचें रसाळ वक्तृत्व ऐकावें आणि शेवटीं त्याची ' न भूतो न भविष्यति ' टिंगल करण्यास सुरवात करावी. आपण होऊन त्यानें माझा नाद सोडला.

## ३—

" या प्रोफेश्वर ! ( वाचक ! माफ करा हं ) दुनिया आबादी आबाद तो हैना ? कीं कांहीं चंडप्रचंड संक्रमणावस्थेच्या क्रांत्या सुरू झाल्या ? मी तर ऐकलें आहे कीं न्यू गॅबियाच्या नैर्ऋत्य कोपऱ्याच्या दक्षिणोत्तर काटकोनांपासून ७५° वर सैबेरियांतील काळ्या पाण्यावर पाठविलेल्या कैद्यांचे सांगाडे सांपडले. अन् गौरीशंकरावर सोन्याची खाण सांपडल्यामुळें पासिफिक महासागर आटून जाऊन सहारा वाळवंटांत पनामा कालवा एकदम प्रगट झाला !" मी दिवाकराचें (मेहुणा असला म्हणजे मित्रत्वाचें नातें टाकून द्यावें कीं काय ) स्वागत केलें.

" संपलें तुझें ? किती पोरकटपणा करतोस रे मधू ! नाहीं, विचार कर. हीच कल्पनाशक्ति. तूं एकाद्या उच्च ध्येयाप्रत केंद्रीभूत केलीस तर — "

" एडिसन, सर जगदीशचंद्र बोस किंवा बस्टर कीटन होईन असेंच कीं नाहीं. जाऊंदे. मी इतका बडा मनुष्य होऊं इच्छित नाहीं. "

" छेः छेः तें कांहीं नाहीं. तुझ्या अंगीं कर्तबगारी आहे. कल्पनाशक्ति आहे. वृत्ति खेळाडू आहे. बोलण्याचालण्यांत तूं मीठा आहेस. तुझा मला योग्य उपयोग करून घेतला पाहिजे. माझी खात्री आहे कीं तुला जर योग्य वळण मिळालें तर तूं चांगला पुढें येशील. ही कॉलेज करिअर तुझ्या लायकीची नाहीं. सोडून देईनास ही. "

" आणि मग हे गंभीर पुरुषा ! मग काय करूं ? त्वं पुरा साग —"

"ऐक रे बुवा. माझी कल्पना मी तुला सांगतों. गेलीं दोन तीन वर्षें याबद्दल मी अत्यंत साधकबाधक रीतिनें विचार केला आहे. थोडेंबहुत भांडवलही मिळण्यासारखें आहे. "

" एकादी सोनेरी टोळी स्थापन करावयाची किंवा काय ? "

" आतां जरा गप बस पाहूं. मी सांगतों तें लक्ष्यपूर्वक ऐकून घे. सुशिक्षित लोकांमध्यें आज बेकारी भयंकर बोकाळली आहे. ' अन्न ' ' अन्न ' करीत लाखों बेकार अर्धपोटी व अर्धपोषाखी ' नौकरी ' ' नौकरी ' जप करीत भुताखेतांसारखे भटकत आहेत. भांडवलशाही संपत्तीच्या मदानें धुंद होऊन ' मला काय त्याचें ' ' मला काय त्याचें ' म्हणत ऐषआराम करीत आहे. पुढारी म्हणविणारे लोकाग्रणी नुसते सहानुभूतीचें नाटक दाखवीत आहेत. एकालाहि कळकळ नाहीं. अत्यंत विद्वान् म्हणविलीं जाणारीं नररत्नें या जिव्हाळ्याच्या प्रश्नाकडे जाणूनबुजून कानाडोळा करीत आहेत. वर्ण हा जन्मावर अवलंबून नको—कर्मावर हवा—मग संपत्ति ही तरी कां जन्मामुळें मिळावी ? श्रीमंताच्या पोटीं जन्म घेणाराला बापजाद्यांनीं येनकेनप्रकारेण सांठविलेलें कुबेराचें भांडार कां मिळावें ? विचार करील त्याला हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे.

कोणीहि स्वार्थत्याग करण्यास आज तयार नाहीं. स्वतःला झळ लावून घेण्याची कोणाचीहि इच्छा नाहीं. मग या मनानें बावरलेल्या, परिस्थितीनें गांजलेल्या, काळजीनें पोखरलेल्या व निव्वळ एकांगी पुस्तकी शिक्षणपद्धतीनें कुचकामाच्या

बनविलेल्या बेकारांना पोटापाण्याचा मार्ग कोणी दाखवावा ? जेथें धड पोटाला मिळत नाहीं, वापरावयाला वस्त्र नाहीं, अशा अवस्थेंत ह्या तरुण बेकारांकडून देशाला कोणचें सहाय्य होणार आहे ? आणि हे तरुण कोण—तर भावी पिढीचे आधारस्तंभ ! कोणी कलमी करतात कीं बेकारांनीं बांगड्या भरण्याचा धंदा करावा. पण स्वतःला बांगड्या भरवून घेण्याइतकें भांडवल ज्यांच्याजवळ नाहीं त्यांनीं काय करावयाचें ? व धंद्यांत उच्चनिचपणा, पोझिशन, उच्च कल्पना, हवेंतलि मनोरे वगैरे दृढमूल कल्पना, पोकळ आशावाद व भावना ज्या शिक्षणामुळें बेकारांच्या मनांत रुजविल्या गेल्या त्यांचें काय करावयाचें ?

अशा विचार करण्याजोग्या पुष्कळ गोष्टी आहेत. मी स्वतःला साधारण पण प्रामाणिक मनुष्य समजतो. या बेकारावर तोडगा म्हणून मला एक मार्ग सुचला आहे. मला यश मिळालें तर बऱ्याचशा बेकारांचा पोटापाण्याचा प्रश्न सुटेल. व्यापारांत दम राहिला नाहीं म्हणतात, व त्यालाहि भांडवल लागतेंच. तेव्हां उरला आहे तो एकच मार्ग. हिंदुस्थान हा कृषीप्रधान देश आहे. जमीन इतकी मुबलक आहे कीं छत्तीस कोटी लोकांना अन्न पुरून आपण तें बाहेरच्या छत्तीस कोटी लोकांना पुरवूं शकूं. पण हें केव्हां ? शेतीची मशागत कशी करावी याचें खरें सशास्त्रज्ञान शेतकऱ्यांना होईल तेव्हां. जुनी पद्धत, जुने मार्ग आतां टाकून दिले पाहिजेत.

माझा असा विचार ठरला आहे. प्रथम आपण दोघेंहि वर्ष दीडवर्ष शेतकरी-लोकांत पूर्णपणें मिसळून त्यांच्या जरूरी, आकांक्षा, मशागतीची एकंदर पद्धत व याबाबत प्रत्यक्ष कोणतें धोरण स्विकारावयास पाहिजे या सर्व गोष्टींचा अनुभव घेण्याकरितां फिरतीवर निघूं. पांच सात निवडक मळे शेतकी कॉलेजांतील अनुभविक सुशिक्षितांकडून आपल्या रहाळांत चालविले जात आहेत त्यांचीहि पद्धत आपण मनन करूं. निरनिराळ्या फळफुलझाडांस व भाजीपाल्यास खतें, रंग, जंतुनाशक द्रव्यें व एकाच जमिनींतून वर्षाकांठीं चार चार पांच पांच पिकें कशीं काढावीं याची साग्र माहिती आपण व्यवहारी ज्ञानानें मिळवूं. या बाबतींत आपण जरूर तो अनुभव प्राप्त केला म्हणजे मुंबईस एक कंपनी उघडावयाची. या कंपनीचा उद्देश असा कीं, शेतकऱ्यांस लागणारीं खतें, रंग, द्रव्यें व उपकरणीं सोईसोईनें पुरवावयाचीं, जमिनींतून उत्पन्न होणाऱ्या सर्व प्रकारच्या मालाची देवाण-घेवाण करावयाची, योग्य कमिशन आकारून मालाची खरेदीविक्री करावयाची, बेकार

सुशिक्षितांस शेतीविषयक ज्ञान कंपनीनें पदरखर्चानें देऊन ते त्यांत तज्ज्ञ झाले म्हणजें त्यांची शक्य ती सोय लावावयाची व पुढें कंपनीचा जसजसा जम बसेल तसतशा शेतकऱ्यांस अल्प व्याजानें कर्जाऊ रकमा देण्याची तजवीज करावयाची. शेतीची मशागत इतर देशांत कशी करतात, व हिंदुस्थानांत कोणत्या प्रकारें मशागत केली असतां जास्तींत जास्त फायदा होईल याची साग्र माहिती देण्याकरितां आपण फिरते प्रचारक ठेवूं. वेळप्रसंगीं थोडा मोबदला घेऊन नमुनेदार बागाईत जिराईत किंवा अन्य जमीन आपण लागवडीस आणूं. कंपनीचा जसजसा जम बसेल तसतसे अधिक अधिक लोक आपण अन्नास लावूं शकूं, व जसजसें भांडवल वाढेल तसतशी वेळप्रसंगीं आपण परदेशी कंपन्यांशीं व मालांशीं टक्कर द्यावयाची. सुरवातीस आपणांस प्रत्येक ठिकाणीं अपयश येण्याचा संभव आहे खरा. पण एकदां आपल्या सचोटीबद्दल व कळकळीबद्दल सर्वसाधारण जनतेची खात्री पटली कीं आपलें भांडवल व मनुष्यबळ वाढून प्रमुख शहरीं आपण शाखा, उपशाखा स्थापन करूं शकूं."

"कल्पना मोठी गोड आहे. कृतींत येईल तेव्हां खरें. पण सुरवातीला तरी भांडवलाची सोय कशी करावयाची ?"

"मी निरर्थक बडबड करणारा मनुष्य नाहीं. वर्ष दीड वर्ष विशेष रकमेची आपणांस जरूरी पडणार नाहीं. कंपनी स्थापन करावयाचे वेळीं माझे स्नेही शेट लखमीचंदजी पांच आण्याचे भागीदार म्हणून तीन चार हजार रुपये सुरवातीला भांडवल देणार आहेत. आपण फक्त अंगमेहनत करावयाची व शक्य तेवढें भांडवल घालावयाचें असें ठरलें आहे. वेळप्रसंगीं शेटजी वाटेल ती रक्कम उचलून देतील. शेटजींचा व माझा पहिल्यापासून घरोबा आहे. त्यांचा माझ्यावर पूर्ण विश्वास आहे. दुसऱ्या कोणच्याहि व्यवहारांत ते अत्यंत दक्ष रहातील किंवा पडणारही नाहींत. पण माझी कल्पना त्यांच्या व्यवहारी मनाला पटली आहे."

"मग तूं नौकरी सोडणार कीं काय ? प्रोफेसरच्या जागेसारखी लठ्ठ पगाराची, अल्पश्रमाची व थोड्याबहुत मानाची जागा मिळणें आजकाल सवंग नाहीं."

"मला नौकरी सोडावी लागली."

"कारण ?"

"'प्रमोद'च्या जूनच्या अंकांत 'झांशीवाली' ही माझी लघुकथा प्रसिद्ध

झालेली वाचली आहेस. असल्या लिखाणामुळें कॉलेजवर सरकारची अवकृपा होईल तेव्हां अशा प्रकारचे लेख लिहूं नका अशी मला प्रिन्सिपॉलसाहेबांनीं समज दिली होती. माझ्या स्वाभिमानी मनाला हें अत्यंत अपमानास्पद वाटलें. वीरवृत्तींचें, तेजाचें, सत्त्वाचें व सत्तत्त्वाचें शब्दचित्र उतरविण्यासही बंदी असावी अं! मला चिरड आली. दुसऱ्या एका मासिकांत मी त्यापेक्षां झणझणीत लेख लिहिला. प्रिन्सिपॉलसाहिब भडकले. सरकारी ग्रँट बंद होण्याची त्यांना भीति पडली. त्यांनीं मला लेखी माफी मागण्याबद्दल किंवा राजीनामा देण्याबद्दल बोर्डाकडून हुकूम देवविला. अर्थात् मी राजीनामा दिला. प्रकरण संपलें. यापुढें मात्र कोणतीहि नौकरी करावयाची नाहीं असें मी ठरविलें आहे."

"पण तुझा ओढा तर वाङ्मयाकडे जास्त आहे. मग ही शेतीची कल्पना तुला कशी सुचली?"

वाङ्मयाबद्दल प्रेम असलें म्हणजे इतर व्यवसाय करूं नयेत असें थोडेंच आहे? आपल्या योजनेला यश आलें तर लक्षावधि बेकारांच्या पोटापाण्याचा प्रश्न सुटेल. बरें तें असो म्हणा. पण माझ्या राजीनाम्यांबद्दल तूं तूर्त बोलूं नकोस. तो वृत्तपत्रांतून जाहीर होईल तेव्हां होऊं दे. या आपल्या योजनेबद्दल तूं सर्वस्वीं माझ्या विश्वासावर रहा. मी या विषयाचा अत्यंत खोल अभ्यास केला आहे."

"मी तरी तुझ्याबाहेर कोठें आहे? तुझें म्हणणें मला पूर्णपणें पटलें आहे." मी उत्तर दिलें. नाहीं तरी कॉलेजबद्दल आम्हाला फार प्रेम होतें!

## ४—

दिवाकराच्या संगतींत दीड दोन वर्षें श्रम, ऊन, पाऊस, काल्पनिक अडचणी किंवा खऱ्या अडचणी यांपैकीं कशाचीहि पर्वा न करतां निरनिराळ्या खेड्यापाड्यांतून व मळ्यांतून हिंडून योग्य तो अनुभव मला मिळविता आला. अशक्य वाटणारें शरीरसौष्ठवही या अवधींत मला प्राप्त करून घेतां आलें. मिळणारा अनुभव विविध प्रकारचा असून त्याच्या जोडीलाच आम्ही सुधारलेल्या पद्धतींचाहि अभ्यास करीत असूं. यामुळें आमचा दुहेरी फायदा झाला.

आमच्या दोघांच्याही घरीं आमच्या विरुद्ध जाणारें कोणी नव्हते, व त्या दृष्टीनें आम्हांला कोणतीहि अडचण उपस्थित झाली नाहीं. वरील मुदतींत मिळविलेला प्रत्यक्ष अनुभव व काय करावयास पाहिजे याविषयींचें यथातथ्य प्राप्त झालेलें

ज्ञान लेखणीनें उतरविणें अशक्य आहे, व तसा या लिखाणाचा उद्देशही नाहीं. अनुभव अनुभवावे लागतात.

आज आम्ही शेट लखमीचंदजी यांच्या मुलाखतीला निघालों. दिवाकरासारखा अष्टपैलू हिरा बरोबर असल्यानें जगाच्या कोणत्याहि प्रदेशांत व परिस्थितींत मला आशेचें व आनंदाचें साम्राज्य निर्माण करतां येईल अशी उमेद होती. शेटचा बंगला वाळकेश्वर रोडला होता.

शेटच्या बंगल्याजवळ येऊन पोचलों. आंतून हास्याचे फवारे येत होते. शेटजी संपत्तीनें तसे मनानें देखील श्रीमंत दिसले. आम्ही दिवाणखान्यांत प्रवेश करतांच त्यांनीं आम्हांला आदरपूर्वक उत्थापन दिलें.

" या भाऊसाहेब ! " दिवाकराला त्यांनीं नमस्कार केला.

दिवाणखान्यांत आणखी एक गृहस्थ बसलेले होते. ते शिक्षणखात्यांतील एक अधिकारी आहेत असें मला कळलें.

" आपल्या चर्चेस व्यत्यय आला असावा." दिवाकरानें सुरवात केली.

" व्यत्यय ! छेः छेः आमची पुस्तकीज्ञानावर चर्चा चालली होती." शेटनें सुरवात केली " हें ज्ञान किती टाकाऊ असतें याचें एक उदाहरण मास्तरांनीं मला सांगितलें. माझ्यासारखा लोटा घेऊन येणारा इसम प्रामाणिकपणें रात्रंदिवस कष्ट करून आलेल्या प्रत्येक संधीचा पुरेपूर फायदा घेऊन कालानें लक्षाधीश होतो व मोठमोठ्या वकील बॅरिस्टरांस बोटांवर नाचवितो. आणि शिक्षणाप्रीत्यर्थ हाडाचीं काडें करणारे मात्र जेमतेम जगतात याचें आश्चर्य वाटतें."

" विषय कशावरून निघाला ? "

" व्हर्न्याक्युलर फायनलची परीक्षा झाली कीं शेंकडा साठसत्तर मुलें शिक्षकांच्या जागा मिळविण्याचा प्रयत्न करतात. या भावी शिक्षकांच्या अपूर्व ज्ञानभांडाराबद्दल." शेटनें खुलासा केला.

दिवाकरानें प्रश्नयुक्त मुद्रेनें त्यांचेकडे पाहिलें.

" राऊंड टेबल कॉन्फरन्साविषयीं या भावी पिढीच्या शिक्षकांस व मॅट्रिकपर्यंत गेलेल्या कांहीं विद्यार्थ्यांस किती ज्ञान आहे हें अजमावून पहाण्यास प्रश्न विचारले असतां निरनिराळीं रत्नें निरनिराळीं मुक्ताफळें कशीं उधळतात त्याची गंमत हे मला सांगत होते. एकानें उत्तर दिलें कीं ' एक मनुष्य राऊंड टेबलच्या वर्तुळाभों-

वर्तीं इ. स. १९३१ पासून सारखा फिरत आहे. त्याचें हें वर्तुळाकार फिरण्याचें काम झाल्यावर हिंदुस्थान सरकार कांहीं सुधारणा देणार आहे.' दुसरा म्हणतो कीं 'जेथें गांधी, शौकतअल्ली यांच्यासारखे मोठे लोक शांततेला ठिगळे मारीत असतात त्या सभेला राऊंड टेबल कॉन्फरन्स असें म्हणतात.' तिसरा सांगतो कीं ' राऊंड टेबल कॉन्फरन्स लंडन येथें भरते. स्वतः राजेसाहेब तिचे हुकूम पाळतात. टेबल वाटोळें असतें व माणसें भोंवतीं बसतात.' चवथा म्हणतो कीं 'हें लंडनमधील एक शहर आहे. तेथें भाषणें वगैरे होतात.' पांचव्यानें तर ' मि. राऊंड हे त्या कॉन्फरन्सच्या अध्यक्षांचें नांव असल्यानें सभेला त्यांचें नांव दिलें' अशी झोकून दिली. अन् सहावें उत्तर याहूनही मजेदार आहे. हे चिरंजीव म्हणतात कीं ' लायब्ररींत गोल टेबलें ठेवतात. तेथें सर्व प्रकारचीं वर्तमानपत्रें पहावयास मिळतात.' "

वरील हकिकत सांगतांना शेटजी सारखे हंसत होते. व आम्हीहि त्यांत मोकळेपणानें भाग घेतला.

" आतां सांगा भाऊसाहेब " शेटजी पुढें म्हणाले " कीं देशांतील चालू घडामोडींचें इतकें सूक्ष्मज्ञान असणारीं रत्नें पुढें काय दिवे लावतील ? शितावरून भाताची परीक्षा होते. पुढील पिढीला हे वीर काय मागें ठेवणार ? ज्ञान देणार ! यांच्याजवळच कुठें आहे ? प्रत्येकाला वाटतें आपण श्रीमंत व्हावें. पण त्याकरितां लागणारी मेहेनत, प्रामाणिकपणा, सोशिकपणा किंवा परिस्थितीचें यथातथ्य ज्ञान यांच्याजवळ नाहीं. यांचा फक्त दैवावर भरंवसा. ' प्रामाणिकपणें कोणी श्रीमंत होत नाहीं.' हें तरुण पिढीचें ब्रीदवाक्य. असल्या परिस्थितींत माणशी अडीच आण्याचें रोजचें सरासरीचें उत्पन्न वाढेल कीं घटेल ? "

" आपण म्हणतां तें खरें आहे. खऱ्या ज्ञानी लोकांची ही विस्कटलेली घडी नीट बसविण्याचे प्रयत्न चालू आहेत. पण असे लोक थोडे आहेत. चोहोंकडे मतमतांतरींची बजबज माजली आहे. तथापि एवढें निश्चित कीं, या टाकाऊ ठरीव पुस्तकी शिक्षणक्रमापासून विशेष फायदा नाहीं हें तत्त्व बहुजनसमाजास पटत चाललें आहे. व उत्क्रांति ही केव्हांतरी होणारच."

थोडा वेळ अशाच इतर गप्पा झाल्यावर ते शिक्षणाधिकारी निघून गेले. आमच्या व्यवहाराबद्दल यानंतर सुमारें दोनतीन तास बोलणें झालें. एकमेकांच्या दिलजमाईनें आमची कंपनी सुरू करण्याचें ठरलें.

योग्यरीतीनें सर्व करारमदार झाल्यावर कांहीं दिवसांनीं आमची कंपनी क्रॉफर्ड

मार्केटाजवळ आम्ही सुरू केली. गेल्या दोन तीन वर्षांत मिळविलेला अनुभव, पाडलेली वळणें व बांधलेले अडाखे आम्हांला फार उपयुक्त झाले. निरनिराळ्या शेतकरीसमाजांत प्रत्यक्ष कॅन्व्हासिंग करणें आमचें सुरूच असल्यानें त्याचा विशेष फायदा झाला.

५—

दोन वर्षांनंतरची गोष्ट. स्थापना झाल्यापासून कंपनीची सारखी भरभराट होत गेली. सध्यां आमचे कंपनींत वीस पंचवीस इसम काम करीत आहेत, व शें. दीडशें सुशिक्षित बेकारांस आम्ही खंडानें जमिनी लागवड करण्यास मिळवून दिल्या आहेत. कंपनी अत्यंत जोमानें, व सचोटीनें व्यवहार करीत असल्यानें बहुजनसमाजाचा तिनें विश्वास संपादन केला आहे. निरनिराळ्या जिल्ह्यांत आम्हांस शाखा उघडावयाच्या आहेत, पण तें मनुष्यबळ व द्रव्यबळ यांजवर अवलंबून आहे. मात्र कोणताही कष्ट करण्याची तयारी असलेला बेकार आम्ही विन्मुख पाठवीत नाहीं. त्याला कांहींना कांहीं काम देण्यांत येतें किंवा मिळवून देण्यांत येतें.

बऱ्याच धनिक लोकांनीं आमच्या कंपनीचे शेअर्स विकत घेतले आहेत. यामुळें हळुं हळुं परदेशांशीं वळणें बांधण्याची व वेळप्रसंगीं परदेशी मालाशीं टक्कर देण्याची आमची तयारी होत आहे.

आमचें सर्व बिऱ्हाड आतां मुंबईलाच आहे. सोयऱ्यांपासून दोन पावलें दूर असा समाजाचा व्यवहार सांगतो. मी या व्यवहाराला धाब्यावर बसवून देखील सुखांत आहे.

भारतमातेनें तिच्या लेकरांची तरतूद करून ठेवली आहे. पण त्यांनाच अवदसा आठवते त्याला कोण काय करणार? आमचें उदाहरण डोळ्यासमोर असतांना, लागेल ती मदत आम्ही करण्यास तयार असतांना व शोचनीय अवस्थेची कमाल झाली असतांना देखील बेकारांची 'पोझिशन' (?) अजून कमी होत नाहीं, त्याला तरी कोण काय करणार!!



# पताकास्थान.

लेखकः—श्रीयुत भास्कर रामचंद्र भागवत.

बुटाचे पाय बाहेर वाजल्याबरोबर मन्दाकिनी झोपाळ्यावरून उठली. आणि शंकरराव आंत येतांच तिनें अतिशय उत्सुकतेनें त्यांच्या चेहऱ्याकडे पाहिलें. जणूं काय तिनें पूर्वीपासूनच पतिराजांस कांहीं प्रश्न विचारून ठेवलेला असून आतां फक्त त्यांच्या उत्तराचीच अपेक्षा होती असें तिच्या त्या मुद्रेवरून दिसलें. पण शंकररावांनीं मुद्दामच तिकडे दुर्लक्ष्य केल्यासारखें दाखविलें आणि आपल्या खोलींत जाऊन ते पोषाख उतरूं लागले. मन्दाकिनी अजून तिथेंच उभी होती. तिच्याकडे पाहून त्यांनीं हंसून म्हटलें, “ कां बुवा, आज आम्हांला चहा द्यायचा नाहीं वाटतं ? घशाला तर कोरड पडली आहे अगदीं ! ”

“ तर तर ! काय उन्हाचा कडाका पडला आहे अगदीं ! तरी बरं अजून चैत्र सुरूं व्हायलाहि आठ दिवस आहेत ! ”

“ म्हणून काय झालं ? ” शंकरराव म्हणाले. “ हें ऊन काय थोडं आहे ? अन् कोणताहि महिना असला तरी चहाची वेळ झाली म्हणजे घशाला कोरड पडतेच ! ”

“ हात्तिच्या ! मग चहा करतेंच कीं मी आतां. पण गडे, मला सांगितलं नाहीं काय तें—”

" काय सांगायचं ? "

" उगीच कशाला वेड घेऊन पेडगांवला जायचं तें—" मन्दाकिनी मान वेळून म्हणाली. "आपणच म्हणायचं होतं ना सकाळीं कीं आज बदलीचं कळायचा फार फार संभव आहे म्हणून—"

" होय. सरकारी ऑफिसरांची बदली व्हायची असली म्हणजे तें आजच कळतं बहुतकरून. कारण आज गुरुवार. गॅझेटचा दिवस ना! बदली, नेमणूक अन् बडतर्फीचे हुकूम आजच दत्त म्हणून उभे राहतात ! " शंकरराव नोकरशाहीची फिलॉसॉफी सांगूं लागले.

" मग आलं कां गॅझेट ? "

" वा हें काय विचारतेस ? एक वेळ मराठी मासिकंसुद्धां वेळेवर हातांत न पडतील, पण सरकारी गॅझेट गुरुवारीं आम्हांला मिळाल्यावांचून राहात नाहीं ! सकाळीं ऑफिसांत गेलों तेव्हांच टेबलावर गॅझेट तयार होतं ! "

आपली उत्कंठा पतिराज मुद्दाम वाढवीत आहेत हें मन्दाकिनीच्या तेव्हांच लक्ष्यांत आलें. पण आपला राग आवरून तिनें विचारलें, " मग काय होतं त्यांत?"

" काय असायचंय ! " शंकरराव सदरा घालीत म्हणाले " फॉरेस्ट खात्याच्या लिलांवाच्या जाहिराती होत्या एक दोन—"

"तो लिलांव जाऊं दे चुलींत—"मन्दाकिनी चिडून म्हणाली.

" होय. सर्पणाचा लिलांव तेव्हां चुलींतच जायचा तो. "

"आणखी काय होतं गॅझेटांत?" पतीच्या विनोदाकडे दुर्लक्ष्य करून मन्दाकिनीनें विचारलें.

" आणखीन् बरीच महत्त्वाची बातमी होती. " शंकरराव शांतपणें सांगूं लागले. त्यांची पत्नी जिवाचे कान करून ऐकूं लागली.

" फारच मोठी बातमी म्हणजे गव्हर्नरसाहेब पुढल्या महिन्यांत पेन्शन घेणार आहेत. "

"गव्हर्नर पेन्शन् घेऊं दे नाहीं तर मॅन्शन् घेऊं दे ! आपल्याला काय त्याचं!"

" अगदीं आधुनिक तरुणीचा कोप आहे हा ! " शंकरराव हंसून म्हणाले, " जुन्या चालीच्या स्त्रीनें रागाच्या भरांत बिचाऱ्याला मॅन्शन् ऐवजीं मसणच बहाल केलें असतें ! "

पतीकडे रागानें पहात मन्दाकिनी म्हणाली, " ठीक आहे. आपल्याला नसलं सांगायचं तर नका सांगूं. मला मेलीला काय, जिकडे बदली होईल तिकडे मी येतेंच आहे शेपटासारखी ! " असें म्हणून ती पाय आपटीत स्वयंपाकघरांत निघून गेली. शंकरराव तिच्याकडे सकौतुक दृष्टीनें पहात राहिले.

थोड्या वेळानें आंतून वर्दी आली; " चहा झालाय्. पाहिजे असला तर यावं घरांत ! "

शंकरराव आंत गेले आणि पाटावर बसले. त्यांच्या जगदंबेनें दणादिशीं चहाचा कप त्यांच्यापुढें आदळला.

" इतकं रागवायला काय झालं पण ! " शंकरराव तिच्याकडे प्रेमानें पहात म्हणाले. " अग, मी काय सांगणार नव्हतों कां तुला ? पण असं आहे तुझ्या हातचा चहा मिळाल्याशिवाय तोंडांतून शब्दच फुटत नाहीं बघ ! "

पतिराजांच्या मखलाशीमुळें मन्दाकिनीचा राग बराच मंदावला. मात्र त्यांच्या शब्दांचें तिला हंसूं आलें. " शब्द फुटत नाहीं म्हणे. तरी बरंय् मघापासून वायफळ बटवट चालली आहे. "

शंकरराव चहाचा घोट घेऊन म्हणाले, "ललना मना नच बिलकुल थट्टा—"

" गाणं पुरं झालं तरी मी पुन्हां विचारणार नाहीं हो बदलीबद्दल ! " मन्दाकिनी बळेंच म्हणाली.

" तुझ्या असल्या कावेबाज बोलण्यानें मी सांगणार आहे असं थोडंच आहे. बाकी सांगायला बातमी तरी होती कुठें—"

" म्हणजे कांहींच नव्हतं वाटतं गॅझेटांत ? "

शंकरराव छद्मीपणानें हंसले. मन्दाकिनी खजील होऊन म्हणाली." बरं बाई हरलें मी ! कबूल करतें. "

" बातमी म्हणजे अशी—" शंकरराव गंभीरपणानें सांगूं लागले. " आजच्या गॅझेटांत अस्मादिकांच्या बदलीबद्दल कांहींच हुकूम नसल्यामुळें आणखी दोनतीन महिने तरी आपला मुक्काम इथेंच ! "

या बातमीनें मन्दाकिनीला अतिशय आनंद झालेला दिसला. लहान बालकाप्रमाणें टाळ्या पिटून ती म्हणाली. " बरं झालं बाई ! आतां हें लीलेला कधीं जाऊन सांगेन असं मला झालं आहे ! "

आणि मन्दाकिनीला इतका आनंद होणें अगदीं साहजिक होतें. लीलावती-वर तिचें इतकं प्रेम होतें कीं, गांवांतले सगळे लोक म्हणत इतक्या विलक्षण जीवश्चकंठश्च मैत्रिणी आपण कधींच पाहिल्या नाहींत. शंकररावांचा आणि गार्डन सुपरिंटेंडेंट भास्कररावांचा स्नेह देखील अगदीं कॉलेजमध्यें असेपासूनचा. त्यामुळें या दोन नवपरिणित दांपत्यांमध्यें गाढ घरोब्याचें प्रेम उत्पन्न झालें होतें यांत नवंल नाहीं. आठवड्यांतून एकवेळ आळीपाळीनें एका दुकलीनें दुसरीकडे जेवायला जायचें असा मुळीं त्यांचा Convention च पडून गेला होता. आणि चहा तर एक दिवसाआड एकत्र होईच. मन्दाकिनीचें तर लीलावतीवर इतकें प्रेमहोतें कीं, शंकरराव पुष्कळदां कृत्रिम मात्सर्यानें म्हणत, " हें पहा ! इतकं कांहीं तूं लीलावहिनीला लाडावून ठेवूं नकोस ! तुझा भावजी आहेच तिच्यावर प्रेम करायला. तूं आपली।आमच्यावर कर ! "

इतकें तिचें आपल्या मैत्रिणीवर प्रेम असल्यामुळें शंकररावांची बदली लवकरच होणार अशी दाट वदंता जेव्हां मन्दाकिनीनें त्यांच्याच तोंडून ऐकली तेव्हां तिला एकदम धस्स झालें. आपल्या मैत्रिणीच्या भावी वियोगाची कल्पना तिला असह्य झाली; आणि ही बातमी खोटी ठरावी असें ती रोज देवाजवळ मागूं लागली.

अर्थातच देवानें आपलें मागणें ऐकलें हें पाहून तिला कल्पनातीत आनंद झाला यांत नवल नाहीं. मन्दाकिनीचा तो प्रेममूलक हर्ष पाहून तिच्या पतीलाही साभिमान कौतुक वाटलें. तिच्याकडे हंसत पाहून ते म्हणाले, " वेडीच आहेस. लहान बाळासारख्या टाळ्या काय पिटतेस ? नाचायचंच तेवढं शिल्लक ठेवलं आहेस ! "

" असूं दे मी आपली बाळ ! मी आपली टाळ्याच पिटते. पण नाचतां येत नाहीं हो मला.तांडव करायचं हें आपलं काम!"

" माझी चेष्टा करतेस ? " कृत्रिम कोपानें शंकरराव म्हणाले, " देवि भवानि, हिला डोक्यावर बसवून ठेवल्याचं हेंच कां फळ ? "

मन्दाकिनीनें झालेल्या आनंदामुळें आपलें काम झराझर उरकेलें आणि ती ललिावतीकडे जाण्यासाठीं लुगडें बदलूं लागली.

शंकररावांनासुद्धां ट्रॅन्स्फर हुकूम न आल्यामुळें आनंद झालाच होता. पण पुरुषवृत्तीला अनुसरून त्यांनीं त्याचें विशेष प्रदर्शन केलें नाहीं. आरामखुर्चीवर बसून ते केसरी वाचूं लागले.

" आपल्याला कांहींच कसं वाटलं नाहीं या बातमीनें ? "मन्दाकिनी म्हणाली.

" आतां काय आणखी वाटायचंय ! " शंकरराव केसरी उलटीत म्हणाले, " झाला ! खूप आनंद झाला. अन् इतका वेळ झालं तर खरं नाचून अन् टाळ्या पिटून ! "

" टाळ्या मी पिटल्या, आपण कुठें ? "

" वा ! तुम्ही आमचें सर्वस्व ! तुम्हीं टाळ्या पिटल्यावर आम्हीं कशाला पिटायला पाहिजेत ? माझा आनंद थोडाका होता ? तुझा आनंद पाहून माझी ब्रह्मानंदीं टाळी लागली होती ! "

" मग लवकरच समाधि उतरली म्हणायची ! "

" त्याचं कारण असं आहेः—अति आनंद केव्हांही वाईट, या विचारानं मला भानावर आणलं.—फार आनंदाची बातमी कधीं कधीं खोटी ठरते. "

इतक्यांत बाहेर सायकलची घंटा वाजली. कोण आलें म्हणून पहाण्यासाठीं शंकरराव उठले. तारवाल्याची तांबडी सायकल पाहून त्यांना धस्स झालें. तारा नेहमीं अत्यानंदाच्या तरी असतात अगर अति दुःखाच्या तरी असतात. पण तार म्हटलें कीं, पहिल्यानें धडकीच भरते.

विशेषतः पाकिटावरचीं O. H. M. S. हीं अक्षरें पाहून शंकररावांना जास्तीच काळजी वाटूं लागली. एरवीं खासगी ऐवजीं सरकारी तार पाहून त्यांच्या उरांतली धडकी थांबली असती. या वेळेस ती दुप्पट वेगानें सुरू झाली.

कागदावर सही करून देऊन त्यांनीं तारवाल्याची रवानगी केली. आणि जडहृदयानें लिफाफा फोडून ते आंतील मजकूर वाचूं लागले. तारेंत एकच ओळ होती. पण तिनें त्यांच्या पूर्वीच्या सर्व आनंदावर विरजण पडलें.

तार आलेली पाहून दरवाजाशीं आलेल्या मन्दाकिनीनें चिंतातुर स्वरानें विचारलें, " कुठून आली अहोतार ?."

पण शंकररावांचें तिच्या प्रश्नाकडे लक्ष्य नव्हतें. अतिशय खिन्न होऊन ते स्तब्ध उभे होते.

मन्दाकिनीनें पुन्हां विचारलें, " असं काय करायचं तें ? बातमी तरी काय ?"

शंकररावांनीं वर पाहून म्हटलें, " सरकारी तार आहे—

Transferred Firangabad, Sind. Leave Monday. "

वरील बातमी ऐकून मन्दाकिनीच्या हृदयावर वज्राघातच झाला. इतका वेळ हर्षानें फुगून जाऊन उड्या मारल्या आणि शेवटीं हेंच नशिबांत होतें असें वाटून तिला खेद झाला. शिवाय पतीनें काढलेल्या अपशकुनी उद्गारानंतर लगेच वाईट बातमीची तार यावी हा तरी किती चमत्कारिक योगायोग असेंहि तिला वाटून ती आतिशय खिन्न झाली.

बराच वेळ कोणीच कांहीं बोललें नाहीं. नंतर पतीकडे पहात ती विमनस्कपणें म्हणाली, "कुठेंशी आहे हें फिरंगाबाद?"

" सिंधमध्यें म्हणून लिहिलं आहे ना तारेंत ? " शंकरराव म्हणाले. " बाकी तें शहरसुद्धां मोठं नाहीं कराचीसारखं. साधारण खेड्यांतच जमा होईल. "

पुन्हां दोघेंहि बराच वेळ गप्प राहिलीं. नंतर एक उसासा टाकून शंकरराव आंत आले. आणि त्यांनीं कोटटोपी घातली.

" कुठं जायचं तें ? "

शंकरराव खिन्नपणें हंसून म्हणाले, " भास्कररावांकडे जायचं आहे ना बातमी द्यायला ? "

" हं ! "

घराचें दार लावून मन्दाकिनी कुलूप लावीत होती, तेव्हां शंकरराव तिच्याजवळ येऊन तिच्या कानांत म्हणाले, " मन्दे, या प्रसंगाला संस्कृत नाटकांत काय नांव आहे, माहीत आहे ? "

" काय ? "

" पताकास्थान ! "

२—

पण त्यांना त्या दिवशीं भास्करराव आणि लीलावती भेटलीं नाहींत. त्यांच्या दरवाजाला कुलूप होतें. फिरायला गेलीं म्हणावें तर चौघांचा बरोबरच फिरण्याचा नेम असे. कदाचित् दुसऱ्या कोणाकडे गेलीं असतील अशा समजुतीनें शंकरराव आणि मन्दाकिनी परत फिरणार होतीं, इतक्यांत त्या घराचा माळी हातांत झारी घेऊन आला. शंकररावांनीं लगेच विचारलें, " कायरे माळी, भास्करराव कुठें गेले ? "

" गांवाला गेल्याती साहेब ! "

" गांवाला ? " आपल्या कानांवर विश्वास न बसून शंकररावांनीं पुन्हां विचारलें.

" जी साहेब. कालच गेल्याती. अन् त्यांनीं निरोपबी सांगितलाय् ! "

" काय तो ? "

" कांहीं घराबिराची भानगड निघालीय् ती बघायला गेलेत्. "

" अस्सं ! " शंकरराव मन्दाकिनीकडे पाहून म्हणाले, "पण या गृहस्थाला सांगून जायला काय झालं होतं ? अन् पुन्हां बायकोलाही घेऊन गेला. "

" तेंच म्हणतें मी ! लीलावती माझ्याजवळ राहिली असती तर काय बिघडलं असतं ? "

शंकररावांनीं माळ्याला पुन्हां विचारलें, " परत कधीं येणार तें तरी सांगितलं आहे कां रे ? "

" नक्की नाहीं. पण आठएक दिवस लागतील म्हंगले ! "

आठ दिवस ! गुड् गॉड् ! आणि शंकररावांना सोमवारीं म्हणजे चार दिवसांनीं निघायला पाहिजे होतें ! अर्थात् प्रिय मित्राची ' शेवटची ' भेट घेणें त्यांना शक्य नव्हतें. खिन्न अंतःकरणानें दोघेंही परत आलीं.

ठरल्याप्रमाणें सोमवारीं शंकरराव फिरंगाबादला जाण्यास निघाले. ते प्रथमतः पत्नीला नेणार नव्हते. पण मन्दाकिनीनें हट्टच धरला, " मी येणारच ! तुम्ही एकटे जाऊन तरी त्या परदेशांत जिवाचे हालच करणार कीं नाहीं ? शिवाय आतां लीला अन् भावजी पण इथें नाहींत. मला बिलकुल करमायचं नाहीं इथें."

" मग माहेरीं जाऊन राहा. " शंकरराव म्हणाले.

" परवां तर जाऊन आले घरीं ! " मन्दाकिनी म्हणाली. " शिवाय आपण तिकडे एकटे राहणार, अन् आज नाहीं उद्यां मला यायचंच आहे तिकडे ! "

' आपलें ' असें जवळ कोणी नसतां त्या परदेशांत राहाणें आपल्या पतीस किती जड वाटेल याची मन्दाकिनीला पूर्ण कल्पना होती. आणि ती आली तर शंकररावांना हवीच होती. अखेरीस तिच्याच म्हणण्याप्रमाणें करण्याचें ठरलें. प्रथम दोघांनीं जाऊन फिरंगाबादेस एकाद्या हॉटेलांत उतरावें व नंतर घर वगैरे शोधून मग एकाद्या स्नेह्यामार्फत सामान मागवावें असें त्यांनीं निश्चित केलें.

सोमवारच्या गाडीनें एका सेकंडक्लासच्या डब्यांतून हें जोडपें सिंधप्रांतांत रवाना झालें.

३—

महाराष्ट्र सोडून या रुक्ष प्रांतांत आल्यावर पाहिल्यांदा आमचे शंकरराव आणि मन्दाकिनीबाई यांना अगदीं कसेंसें झालें. अगदीं झाड नाहीं, झुडूप नाहीं अशा रेताड जागेंतून जेव्हां गाडी जाऊं लागली तेव्हां शंकररावांच्या काव्यदृष्टीला तो देखावा बघवेना आणि मन्दाकिनीलाही या ओसाड देशांत प्रिय मैत्रिणीशिवाय दिवस कसे काढायचे हा प्रश्न भेडसावूं लागला. दुपारीं शंकरराव ऑफिसांत गेले म्हणजे घर कसें खायला येईल असें तिला वाटलें.

पण कराची जवळ आली तेव्हां जरा झाडें वगैरे बरींच दिसूं लागलीं. कराचीस गाडी बदलून ही दुक्कल एका लहान ट्रेनमध्यें बसली व सुमारें दोन तासांनीं फिरंगाबादेस येऊन पोंचली. सुदैवानें हा प्रदेश जरा तरी बरा होता. झाडें वगैरे पुष्कळच असून लहान लहान शेतेंही होतीं. वारा थंड वहात होता. शंकररावांना नंतर कळलें कीं फिरंगाबाद हें एक हिलस्टेशन आहे. अर्थात् त्यांना दुःखांत जरासें सुख वाटलें.

फिरंगाबाद स्टेशन लहानसें व सुबक बांधलेलें होतें. स्टेशन येतांच चहा गरम वगैरे आरडाओरड सुरूं झाली. शंकररावांनीं पटकन् दार उघडून मन्दाकिनीला उतरण्यास सांगितलें. व आपण सामान उतरूं लागले.

हमाल सामान बाहेर नेत असतां त्यांनीं त्यालाच हिंदुस्तानींत विचारलें, " कायरे, इकडे एकादें हॉटेल आहे कां चांगलंसं ? "

" जी साहेब. वृन्दानी हॉटेल आहे एक. अन् तिकडे सगळी रसोई शाकेचीच असते. "

आपण ब्राह्मण आहों हें त्या हमालानें ओळखलेलें पाहून त्यांना बरेंच आश्चर्य वाटलें. त्याच्या हातावर पैसे ठेवून शंकररावांनीं त्याच्याकडून एक घोडागाडी ठरवली आणि वृंदानी हॉटेलकडे घेण्यास सांगितलें.

दाक्षिणी लोक या प्रांतांत सहसा येत नसल्यामुळें आसपासचे लोक आमच्या दांपत्याकडे कुतूहलानें पाहूं लागले. विशेषतः मन्दाकिनीचें नेसणें पाहून लोकांना बरीच गंमत वाटली. त्यांच्या त्या टक लावून पहाण्यानें तिलाही अगदीं लाजल्यासारखें झालें.

टांग्यांतून जातांना पतिपत्नींनीं आसपास पाहण्यास सुरुवात केली. फिरंगाबाद

हिलस्टेशन असल्यामुळें सिंधप्रांताचें रुक्षत्व इकडे विशेष प्रमाणांत दिसून येत नव्हतें. उलट रस्त्याच्या बाजूस लावलेले उंच छायेचे वृक्ष आणि मधून मधून उठविलेल्या बागा यामुळें नेत्रांस आल्हादच वाटत होता.

टांगेवाल्याकडे वळून शंकररावांनीं विचारलें, " कायरे इकडे आमच्यासारखे दक्षिणी लोक कितीसे आहेत ? "

" आहेत साहेब दोनतीन कुटुंब. "

" तुला माहीत आहेत कां त्यांचीं घरं ? "

" एकाचं घर आहे माहीत साहेब. कारण नुकतंच मीं त्यांना स्टेशनवरून नेलं होतं. "

" ठीक आहे. आतां आमचं चहापाणी होऊन हॉटेलांत थोडी विश्रांति घेऊन झाली कीं असा संध्याळचा ये टांगा घेऊन. अन् त्या घरीं ने आम्हांला. "

" जी साहेब. "

पत्नीकडे वळून शंकररावांनीं खुलासा केला, " आतां इथेंच राहायचं आहे तेव्हां ओळख करून घेतलेली बरी, नाहीं कां ? "

मन्दाकिनी कांहींच बोलली नाहीं. लवकरच वृंदानी हॉटेल आलें. मॅनेजर फार सभ्य दिसला. त्यानें ताबडतोब बाहेर येऊन नोकरांकडून सामान आंत नेवाविलें, आणि या परदेशस्थ पाहुण्यांची उत्तम सोय लावून दिली.

## ४—

हातपाय स्वच्छ धुवून या प्रवाशांनीं मॅनेजरनें पाठविलेल्या चहाफराळावर चांगला हात मारला आणि नंतर प्रवासानें आलेला थकवा घालविण्यासाठीं चांगली तण्णावून दिली.

पांच वाजण्याचे सुमारास एका पोऱ्यानें येऊन शंकररावांस सांगितलें, " साहेब, बाहेर टांगा आला आहे. "

शंकरराव कोट चढवीत म्हणाले, " चला मन्दाबाई, आपल्या मुलुखवाल्यांच्या घरीं येतां ना ? "

" चलावं ! पण मला बाई कसंसंच वाटतं, ओळखदेख नाहीं अशा लोकांच्या घरीं जायचं म्हणजे ! "

" ओळख केल्याशिवाय होईल कशी ? "

मुलूखवाल्यांचें घर बरेंच दूर होतें. रस्ता मात्र अगदीं उत्तम बांधलेला असून रहदारी थोडीच होती. मधूनच भरदिशीं जाणारी एकादी मोटार आणि फिरायला आलेले कांहीं लोक, एवढीच वर्दळ.

शंकरराव पत्नीला म्हणाले, " वस्ती वगैरे विशेष दिसत नाहीं. "

" आपणच म्हणायचं होतं ना अगदीं खेडं आहे म्हणून. त्या मानानें गांव चांगलं दिसतं आहे. "

शंकरराव हंसून म्हणाले, "आतां आवडायला लागलं कां ? "

मन्दाकिनी कांहींच बोलली नाहीं. रस्त्याच्या कडेला रंगीबेरंगी फुलझाडांनीं शोभणाऱ्या एका सुंदर आणि प्रशस्त बगिच्याकडे तिचें लक्ष्य गेलें होतें. आणि ती चित्ताकर्षक शोभा पाहून तिला अतिशय आनंद वाटत होता. ती शोभिवंत बाग पाहून शंकररावांच्या मनांत मात्र कांहीं निराळेच विचार आल्यामुळें त्यांची मुद्रा खिन्न दिसत होती.

इतक्यांत टांगा त्या बागेंतूनच जाणाऱ्या एका रुंद रस्त्यावरून वळला. तें पाहून मन्दाकिनी आश्चर्यानें म्हणाली, "अय्या, इकडे कुठें चालली गाडी ? "

टांगेवाल्यानें उत्तर केलें, "इकडूनच वाट आहे बाईसाहेब."

सार्वजनिक बाग असल्यामुळें जवळची वाट म्हणून कदाचित् इकडून टांगा घेतला असेल अशी त्यांनीं आपली समजूत करून घेतली. फुलांची शोभा पहात पहात पहात ही दुक्कल बागेच्या बाहेरसुद्धां जाऊन पोंचली, आणि लगेच एका साधारण मोठ्या बंगल्यापुढें टांगा उभा राहिला.

शंकरराव खालीं उतरले; व म्हणाले " थांब. मी आधीं चौकशी करून येतों."

" चलावं. मी पण येतें. "

बंगल्याच्या पायऱ्या चढून दोघेंही व्हरांड्यांत गेलीं. दरवाज्यावर एक निळा पडदा सोडलेला होता. आतां हांक कशी मारावी या विचारांत शंकरराव असतां एक सिंधी नोकर बाहेर आला. त्याला शंकररावांनीं हिन्दुस्तानींत विचारलें.

" साहेब आहेत कां रे ? "

त्यांच्याकडे आपादमस्तक पाहून गडी म्हणाला, " आहेत. बसा आपण हॉलमध्यें."

दोघांनीं दिवाणखान्यांत शिरून त्यानें दाखविलेल्या खुर्च्यांवर आसन ठोकलें. गडी आंत निघून गेला.

"काय ग मन्दे!" शंकरराव हळूच म्हणाले, " आपण ही थोडीशी आगांतुकीच केली आहे, नाहीं?"

" नाहीं तर काय?" मन्दाकिनी लगेच म्हणाली. तिलासुद्धां माझा 'कठिण' प्रसंग वाटत होता!

दिवाणखान्यांत फर्निचर मुळींच नव्हतें म्हटलें तरी चालेल. एका उघड्या-बोडक्या वाटोळ्या टेबलाकडे पाहून शंकरराव म्हणाले, "शिवाय आपण असे आलेले या लोकांना आवडेल कीं नाहीं कुणास ठाऊक. सगळेच लोक सारखे नसतात!"

" खरेंच." मन्दाकिनी म्हणाली, " हीं माणसं कितीही चांगलीं असलीं तरी आमच्या लीलावतीसारखीं—"

इतक्यांत दिवाणखान्याचा पडदा दूर सारून एक तरुणी आंत आली. तिला पाहिल्याबरोबर " कोण लीलावती!" आणि " वहिनी!" असे आश्चर्योद्गार आमच्या या प्रवासी दांपत्याच्या तोंडून बाहेर पडले. लीलावतीला तेथें पाहून त्यांना जें आश्चर्य वाटलें तें वर्णन करून सांगणें अशक्य आहे. अगदीं भांबावून जाऊन दोघेंही पाहूं लागलीं.

लीलावती हंसत हंसत म्हणाली, " कां? अगदीं नाटकांतल्यासारखी एंट्री केली कीं नाहीं?"

एकादा पुतळा बोलावा त्याप्रमाणें शंकरराव बोलून गेले, " पताकास्थान! —पण वहिनी, हा काय घोटाळा आहे?"

तिच्या मागून आलेले भास्करराव म्हणाले, " घोटाळा लावला दिडकीला पावशेर! खमंगवाला—गरमवाला—लीले, आतां कांदेपोहे असे मसालेदार करशील कीं नाहीं!"

शंकरराव आणि मन्दाकिनी आकृतवक्त्र पाहूं लागलीं. " तुम्ही कांहीं कट तर नाहीं केलेला?"

"कट नाहीं न् बीट नाहीं!" भास्करराव म्हणाले, "तुमचा टांगा येतांना पाहिला अन् आम्ही आंत लपून बसलों.

नेपथ्ये सूत्रधारः—"

" तें सर्व ठीक आहे!" मन्दाकिनी म्हणाली." पण सूत्रधार अन् नटी सिंधमध्यें कधीं आलीं?"

" तुमच्या आधीं दोन दिवस!" लीलावती म्हणाली, ' अगदीं एकाएकीं निघून यावं लागल्यामुळें तुम्हांला कळवलं नाहीं!"

" म्हणे कळवलं नाहीं!" मन्दाकिनी वेडावून म्हणाली.

" पण आलांतच कशाला इथें?"

" वा! म्हणे आलांतच कशाला? सरकार ठेवील तिथें राहाणें भाग आहे." भास्करराव हंसून म्हणाले. " तुम्हांला अधिक गोंधळांत ठेवीत नाहीं आतां! गेल्या सोमवारीं कमिशनरसाहेब आपल्या गांवाला आले होते हें ठाऊक आहे ना?"

" ठाऊक आहे तर!" शंकरराव म्हणाले. " त्यांची न् तुझ्या वडलांची खूप ओळख. तेव्हां तुला साहेबांना एक खाना द्यावा लागला तेंही आठवतं आहे!"

" झालं तर अन् त्या ' खान्या 'च्या वेळीं साहेबांनीं खासगी रीतीनें सांगून टाकलें कीं, फिरंगाबादेस शंकररावांची बदली नक्की होणार! अगदीं उशीरां ठरल्या-मुळें कदाचित् गॅझेटांत नाहीं छापून येणार, पण आयत्या वेळेस तार येईल!—मी तुला ही बातमी सांगायला येणार होतों पण संध्याकाळीं मलाच तार आली कीं, " Transferred Firangabad. Leave Immediately."

" काय बाई विलक्षण योगायोग!" मन्दाकिनी उद्गारली.

" खरोखरीच विलक्षण! पण असं झालं खरं. आणि त्यामुळें अर्थात् आमचा आनंद गगनांत मावेना."

लीलावती पुढें म्हणाली, " अन् मित्रवियोगाचं संकट चुकल्याबरोबर इकडे थट्टा सुचूं लागली. मी नको म्हटलं तरी म्हणे आपण त्यांना मागमूस न लागूं देतां पळून जाऊं. जातात कुठें! येतीलच मागोमाग चार दिवसांनीं."

मन्दाकिनी कृत्रिम कोपानें म्हणाली, " अन् मी गेलें असतें माहेरीं म्हणजे ! "

लीलावती हंसून म्हणाली, " मन्दे, मला माहीत कां नाहीं भावजींना सोडून तूं किती दिवस घरीं राहशील तें ! "

भास्करराव म्हणाले, " शिवाय मला तावडतोब निघणें भाग असल्यामुळें आपल्याला बरोबर निघतां आलंच नसतं ! मग म्हटलें थोडी थट्टा कां करा ना ? "

कोडें उलगडलें आणि आश्चर्य ओसरलें. आतां आनंदच तेवढा उरला. आणि तो एवढा होता कीं, बंगल्यांत मावेना, एवढया मोठया बागेंत मावेना, सिंधांतही मावेना. त्याचे धागेदोरे थेट आवडत्या महाराष्ट्रापर्यंत जाऊन पोंचले.

लीलावतीच्या हातचा चहा पीत व पोहे खात हीं दोन प्रेमळ जोडपीं आपल्या घरांबद्दल, इष्टमित्रांबद्दल आणि मुंबईपुण्याबद्दल गप्पा मारूं लागलीं !

चहाचा पेला तोंडाला लावीत शंकरराव म्हणाले, " अच्छा, भास्कर ! आपण सगळे देवाच्या कृपेनें आणि वरिष्ठ सरकारच्या मेहेरबानीनें परत एकत्र जमलों हें फारच चांगलं झालं. आतां घर, सामान वगैरेच्या व्यवस्थेस लागलं पाहिजे. मी माझं सामान आणलेलं नाहीं. मागून येणार आहे.

" आमचंही मागून येणार आहे ! " लीलावती म्हणाली.

शंकरराव पुढें म्हणाले, " आतां प्रश्न घरासंबंधी आहे ! "

" त्याची नको काळजी तुला. " पत्नीकडे पहात हंसून भास्करराव म्हणाले, " तुझ्यासाठीं मी अन् तुझ्या वहिनींनीं एक छोटी बंगली पाहून ठेवली आहे. तुझ्या पसंतीचाच प्रश्न आहे. "

" आमची काय पसंती ! " मन्दाकिनी मध्येंच म्हणाली. " बंगला–बगिचा याच्यावरची ऑथॉरिटी तुम्ही ! तुम्ही तर बागबहाद्दूर ! "

शंकरराव हंसून म्हणाले, " परवांच्या वर्षप्रतिपदेनिमित्त तुला हें पदवीदान आहे बरं कां भास्कर ? "

" आनंद आहे ! " भास्करराव बोलले. " आतां आपण फिरत फिरत त्या बंगलीकडेच चलावें अशी या बहाद्दराची विनंति आहे ! "

५—

भास्कररावांसारख्या रसिकवर्यानें पाहून ठेवलेली बंगली सुरेख होती असें म्हणणें म्हणजे जरा धाडसाचेंच होईल. बंगलीभोंवतीं लहानशी बागही होती. आणि एकंदरींत जागा ढुमदार होती.

नंतर दोन दिवसांनीं गुढीपाडव्याच्या मुहूर्तावर त्या बंगलीच्या मालकांनीं एक पार्टी दिली. फक्त एक स्त्री व एक पुरुष 'पाहुणे' होते. बागेंत एक बांबु रोवून त्यावर सुंदर गुढीतोरण उभारलें होतें आणि वर बंगलीच्या नांवाची पाटी लटकत होती.

"पताकास्थान."



# आत्मविश्वास.

( लेखक—**विनीत** )

'सांउडी, बेल अँड कंपनीच्या फॉरिन् डिपार्टमेंटचे सेकंड क्लार्क श्री. नारायणराव कुळकर्णी यांनीं आज ऑफिसमध्यें प्रवेश करतांच त्यांचें सर्वत्रांकडून एका विशिष्ट तऱ्हेनें स्वागत करण्यांत आलें. त्यांचा जामानिमा व थाट पाहून बाहेरच्या बांकावर बसलेले दोघे पट्टेवाले तर दचकलेच, पण असें समजतें कीं, साहेबी पोषाखाशीं चिरपरिचित असलेल्या इमारतीच्या लिफ्टवाल्यानें त्यांस न ओळखून लवून सलाम केला. ऑफिसमधील कारकून बसल्याजागचे ' आ ' करून जे उठले ते पुनः बसावयाचें किंवा कांहीं बोलावयाचें विसरूनच गेले. व त्यांच्या या वर्तनाचें आश्चर्य करणारे इतर कित्येक कारकून यांनीं जेव्हां वळून नारायणरावाकडे पाहिलें तेव्हां त्यांचें पहिलें आश्चर्य कांहींच नव्हें अशा प्रकारचें नवीन आश्चर्य त्यांच्या चेहेऱ्यावर विलगूं लागलें. आणि त्या बिचाऱ्यांनीं तरी आश्चर्यचकित कां होऊं नये ? जो नारायणराव रोज ऑफिसमध्यें फाटक्या चपला, भोंगळभटी धोतर, चुरलेल्या इस्तरीचा शर्ट, व शेंकडा पन्नास टक्के तुटलेल्या बटनांनीं ' सुशोभित ' असलेला कोट,—अशा थाटांत प्रवेश करावयाचा, ज्याच्या रुमालाच्या कोक्यावर ऑफिसमधील विनो-

दपट्ट कारकुनांनीं गचकवनें करावयाची, तोंच नारायणराव बाटा कंपनीचे बूट, लॉरेन्स मेयो कंपनीच्या शोरूमला सुशोभित करणारी हॅट्, व अॅस्क्विथ अॅंड लॉर्ड कंपनीच्या शिंप्यांनाहि हेवा वाटेल अशा शिलाईचा सूट घालून, व बरोबर एक कोरी करकरीत 'अॅटेची केस' घेऊन आल्यावर ऑफिसमधील विनोद-सागराला ऑफिसच्या खिडक्यांमधून दिसणाऱ्या सागराप्रमाणें भरती कां येऊ नये? नारायणरावाच्या आगमनानें उत्पन्न झालेल्या आश्चर्यमूलक स्तब्धतेचा भंग करीत, त्यांचा जानी दोस्त डिसोझा पुढें आला व अर्धगंभीररीतीनें त्यानें नारायणरावांस लवून मुजरा केला. वसंतराव कामतनें डोळे मिचकावीत डिसो-झाला विचारलें 'साउंडीसाहिब रजेवर चालले कीं काय?' कामताचा प्रश्न रेग्यानें झेलला व उत्तर दिलें. 'यस्! नाऊ मिस्टर कुळकर्णी इज गोइंग टु अॅक्ट फॉर साउंडी.' स्वयंवर नाटकामध्यें श्रीकृष्ण झाला होता त्यापेक्षां निराळ्या अर्थानें 'एकला' नारायणराव 'नयनांला विषय झाला' होताच. आतां तर सीझरच्या मारेकऱ्यांनीं त्याचेभोंवतीं कडें केलें त्यासारखें कडें त्याच्या मित्रमंड-ळानें त्याचेभोंवतीं केलें. बहुतेकांनीं त्याचेशीं सहास्य हस्तांदोलन केलें व एका धीट मित्रानें तर त्याची हॅट काढून भिंतीला लटकावली.

नारायणराव कुळकर्णी यांची 'साउंडी, बेल अॅंड कंपनी'च्या ऑफिसमध्यें आठ वर्षें नोकरी झाली होती. नारायणरावाइतका हुषार, कष्टाळु व आज्ञा-धारक, वक्तशीर कारकून, साउंडी बेल कंपनीच्या इतिहासांत आतांपर्यंत झाला नव्हता व पुढें होईल कीं नाहीं याविषयीं कंपनीचे सीनिअर पार्टनर साउंडी व ज्युनिअर पार्टनर बेल हे साशंक होते. असें असतांहि नारायणरावाला अवघा सव्वाशेंच पगार कां व डिसोझा यास चारशें व कामत–रेगे यांस तीनतीनशें कां याबद्दल नारायणरावाच्या चाळींतील त्याचे जिवाभावाचे मित्र नेहमीं चर्चा करीत. नारायणरावास महत्त्वाकांक्षा नव्हती असें नाहीं; पण त्याचा स्वभाव अत्यंत भित्रा असे; इतका कीं, बेलसाहेबांचे पुढें जाऊन उभे राहतांना त्याची छाती नेहमीं धाडधाड वाजत असे. त्याची हुषारी, त्याचा कष्टाळुपणा, त्याची नेकी या गुणांस्तव बेलसाहेब मनांतून त्यास फार चहात. पण त्यांच्या विनोदास स्फुरण येण्यासारखें नारायणरावाचे पोषाखांत व वर्तनांत पुष्कळच असल्यामुळें ते त्याची टिंगल करूनच त्याचेविषयींचें आपलें कौतुक व्यक्त करीत. एकदोन वेळां इराक, ब्रह्मदेश येथें नारायणरावाला कंपनीच्या कामानिमित्त पाठवून

त्याला पुढें आणण्याचा त्यांनीं प्रयत्न केला; पण ज्या नारायणरावास रविवारच्या सुट्टीच्या दिवशीं सुशीलाबाईबरोबर हँगिंगगार्डनमध्यें आपण फिरावयास जाऊन आलों हीच मोठ्या धाडसाची गोष्ट केली असें वाटावयाचें तो वीरपुरुष इराकला कसला जातो व ब्रह्मदेशांतलें ब्रह्म कसचें पाहतो ? शांत, निरुपद्रवी, एकमार्गी, अबोल्या, भित्र्या नारायणरावांची नोकरीमध्यें गोगलगाईच्या वेगानें प्रगति होत असलेली पाहून सौ० सुशीलाबाईस चैन पडत नसे; विशेषेंकरून चैत्रांतील हळदीकुंकवाचे प्रसंगीं व इतर निमित्तानें रेगे-कामत यांच्या दागिन्यांनीं शृंगारलेल्या बायकांच्या हातातोंडाकडे पाहून तर त्यांस काय वाटत असे तें कल्पनेनेंच जाणावें. साहेबांकडे बढतीचे अर्ज टाकण्याविषयीं व हरप्रयत्न करून ऑफिसमध्यें पुढें येयणाविषयीं त्यांची अलीकडे नारायणरावांस सारखी टोंचणी चालू होती व नारायणरावांसही आपणाविषयींचे अन्यायाचें परिमार्जन झालें पाहिजे असें हलकें हलकें पण जोरानें वाटूं लागलें होतें. धीर कसा करावा व साउंडीसाहेबांसमोर-कारण बेलसाहेबांचें त्यास भयच वाटत असे—आपलें गाऱ्हाणें कसें मांडावें हाच काय तो प्रश्न त्याचे समोर उभा होता !

कांदेवाडीच्या ट्रॅमस्टॅंडवर थोडा वेळ उभें राहून गांठलेल्या ट्रॅममध्यें आरूढ झाल्यावर ऑफिसमध्यें जाईपर्यंत नारायणरावांस दोन कामें असत; एक काम म्हणजे सुशीलाबाईंनीं तयार करून दिलेला विडा चघळणें व दुसरें काम म्हणजे विड्याबरोबर त्यांनीं करून दिलेली आठवण मनामध्यें वागवून आपल्या प्रमोशनच्या बाबतींतील उपाययोजना करणें. त्यांस पक्कें माहीत होतें कीं प्रमोशनच्या बाबतींत कागदी अर्ज करण्यापासून कांहींच उपयोग नाहीं; झाला तर साहेबांची समक्ष मुलाखत घेऊनच उपयोग होईल. पण बॅलर्ड पियरवरील ' सागर-महाल'च्या तिसऱ्या मजल्यावरील त्यांच्या ऑफिसच्या अगदीं पश्चिमेकडील आंगाला साहेबद्वयांच्या खोल्यांची आठवण झाली कीं, नारायणरावांस घाम आल्यासारखें होई. किती वेळां तरी ते त्या खोल्यांच्या दारांपर्यंत धैर्य करून गेले असतील. पण ' डब्ल्यू. सी. साउंडी ' ' आर. डी. बेल ' हीं अक्षरें दिसतांच एकाद्या मंत्रमुग्ध नागासारखे ते होत. साहेबांकडून कधीं बोलावणें आलें तर शक्य तर चहाचे दोन घोट घेतल्याशिवाय ते तिकडे जात नसत.

गेले पंधरा दिवसांपासून मात्र नारायणरावांचे मनामध्यें कांहींएक आशांकुर उत्पन्न झाला होता. 'म्युझिअम बस्ट'च्या ट्रॅममधून ते बोरीबंदरपर्यंत येत व तेथें

'सर्कल' चे ट्रॅममध्यें बसून बॅलर्डपियरच्या नाक्यापर्यंत जात. ट्रामच्या या अदलाबदलीमध्यें त्यांचीं कित्येकवेळां चारपांच मिनिटेंही मोडत; कारण 'सर्कल'ची ट्राम नेहमींच बोरीबंदर स्टँडवर तयार नसे व कधीं असलीच तर तीमध्यें दरवेळीं हटकून जागा मिळत नसे. नवीन ट्रॅमच्या उमेदवारीमध्यें जो त्यांचा वेळ मोडे त्यावेळेचा सदुपयोग ते आजूबाजूच्या इमारतींवरील जाहिराती वाचून करीत. एके दिवशीं एका नवीन इमारतीच्या सर्वोच्च मजल्याचे भिंतीवर एक केवढा तरी बोर्ड लटकलेला त्यांनीं पाहिला; त्या बोर्डावरील 'आत्मविश्वास ऑफिस' या अक्षरांनीं त्यांचें अंःतकरण वेधलें. न जाणों, आपल्या सर्व अड-चणाचें उत्तर या एका शब्दांत सामावलें नसेलना असा पुसट विचार त्याच क्षणाला आलेल्या ट्रॅमचें हँडल धरून तीमध्यें प्रवेश करताना नारायणरावांचे मनांत आला असेल नसेल तों कोणी त्यांच्या मांडीवर 'यशाचा राजरस्ता' नांवाचा एक सोळापानी लघुग्रंथ आणून टाकला. हा ग्रंथ अत्यंत सुबक टाइप-मध्यें आर्टपेपर सोनेरी शाईनें छापलेला असून त्याच्या मलपृष्ठावर 'आत्म-विश्वास ऑफिस' असा पत्ता विलसत होता. त्यांतील उत्साहवर्धक विचार वाचून नारायणरावांची मुद्रा अत्यंत हर्षोत्फुल्ल झाली व ती तशी संध्याकाळपर्यंत राहिली. आजचा नूर कांहीं निराळा दिसतो असें पाहून सुशीलाबाईंनीं चहाच्या जोडीला शिरा करून आणला व चहा-शिरा टेबलावर ठेवून 'काय बातमी आहे ?' म्हणून नारायणरावांस प्रश्न केला.

'ओळख' नारायणराव म्हणाले.

'साहेब कांहीं तरी म्हणाले ! खास !'

'छट्.'

'तर मग दुसऱ्या कुठल्या ऑफिसमध्यें मोठ्या पगाराची जागा सांगून आली.'

'छट्'.

'तर मग सांगावें आपणच !'

उत्तरादाखल नारायणरावांनीं 'यशाचा राजरस्ता' पत्नीचे आंगावर फेंकला. तें पाहून सुशीलाबाईंचा चेहरा उतरला व त्या म्हणाल्या " ही काय मेली भलतीच थट्टा करावयाची ? चांगलें प्रमोशन मिळालें असेल म्हणून मोठ्या उल्हासानें शिरा करून आणला."

“ अग प्रमोशन मिळालेंच असें समज. ‘ यशाचा राजरस्ता ’ हातीं असला म्हणजे साहेबाचा देव देईल प्रमोशन. आतां म्हणावें ये लेका बेलसाहेबा ! तुझ्या गळ्यांत कशी घंटा बांधतों बघ ! ”

नारायणरावांस वेड तर नाहीं ना लागलें अशी क्षणमात्र शंका सुशीला-बाईंस आली; पण ज्या वेडाचें पर्यवसान रात्रीं सिनेमा पहावयास जाण्यांत होतें तें वेड कायम राहिलें तरी त्याला सुशीलाबाईंनीं फारशी हरकत केली नसती. दिवसेंदिवस नारायणरावांचे उत्साहास भरतीच येत होती. कारण रोजचे रोज त्यांस बोरीबंदरावरील ट्रॅमस्टँडवर ‘ आत्मविश्वास ऑफिस ’मार्फत प्रसिद्ध झालेले लघुग्रंथ मिळत. ‘ आशेचे किरण ’ ‘मागें कां रहातां ? ’ ‘ पराक्रमाची शिडी ’ ‘ सोन्याचें मोल ’ वगैरे आर्टपेपरवर रंगीबेरंगी कव्हरासह विविधरंगी शाईनें छापलेले लघुग्रंथ पाहून नारायणरावांचे मनावर खरोखरच आशेचे किरण पडले; आपण मागें रहावयाचें नाहीं; पराक्रमाचे शिडीचे साह्यानें आपला उत्कर्ष करून घ्यावयाचा असा त्यांना निश्चय केला व त्यासाठीं आत्मविश्वास ऑफिस प्रसिद्ध केलेला वीस रुपये किंमतीचा ‘ यशाची गुरुकिल्ली ’नें नांवाचा ग्रंथ विकत घेण्याचें त्यांनीं ठरवलें.

‘ यशाची गुरुकिल्ली’ हें पुस्तक ज्या दिवशीं नारायणरावांनीं विकत घेतलें त्या रात्रींच त्यांनीं संपूर्ण वाचून काढलें व त्यांत नमूद केलेल्या नियमांप्रमाणें वागावयाचें ठरविलें. पान ७३ वर पुढील नियम होते—

१४६. उत्तम कापडाचे उत्तम शिंप्यानें शिवलेले उत्तम कपडे नेहमीं वापरीत चला. यश व पोषाख यांचें नित्य साहचर्य असतें.

तसेंच ६८ पानावरील पुढील नियमानेंही नारायणरावांचें लक्ष्य वेधलें—

११२. मुंबई, कलकत्ता, दिल्ली, लाहोर अशा शहरांमधून युरोपियन पद्धतीचा पोषाख वापरीत जा; विशेषेंकरून साहेबलोकांशीं जेथें संबंध येतो तेथें यश मिळ-विण्यासाठीं युरोपियन पद्धतीचा पोषाख आवश्यक आहे.

झालें ! ऑफिसपुरती तरी धोतरास रजा द्यावयाची असें नारायणरावांनीं ठरविलें ! नारायणरावांस विशेष आवडलेले कांहीं नियम पुढें दिले आहेत—

२५. तुमच्या शय्यागारांत, तुमच्या काम करण्याचे टेबलावर, तुमच्या

दिवाणखान्याच्या भिंतींवर पराक्रमी पुरुषांच्या तसबिरी, पुतळे असूंद्यात. त्यामुळें तुमचा उत्साह वाढेल.

२८९. कोणतेंही महत्त्वाचें संभाषण सुरू करण्यापूर्वी ज्या मनुष्याशीं तुम्हाला बोलावयाचें असेल त्याचे डोळ्याला तुमची स्थिर, धीट व अंतर्भेदी नजर एक मिनिटभर भिडवा; यामुळें त्याचा आत्मविश्वास कमी होईल व तुमचा वाढेल.

२८०. कोणालाही महत्त्वाचे कामानिमित्त भेटण्यापूर्वी दोन मिनिटें आंत दीर्घ श्वास घेऊन पुनः बाहेरही दीर्घ उच्छ्वास सोडा. असें पांच सहा वेळ करा; तेणेंकरून तुमचें चित्त शांत होईल व विचारांचा ओघ जोरानें सुरू होईल.

या दोन नियमांतच आपले वीस रुपये भरून आले असें नारायणरावांस वाटलें ! कारण आतां साउंडी तर काय पण खुद्द बेलसाहेबाच्या गुहेंत प्रवेश करून त्याची आयाळ ओढणें किती सोपें आहे तें नारायणरावांस समजलें ! आतां बेलसाहेबांच्या खोलीवर स्वारी करण्यासाठीं चहापानाची उसनी ऐट नको ! पांच सहा वेळां ' डीप ब्रीदिंग ' केलें, बेलसाहेबांच्या डोळ्यांला आपली स्थिर, धीट व अंतर्भेदी नजर एक मिनिटभर भिडवली कीं आला साहेब शरण व झाला कबूल वाटेल तेवढें प्रमोशन द्यावयास, असें नाराणरावांस वाटलें व या आनंदांत त्यांनीं पुस्तकाला व दिव्याला रजा दिली !

नारायणरावांच्या आजच्या जामानिम्याचें श्रेय ' आत्मविश्वास ऑफिस 'ला आहे ही गोष्ट ऑफिसमधल्या कोणाही कारकुनास माहीत असणें अर्थातच शक्य नव्हतें; कारण नारायणरावांची एरवीं जरी पुष्कळांनीं टिंगल केली तरी त्यांची ' अटॅची केस ' उघडण्याइतकें धाडस कोणी दाखविलें नाहीं; तसें कोणी दाखविलें असतें तर त्याला त्या केसमध्यें ' यशाची गुरुकिल्ली ' आढळून आली असती ! व त्यांचा पोषाख हा त्या पुस्तकांतील नियम ११२ व १४६ यांचेवरून करण्यांत आला आहे ही गोष्ट सहज समजली असती !

साहेबबहादुरांवर हल्ला करावयाचा संस्मरणीय दिवस तो आजचा ! आपल्या योग्यतेनुरूप प्रमोशन मिळवावयाचें तें आज ! आपल्या आयुष्यांतील नवीन भागाला सुरुवात करावयाची ती आज ! डिसोझा, रेगे, कामत वगैरे मंडळींस

आपले तेजानें दिपवावयाचें तें आज ! आपल्या प्रियपत्नीला प्रमुदित करावयाचें तें आज ! आत्मविश्वास ऑफिसच्या मालकाच्या उपदेशाचें चीज करावयाचें तें आज !

आज नारायणरावाचें कामाकडे लक्ष्य नव्हतें. 'यशाच्या गुरुकिल्लीं' तील नियम ९९ प्रमाणें आपण साहेबांकडे केव्हां जाऊं, नियम ५५ प्रमाणें त्यांचेशीं भाषण कसें सुरू करूं, नियम ७७ प्रमाणें त्यांच्या आक्षेपांस उत्तर कसें देऊं, नियम ६६ प्रमाणें त्यांस कुंठित कसे करूं हे विचार त्यांचे डोक्यांत थैमान घालीत होते ! आपल्यापुढील कामाचे कागदावरील आंकडे त्याला नीट दिसतच नव्हते; त्यांचे जागीं 'यशाचे गुरुकिल्लीं' तील महत्त्वाचे नियमांचेच आंकडे त्यांस जिकडे तिकडे दिसत !

अडीच वाजतां बेलसाहेब टिफिनहून परत आले कीं आपण त्यांस भेटूं असें नारायणरावानें ठरवलें होतें. पण योगायोग असा कीं त्याला बेलसाहेबांनीं साडे-बारा वाजतांच बोलावलें. साहेबांकडून शिपाई अगदीं धांवतच आला व त्यानें नारायणरावांस अगदीं तांतडीनें बोलावलें असल्याचें कळवलें !

जेथें नियम ४४ प्रमाणें काय बोलावयाचें तें आगाऊ ठरवितां आलें नाहीं, एवढेंच नव्हे तर नियम २८० प्रमाणें 'डीप ब्रीदिंग' करावयाचेंही विस्मरण झालें तेथें नारायणरावांची दशा काय झाली असेल याची कल्पनाच करावी. बेलसाहेब अगदीं रागांत होते; कारण त्यांना टिफिनला जाण्यास उशीर होत होता. बेलसाहेबांचा नियम असे कीं, एक वाजण्याचे अगोदर बिनभानगडीचीं कामें उरकावयाचीं व भानगडीचीं कामें अडीच वाजल्यानंतर काढावयाचीं. नारायणरावांचें काम नेहमीं चोख असल्यामुळें त्यानें साडेअकरा वाजतां पाठ-विलेल्या कागदांचा गठ्ठा त्यांनीं मोठ्या भरंवशानें हातीं घेतला होता. पण आज नारायणरावाचें डोकें ठिकाणावर नसल्यामुळें त्यानें आपल्या कामांत चुकाच चुका करून साहेबांची 'भरंवशाचे म्हशी'च्या म्हणींतल्यासारखी स्थिति करून सोडली होती. आपल्या भरंवशाचे कारकुनानें एकाच वेळीं इतक्या चुका केलेल्या पाहून बेलसाहेबांस राग आला होता. आज कांहींतरी होणार म्हणून पट्टेवाला सुद्धां समजून राहिला होता.

यशाचे गुरुकिल्लींतील नियम २८९ प्रमाणें महत्त्वाचें संभाषण सुरू करण्यापूर्वी

बेलसाहेबांच्या डोळ्यांला नारायणरावानें आपली स्थिर, धीट व अंतर्भेदी नजर एक मिनिटभर भिडवून त्यांच्या आत्मविश्वासाचें पाणी करावयाचें ! पण नारायणरावाचा खोलींत पुरता प्रवेश होण्यापूर्वींच साहेबांनीं सरबती सुरू केली.

" व्हॉट मंकी ट्रिक्स आर यु अप् टु, कुळकर्णी ? या काय माकडचेष्टा चालविल्या आहेत तुम्ही ? आमच्या पॅरिसच्या ऑफिसला हे महत्त्वाचे कागद पाठवायचे आणि तुम्ही त्यावरल्या नीट बेरजा सुद्धां केल्या नाहींत. २८०, ५८९ हे मुळांत मुळींच नसतांना तुम्ही पांच सहा ठिकाणीं घातले आहेत ! तसेंच हे ११२ व १४३ आंकडे ! हे कोठून आणलेत तुम्ही ? आज तुमचे डोळे ताळ्यावर आहेत कीं नाहींत ? "

नारायणरावानें तत्काळ ओळखलें कीं, 'यशाच्या गुरुकिल्ली'तील आपल्या आवडत्या नियमांचे आंकडे आपण अनवधानानें जिकडे तिकडे पेरून दिले आहेत ! साहेबांवर हल्ला चढविण्याच्या ऐवजीं त्यांचा हल्ला कसा परतवावा हाच त्यांचेपुढें आतां प्रश्न पडला.

" आय् ऍम् व्हेरी सॉरी ! " नारायणराव म्हणाला " तें काम नीट करून पाठवून देतों. "

" बट आय् डोन्ट वॉंट मायसेल्फ टु बी डिस्टर्ब्ड बाय सच् इन् एफिसिएन्सी ? कशाला ? असला निष्काळजी मनुष्य ठेवा कशाला स्टाफवर ? तूं फ्रेंच, जर्मन भाषांचा चांगला अभ्यास केलास व अकौंटन्सीचा डिप्लोमा मिळविलास म्हणून मुद्दाम मी तुला या फॉरिन ब्रँचमध्यें घेतला ! चांगले उपकार फेडलेस तूं माझे. " बेलसाहेब नारायणरावाच्या आत्मविश्वासाचें पाणी करीत म्हणाले.

नारायणराव नम्रपणानें खालीं मान घालून उभे राहिले.

साहेबांचा राग शांत झाला. आज आठ वर्षांत नारायणरावाची ही पहिलीच चूक आहे हें त्यांस माहीत होतें व त्याच्या सर्वगामी बुद्धिमत्तेबद्दल ते मनांतून त्यास फार चहात असत. नारायणरावामध्यें जर थोडीबहुत चढाई व धिटाई असती, आपले हक्कांविषयीं तो जर किंचित् अधिक जागरूक असता तर बेलसाहेबांनीं हां हां म्हणतां त्याला डिसोझाच्याहि वर नेऊन ठेवलें असतें;— डिसोझा नारायणरावांच्या वर जाऊंच शकला नसता ! पण—

बेलसाहेबांचा राग शांत झाल्याचें मुख्य गमक म्हणजे आतां त्यांचें नारायणरावाकडे नीट लक्ष गेलें, त्याचा नवीन पोशाख त्यांस दिसला व त्यांचा विनोद जागा झाला.

" बाय धी वे, नारायण ! हू टॉट यू टु फासन दॅट् टाय ? हा टाय कसा अगदीं अजागळासारखा बांधला आहेस ! " साहेब नारायणरावाचे अगदीं जवळ येऊन त्यांचे टायशीं खेळत म्हणाले. " आणि हें बघ " जातां जातां त्याच्या पाठीवर थाप मारून म्हणाले " आय शुड् मच् प्रिफर युवर धोतीर इन् केस यू प्रॉमिज् नॉट टु कमिट एनी मिस्टेक्स ! पँट घालून चुका करण्यापेक्षां तुझें तें भोंगळभटीधोतरही आम्हाला पुरवेल ! "

नारायणरावाचें दुर्दैव असें खडतर होतें कीं, नेमके याच वेळीं रेगे दारा-जवळ आले व साहेब बाहेर जात असतां त्यांस त्यांनीं कांहीं महत्त्वाचे कामा-विषयीं प्रश्न विचारले. ' माकडाचे हातीं कोलीत ' या न्यायानें रेग्यानें साहे-बांच्या टाय, पँट, धोतरविषयींच्या संभाषणाचा फैलाव तात्काळ ऑफिसभर केला व बिचाऱ्या नारायणरावाच्या पोशाखाकडे ऑफिसमधील सर्वच स्टाफ विशेष चिकित्सक व विनोदी बुद्धीनें पाहूं लागला.

एकादें वाढीला लागूं पहाणारें रोपडें संरक्षक कुंपणाच्या अभावीं ज्याप्रमाणें गुरावासरांच्या भक्ष्यस्थानीं पडावें त्याप्रमाणें नारायणरावांच्या अंकुरित आत्म-विश्वासाची गति झाली. बेलसाहेबांच्या विनोदरूपी सोंडेनें त्याला स्थानभ्रष्ट केलें व नंतर ऑफिसमधील टिंगलबाज कारकुनांच्या टीकाप्रहारांनीं त्याचा पुरता चेंदामेंदा केला. वॉटर्लूच्या लढाईनंतर जी नेपोलियनची स्थिति झाली, झामाच्या लढाईत पराभूत झालेल्या हॅनिबालच्या सैन्याची जशी दाणादाण झाली, पानिपतच्या तिसऱ्या लढाईत मराठी साम्राज्याचें जसें कंबरडें मोडलें तशी नारायणरावाची स्थिति त्या दिवशीं झाली ! आणि विशेष दुर्दैवाची गोष्ट म्हणजे हा पराभव ' एकहि बाण ' सुटण्याचे अगोदरच झाला ! एकाद्या गर्भाशयस्थ बालकाला मृत्यूनें ' गिंवसावें, ' एकाद्या सुंदर सुवासिक फुलाची कळी उमलण्यापूर्वींच ती नष्ट व्हावी त्याप्रमाणें नारायणरावाची स्थिति झाली ! त्यांच्या हृदयामध्यें आत्मविश्वासाची कळी उत्पन्न होऊन पुरता महिनाही लोटला नव्हता ! ' यशाची गुरुकिल्ली ' मिळवून पुरता आठवडाही लोटला नव्हता ! साडेवाच्या

रणक्षेत्राची टेहळणी ज्याप्रमाणें प्रिन्स बिस्मार्क जवळच्या टेकडीवरून दुर्बिणीच्या साह्यानें करीत होते—अगदीं त्याचप्रमाणें आपली प्रियपत्नी कल्पनेच्या दुर्बिणीनें आपल्या आजच्या पराक्रमाकडे बघतः रहाणार होती ! विजयी वीराला पंचप्राणासह पंचारतीनें ओंवाळण्यास रजपूतरमणी धांवून जात असत त्याप्रमाणें आपली प्रियपत्नी पंचपक्वान्नांनीं आज आपलें थाटानें स्वागत करणार होती ! पण हाय हाय ! पावसाच्या चार थेंबांनीं ज्याप्रमाणें वॉटर्लू येथें नेपोलियनला अपशकुन केला त्याप्रमाणें 'यशाच्या गुरुकिल्ली'तल्या चार आंकड्यांनीं आपला केवढा घात केला !

ऑफिस वेळेवर सुटूनही त्या दिवशीं नारायणराव घरीं वेळेवर गेले नाहींत. त्यांच्या चेहऱ्यावर वॉटर्लूची घनदाट छाया पडलीच होती ! तेव्हां त्यांच्या स्वागतार्थ तयार ठेवलेलें अभिनंदनपर भाषण चटदिशीं मागें घेऊन सुशिलाबाईंनीं समयस्फूर्तीनें सहानुभूतिपूर्वक भाषण केलें; त्यांना धीर दिला; त्यांना आशा दाखविली; बेलसाहेबाला चार शेलक्या फुलें वाहण्यासही सुशिलाबाई विसरल्या नाहींत. अशा रीतीनें नारायणरावांची कळी किंचित् उमलती करून, त्यांस चहा पाजून त्यांच्या पत्नीनें त्यांस बोलतें केलें.

"मग आतां काय करावें असें तुला वाटतें ?" त्या रात्रीं शय्यामंदिरांत प्रवेश करतांना नारायणराव पत्नीकडे पहात म्हणाले.

"मला वाटतें आपण त्या आत्मविश्वास ऑफिसचे मालकाला पुनः भेटून त्याला सर्व हकीकत कळवावी; व तो सांगेल तसें वागावें." सुशिलाबाईंनीं सुचविलें.

"कीं यशाची लेखी गॅरंटी त्याचे आंगावर फेंकून त्याचेकडून आपले वीस रुपये वसूल करावे ?"

"पण मी विचारतें, हा वीस रुपयांचा का प्रश्न आहे ? ज्या माणसानें 'यश नाहीं तर पैसे परत' आणून आपणांस लेखी गॅरंटी दिली, तो आपणास कांहीं चांगला मार्ग सुचविल्याशिवाय कां रहाणार आहे ? हे धंदेवाले लोक सुखासुखी कां पैसे परत करणार आहेत ? हा प्रयत्न इतक्यांत सोडावा असें मला बाई कांहीं वाटत नाहीं. अगदीं उद्यांचे उद्यां जावें."

"पण उद्यां कसें जावयास मिळणार? उद्यां शुक्रवार! विलायत मेलची सर्व तयारी उद्यां करावयाची! उद्यां परवां एक मिनिटाची फुरसत नाहीं."

"आपणास वेळ मिळेल तेव्हां जावें."

"आणि तेथपर्यंत!"

"तेथपर्यंत ऑफिसांतल्या कारकुनांच्या थट्टेकडे लक्ष न देतां 'यशाच्या गुरुकिल्ली'तल्या सूचनांप्रमाणें वागावें. त्या मेल्यांचें काय जातें थट्टा करावयास? उद्यां पुष्कळ पैसे मिळावयास लागूं देत कीं हींच कुत्रीं कशीं गोंडा घोळावयास लागतील!"

"सुशीले! किती मला धीर दिलास तूं! मी तर तो 'आत्मविश्वास'वाला भेटला कीं त्याला सांगणार आहे कीं, पुस्तकाची नवीन आवृत्ति काढशील तेव्हां त्यांत आणखी नियम घाल म्हणून."

"कोणता नियम?"

"ज्यावेळीं तुम्ही निराश झालां असाल त्यावेळीं आपलें मन पत्नीजवळ मोकळें करा; म्हणजे ती तुम्हाला धीर देईल व पुढील रस्ता दाखवील."

"इश्श."

* * *

**आ**त्मविश्वास ऑफिसची एकंदर सजावटच अशी होती कीं तेणेंकरून सामान्य मनुष्याचे अंतःकरणांत भयच उत्पन्न व्हावें. हॉर्नबी रोडच्या कोंपऱ्यावरील एका सुंदर, भव्य व नवीन इमारतीच्या सर्वोच्च मजल्यावर हें ऑफिस होतें. मुलाखतीला येणाऱ्या माणसांस प्रथमदर्शनींच एक पांढराशुभ्र पोषाख केलेला भव्य पठाण दिसत असे; त्याचा रुबाब जरी अमीरासारखा होता तरी त्याचें काम फक्त पहारेकऱ्याचें असे. प्रवेश द्वाराजवळ भेटीस आलेल्या लोकांस क्षणभर बसण्यासाठीं जीं कोचें होतीं, तीं शिसवीच्या लांकडाचीं असून त्याचेवरील कलाकुसरीचें काम त्यांच्या भारी किंमतीची साक्ष पटवीत होतें. आंतल्या बाजूला एक प्रशस्त दिवाणखाना होता व त्याचे पलीकडे दोन खोल्या होत्या; एकीमध्यें मॅनेजिंग डायरेक्टर एम्. सी. राव (यांना कांहीं लोक सेल्फ्-कॉन्फिडन्सराव असें म्हणत असत) यांची बैठक असे; व लगतच्या खोलीमध्यें

ऑफिसचा स्टाफ् बसण्याची सोय असून तिला दिवाणखान्यांतून जसा रस्ता होता तसा रावसाहेबांच्या खोलींतूनही होता. रावसाहेब तरुण, तरतरीत व बुद्धिमान् होते. त्यांचे तेजस्वी चेहऱ्यावर त्यांचा आत्मविश्वास परिपूर्णरीत्या प्रतिबिंबित झालेला होता. कोणी म्हणत कीं ते मद्रासी आहेत, पण त्यांचा गौरवर्ण व त्यांचे साहेबी थाटाचे उच्चार हे भेटणाऱ्या इसमास त्यांच्या जन्मप्रांताविषयीं संशयांत पाडीत; ते कोणतीही भाषा इतकी शुद्ध व अस्खलित बोलत कीं ते मराठी बोलतांना जसे महाराष्ट्रीय वाटत तसे गुजराथी बोलतांना गुर्जर वाटत. बाहेरच्या दिवाणखान्यांतील पॉलिश करकरून आरशासारखीं झालेलीं मौल्यवान् लाकडाचीं टेबलें व कातड्यानें मढवलेल्या मऊ मऊ बैठकीच्या खुर्च्या दिवाणखान्याची शोभा वाढवीत होत्या; पण भेटीस आलेल्या मनुष्याचें चित्त हरण करणारी गोष्ट म्हणजे भिंतींवरील थोर, यशस्वी व पराक्रमी पुरुषांच्या तसबिरी होत. शिकंदर, सीजर, हॅनिबॉल, नेपोलियन, बिस्मार्क, मॅझिनी, लेनिन, मुसोलिनी, वॉशिंग्टन, फोर्ड, रॉकफेलर, कार्नेजी, शिवाजी, बाजीराव, प्रतापादित्य, रणजितसिंह वगैरे पराक्रमी पुरुषांच्या तसबिरा भेटीस येणाऱ्या प्रत्येक मनुष्यास 'यशस्वी व्हा' 'पराक्रमी व्हा' म्हणून जणूं काय मूक उपदेशच करीत होत्या असें वाटे. तात्पर्य, राव-साहेबांनीं आपल्या ऑफिसचा थाट इतका भव्य व भीतिप्रद ठेवला होता कीं त्याचा परिणाम भेटीस येणाऱ्या मनुष्यावर काय व किती होतो हें पाहून ते त्याची आत्मविश्वासाचे बाबतींत प्रत ठरवीत असत. भेटूं इच्छिणाऱ्या मनुष्यास ते एक तासभर भेटतच नसत; तेवढ्या मुदतींत त्या माणसानें आपलें कार्ड (किंवा चिठ्ठी) पुनः पाठविलें नाहीं तर ते त्याची गणना 'क' वर्गांत करीत व त्यानें पहिल्या दहा मिनिटांतच आपलें कार्ड पुनः पाठविलें तर त्याला 'अ' वर्ग मिळे. तसेंच त्यांचेशीं बोलतानां जर तो इसम खुर्चीचे कोंपऱ्यावर बसून बोलला तर त्याचा 'क' वर्ग ठरे; खुर्चीचे मध्यभागीं प्रशस्तपणें बसून त्यांच्या प्रश्नाची वाट न पहातां भाषणास सुरुवात करणारे मनुष्यास ते 'अ' वर्ग देत. या व अशा अनेक रीतींनीं ते मनुष्यपरीक्षा करीत.

ठरल्याप्रमाणें नारायणराव एका फुरसतीच्या दिवशीं 'आत्मविश्वास' ऑफिसमध्यें गेले; रीतीप्रमाणें त्यांनीं आपलें कार्ड आंत पाठविलें; रीतीप्रमाणें

त्यांना थांबण्याची सूचना मिळाली; तसेंच रीतीप्रमाणें चित्तविनोदनार्थ चार दोन सचित्र इंग्रजी मासिकांचे अंकही मिळाले.

इतक्यांत एक तरुण व गौरवर्ण पारशी इसम लिफ्टमधून बाहेर पडला व 'आत्मविश्वास' ऑफिसमध्यें येऊन दाखल झाला. त्याचेमागून कांहीं वेळानें त्याचा चाकर फळांच्या दोन करंड्या घेऊन आला. या पारशानें आपलें कार्ड आंत पाठविलें व त्यालाही थांबण्याची सूचना मिळाली. हा पारशी–याचें नांव मि. होमी असें होतें—मोठ्या खुषींत व आनंदांत होता. नारायणरावांस आपल्या आनंदांत सामील करण्याचे उद्देशानें तो कांहींसा मराठींत व कांहींसा गुजराथींत म्हणाला "लई होशियार माणस!"

अर्थात् तो राव–साहेबाविषयीं म्हणाला हें नारायणरावास समजलें. नारायणरावास आत्मविश्वास कमी होता पण रावच्या ग्रंथवाचनानें व सूचनांनीं त्यानें आपला आत्मविश्वास वाढवला व त्यामुळें त्याचे इष्टहेतु तडीला गेले; व म्हणून रावचे उपकाराची अंशतः फेड म्हणून त्यानें ह्या फळांच्या करंड्या आणल्या इत्यादि गोष्टी त्यानें तर्कशास्त्रानें ओळखल्या होत्याच. पण रावनें या होमीशेटचें असें कोणतें काम केलें व त्याचा आत्मविश्वास कसा वाढविला हें कळवून घेण्याची नारायणरावास फार इच्छा होती. होमीशेटच्या वक्तृत्वाला किल्ली देण्याचे उद्देशानें तो म्हणाला "असें?"

"लई होशियार माणस!" होमीशेट म्हणाला "तुमासनी सांगायला हरकत नाहीं केम के (कारण कीं) तुमी पण सेल्फ–कॉन्फिडन्स (आत्मविश्वास) पुरता नाहीं म्हणून इकडे आलांत. माझें पण असेंच झालें. मी एक बिल्डिंग कॉन्ट्रॅक्टर आहे. आमचे लोकांमधीं शादी लई उशीरा होते. माझी शादी अद्यापि झाली नव्हती. गई (गेले) महिन्यांमधीं माझ्या एका मित्राची शादी झाली. ते टाइमला मला बोलावलें होतें. तेथें लई मांणस जमला होता. त्यामधीं एक मिलवाल्याची दीकरी (मुलगी) आली होती. मला वाटलें 'बस्! शादी करावी तर हिच्याबरोबर'. पुढें मी डिनरला (भोजनास) गेलों तेथें तिची व माझी ओळखही झाली. तिचें नांव माणिबेन असें आहे. माणिबेनच्या घरीं मी जाऊं लागलों. तुमच्या इंग्लिश नॉवेल्समधीं असतें ना 'Love at first Sight' (प्रथम दर्शनीं प्रेम) तसें माझें झालें.

मणिबेनही माझेवर प्रेम करूं लागली. तिची आई मला लंचला ( फराळाला ) बोलावूं लागली. पण मणिबेनला प्रपोज करण्याची हिंमत कांहीं होईना. तिच्या घरीं जावें, इकडल्या तिकडल्या गोष्टी बोलावें पण शादीची गोष्ट काढावयास धीर होऊं नये ! तिची आई थोडा वेळ आमचेजवळ बसे व मग दुसरीकडे जाई. ती जवळ असली म्हणजे वाटे कीं ती गेली म्हणजे गोष्ट काढूं ! पण ती गेली कीं भयच वाटे ! ज्या एकांताची तुमच्या नॉवेल्स ( कादंबऱ्या ) मधील नायक वाट पहातात तो एकांत मिळाला कीं मला भय वाटूं लागे, छातीचे ठोके जोरानें पडूं लागत व जीभ अगदीं सुकून जाई ! एक दोन वेळां मला संधि देण्यासाठीं माझ्या मणिबेननें आपल्या मैत्रिणींच्या शादीच्या गोष्टी बोलाव्या, पण कांहीं नाहीं ! जिभेपर्यंत आलेले शब्द बाहेर पडत नसत व जाकिटांतील घड्याळ बाहेर काढून उशीर झाला म्हणून म्हणत मी घरीं परत जाई.

" एके दिवशीं या राव-साहेबांचा साईनबोर्ड ( पाटी ) पाहिला. मला वाटलें ' वस्स यांसनी प्रश्न टाकावा. ' साहेब भेटले, बोलले; त्यांचें पुस्तक घेतलें पण तें वाचूनही धीर येईना. तेव्हां पुनः यांचेकडे आलों व यांसनी समदी हकीकत सांगून टाकली. त्यांनीं मला युक्ति सांगितली. ती केली; ती करतांच माझें काम झालें ! लई होशियार माणस ! "

" अशी काय युक्ति त्यांनीं सांगितली ? " नारायणरावांनीं औत्सुक्यपूर्ण आवाजांत विचारलें.

" ते म्हणाले तुम्हासनी कांहींतरी mental stimulant ( मानासिक उत्साहवर्धक औषध ) पाहिजे आहे. मी विचारलें ' ब्रँडी चालेल काय ? ' ते म्हणाले ' छे ! छे ! मी मानसिक औषध पाहिजे म्हटलें, शारीरिक नव्हे. तुमच्या मनाला जोर वाटेल, धीर येईल अशी कांहींतरी दुसरी गोष्ट ज्या दिवशीं घडून येईल त्या दिवशीं, त्या आनंदांत असतां तुम्ही मणिबेनला भेटा म्हणजे तुमचें काम होईल.' मग त्यांनीं माझ्या धंद्याविषयीं मला पुष्कळ विचारलें. मी कोणतीं कंत्राटें घेतलीं आहेत, कोणतीं घेण्याचीं खटपट चालली आहे वगैरे सर्व माहिती त्यांनीं मला विचारली. मी त्यांसनी सांगितलें कीं नेहमीं माझीं कंत्राटें लाख दोन लाखाचे कामाचीं असतात. पण हल्लीं एक रेल्वेचें वीस लाखाचें कंत्राट मिळवण्याचे खटपटींत मी आहें. तें ऐकतांच ते म्हणाले

' बस्स! जर तुम्हाला मणिबेन हवी असेल तर हें कंत्राट मिळवा व मिळवलेंत कीं लगेचच्या लगेच मणिबेनला भेटा म्हणजे तुमचा सर्व नर्व्हसनेस (भय) नाहींसा होईल, तुम्हाला धीर येईल व तुमचें काम होऊन जाईल.'

"मग मी डबल एनर्जीनें (दुप्पट मेहनतीनें) या रेलवे कंत्राटाच्या मागें लागलों. कालच ट्रॅफिक मॅनेजरकडून आम्हांस कंत्राट मिळालें व कालचे काल माणिबेनकडे जाऊन शादीचें नक्की करून आलों! लई होशियार माणस!"

इतक्यांत होमीशेटला रावसाहेबांकडून आमंत्रण आल्यावरून तो गेला. नारायणरावांस रावविषयीं आदर वाटला. त्याला वाटलें 'किती साधी व सोपी युक्ति रावनें सांगितली बरें! खरेंच! साध्या गोष्टी असल्या, म्हणजे त्या सहज समजतील असें नाहीं! खरें पहातां होमीशेटला ही सोपी युक्ति कां सुचूं नये? आपला आत्मविश्वास वाढविण्यासारखी दुसरी एकादी गोष्ट ज्या दिवशीं घडून येईल त्या दिवशीं त्या उन्मादक आत्मविश्वासाचे प्रभावानें आपली हिंमत वाढून आपले हातून अन्यही पराक्रम होतात ही गोष्ट नारायणरावास अगदीं पटली. एकदां तर त्याला वाटलें कीं आतां रावची गांठ तरी कशाला घ्या? याच युक्तीचा आपले स्वतःचे बाबतींत उपयोग करून घ्यावा म्हणजे झालें! पण पुनः त्याला वाटलें कीं आपण कांहीं होमीशेटसारखे कंत्राटदार नाहीं कीं वीस लाखांचें एखादें कंत्राट आपले घशांत पडून आपला आत्मविश्वास वाढावा! आपल्या निष्क्रिय, निष्पराक्रमी व कारकुनी जीवनक्रमांत अशी कांहीं आत्मविश्वास विशेषकरून वाढविणारी गोष्टच घडणें शक्य नाहीं! आपणांस कांहीं दुसरीच युक्ति योजली पाहिजे!

नारायणरावांचें विचारचक्र अशा रीतीनें चालू असतां होमीशेट रावचे ऑफिस मधून बाहेर पडले व त्याला रावचें आमंत्रण आलें. नारायणरावाला 'यशाची गुरुकिल्ली' या पुस्तकांतील सर्व नियम पाठ झाले होते व त्यांप्रमाणें वर्तन करण्याचा तर चाळाच लागला होता असें म्हटलें तरी चालेल. म्हणून नियम ८८ प्रमाणें त्यानें रावला भाषण करण्याची संधि न देतां स्वतःच भाषण करण्यास सुरुवात केली. कारण नियम ८८ मध्यें स्पष्ट सांगितलें होतें कीं,

(नियम ८८) युद्धशास्त्रामध्यें ज्याप्रमाणें शत्रूला लढाई सुरू करण्यास वेळ मिळण्याच्या पूर्वी आपण लढाई सुरू करणें फायद्याचें असतें त्याप्रमाणें संभाषण-

शास्त्रामध्येंही दुसरा भाषण करण्यापूर्वी तुम्ही भाषण सुरू करा; तेणेंकरून संभाषणाचीं सूत्रें तुमचे हातांत रहातात.

" आय अॅम व्हेरी सॉरी......" नारायणराव म्हणाले.

पण रावनीं त्याला त्याचें वाक्य पुरें करूं दिलेंच नाहीं. जितक्या सफाईनें अफझुलखानाच्या शरीरसंरक्षकाचा शिवाजी महाराजांवरील वार जिवा महाल्यानें उडवून दिला असेल तितक्याच सफाईनें रावांनीं नारायणरावांच्या संभाषणशास्त्राचा वार उडवून संभाषणाचीं सूत्रें नारायणरावाचे हातांतून काढून आपले हातांत घेतलीं. ते म्हणाले—

" नियम ८८ प्रमाणें तुम्ही संभाषणाला सुरुवात केल्याबद्दल मी तुमचें अभिनंदन करतों. पण मीही तोंडीस तोंड या न्यायानें नियम ८९ प्रमाणें तुमचें संभाषणशास्त्राचा वार उडवून आपले हातांत संभाषणाचीं सूत्रें आणणें आपलें कर्तव्य आहे असें समजतों. तुम्ही काय सांगणार आहां तें मी समजलों. ' यशाची गुरुकिल्ली ' वाचूनही तुम्हांला तुमची अडचण दूर करतां आली नाहीं म्हणून तुम्ही माझेकडे आलां हें खरें आहे ना ? "

" होय."

" साउंडी, बेल आणि कंपनीच्या ऑफिसमध्यें तुम्ही आहांत असें तुम्ही मागील खेपेला स्वतःविषयीं जी माहिती आमच्या छापील फार्मवर भरून दिलीत त्यावरून दिसतें. त्या वेळीं त्याच फार्मवर तुमचेविषयीं जो मी शेरा मारला त्यावरून व आजच्या तुमच्या जामानिम्यावरून तुम्ही ' यशाच्या गुरुकिल्ली 'तील नियमांप्रमाणें निश्चयानें वागत आहां असें दिसतें. त्यावेळचा तुमचा धोतरचपलादि पोषाख व आजचा अप-टु-डेट पोषाख यांत महदंतर आहे. "

" होय."

" इतकेंही करून तुम्हाला ज्या अर्थी माझ्या सल्ल्याची जरूरी वाटते, त्या अर्थी तुमच्या आत्मविश्वासांत अद्यापिहि न्यून आहे हें सिद्ध आहे. ऑफिसमधील कारकून प्रमोशनाशिवाय दुसरें काय मागणार ? खरें ना ? "

" होय."

" आपल्या बरोबरीचे लोक पुढें जावे। व आपण मागें रेंगाळावें हें कोणाला सहन होईल ? बरें एकदां तुमचे पुढें गेल्यावर ते तरी स्वखुषीनें तुम्हास

स्वतःचे पुढें कसे जाऊं देतील! अर्थात् स्वहक्कसंस्थापनेसाठीं तुम्ही कांहीं नवीन उपक्रम आरंभला आहे असा संशय येऊन त्याला विरोध तुमचा उपहास, तुमची थट्टा करून करण्यास त्यांनीं सुरुवात केली असणारच."

"होय."

"आणि या टिंगलबाजीचा परिणाम तुमचा धीर कमी होण्यांत होऊन पुढें काय करावें अशा अडचणींत पडल्यामुळें तुम्ही माझेकडे आलांत हें खरें काय?"

"होय."

"अगदीं पहिल्याप्रथम तर माझा पुनः सल्ला न घेतां लेखी गॅरंटीचे आधारावर आपले वीस रुपये परत मागावे असें तुम्हास वाटलें होतें खरें ना?"

"हें आपणास कसें समजलें?"

"त्यांत काय कठीण आहे?" राव स्मितपूर्वक म्हणाले, "तुमचा स्वभाव उतावळा. क्षणांत आशावादी तर क्षणांत निराशापूर्ण होणारा आहे असा शेरा तुमच्या फार्मावर मी मागेंच मारून ठेवला आहे. अशा स्वभावाचा शंभरसव्वाशें रुपये मिळविणारा मनुष्य निराशेच्या पहिल्या झटक्यांत काय करील जर मला समजलें नाहीं तर माझे हातून लोकांचीं कामें तीं काय होणार? बरें आपणास मला पुनः भेटण्याबद्दल सल्ला कोणी दिला?"

"माझे पत्नीनें."

"असली चतुर पत्नी मिळाल्याबद्दल मी तुमचें अभिनंदन करतों. खरें पाहतां तिचा सल्ला तुम्ही यापूर्वी वेळोवेळीं घेतला असता तर तुम्हाला माझेकडे येण्याचें कारणच पडलें नसतें. पण आमच्यांतील सुशिक्षित नवरे आपल्या पत्नी अशिक्षित आहेत एवढ्यावरूनच त्यांचा सल्ला घेत नसतात; पण चातुर्य, समयज्ञता, प्रसंगावधान इत्यादि गुण शिक्षणनिरपेक्ष असतात हें त्यांच्या गांवींही नसतें. असो. आतां मी जरा कामांत आहे व मला पांच मिनिटांनीं बाहेर जावयाचें आहे तेव्हां तुमची सविस्तर हकीकत ऐकून घेण्यास मला वेळ नाहीं. तथापि तुमच्या स्थितीविषयीं मी केलेला तर्क खरा असेल तर मी आतां सांगतों या युक्तीनें तुमचें काम झालें पाहिजे. पहा व काय होतें तें मला पुनः कळवा. मात्र याल ते तीन वाजण्यापूर्वी या. तिहीनंतर मला एका मिनिटाचीही फुरसत नसते."

*

रविवारीं रात्रीचे शेवटचे प्रोग्रामला ' एक्सेल्सिअर ' सिनेमागृहांत युरोपियन लोकांची तुफान गर्दी जमत असते. त्यांतून आज It can be done (यांत अशक्य तें काय ?) ही चारही खंडांत वाखाणलेली फिल्म दाखविण्यांत येणार असल्यामुळें गर्दी नेहमींपेक्षांहि अधिकच होती. अधूनमधून कांहीं दाक्षिणी गुजराथी लोकही तिकिटांचे खिडकीवर येत. पण त्यांचा रोख मुख्यत्वेंकरून चार आणे आठ आणेवाल्या जागांकडेच असे. तीन रुपये फेंकून बॉक्सचें तिकिट काढणारा महाराष्ट्रीय मनुष्य त्या तिकीटऑफिसरनें कधीं पाहिला नव्हता; व त्यानें जेव्हां शनिवारीं आलेले नारायणराव रविवारीं तीन रुपये पुनः खर्च करतांना पाहिले, तेव्हां तर त्यास म्हटल्याशिवाय राहवलें नाहीं:—

' बहु सारी फिल्म छे ' ( फार चांगली फिल्म आहे. )

नारायणरावांनीं आपल्या मराठी गुजराथींत यथोचित उत्तर दिलें. पण त्यांचें मुख्य लक्ष्य बागेमध्यें इतस्ततः संचार करणाऱ्या मंडळीवर, व मुख्य दाराशीं येऊन थांबणाऱ्या प्रत्येक मोटारीवर होतें. कांहीं वेळानें त्यांची अपेक्षा पूर्ण झाली; त्यांस पाहिजे असलेला मनुष्य आला; पण त्याला पहातांच त्यांचे चेहऱ्यावर आनंद प्रकट होण्यांचे ऐवजीं भयाचींच चिन्हें दिसूं लागलीं व येथें कोठें लपून राहतां येईल कीं काय अशा मुद्रेनें त्यांनीं क्षणार्ध इकडे तिकडे पाहिलेंही. इतक्यांत त्यांचा हात त्यांचे खिशाकडे गेला. त्या खिशामध्यें जरी पिस्तूल नव्हतें, जरी तेथें एक आकारानें लहानसें ( पण किंमतीनें भारी ) पुस्तक होतें तरी त्याच्या स्पर्शाबरोबर नारायणरावाला या गर्दीमध्येंही आपला कोणी पाठीराखा आहे असें वाटून हर्ष झाला. बेलसाहेबांची नजर नारायणरावाकडे गेली नाहीं. ते थेट आपल्या बॉक्सकडे गेले, त्यांची पत्नीही त्यांचेबरोबर होती. नारायणराव आपल्या जागीं जाऊन बसले.

नारायणरावानें जरी It can be done ही फिल्म आदले रात्रीं पाहिली होती तरी तिच्या पुनर्दर्शनानें त्याला अधिकच गम्मत वाटली. त्या फिल्मचें कथानक कांहींसें पोरकट व असंभाव्य होतें तरी त्यांतील नायकाचा बेडर स्वभाव, त्याची ऐटदार वागणूक, त्याचे आत्मविश्वासयुक्त उद्गार, यांनीं त्याचें मन चांगलेंच रममाण झालें. एका वैभवशाली प्रकाशकाचे ऑफिसांत हा नायक—याचें नांव डिक असें होतें—कारकून होता. आत्मविश्वास, कार्यक्षमता यांचे-

वरील पुस्तकें वाचण्याची त्याला भारी हौस होती; पण त्याच्या महत्त्वाकांक्षेत त्याला अद्यापि यश मात्र आलें नव्हतें. एवढेंच नव्हें तर कांहीं क्षुल्लक कारणावरून रागावलेल्या त्या प्रकाशकानें त्याला नोकरींतून कमी केलें होतें. तो विषण्ण मुद्रेनें ऑफिसांतून बाहेर पडत होता, इतक्यांत एक तरुण व सुंदर स्त्री त्याला दिसली व तिनें नम्रपणानें त्याला विचारलें ' माझें एवढें पुस्तक घेतां काय ?' डिकच्या रुबाबावरून तिला वाटलें कीं हाच मुख्य प्रकाशक व डिकलाही प्रकाशकाची भूमिका साजरी करण्याची लहर लागली. म्हणून त्यानें तिला योग्य शब्दांत आश्वासन देऊन त्या रात्रीं प्रकाशकांच्या संघांचें वार्षिक भोजन होणार होतें त्यांत तुझ्या पुस्तकाची शिफारस करीन म्हणून सांगितलें. आतां आपले धनी एलिससाहेब या भोजनाला न येतील अशी काय युक्ति करावी याचा विचार करतां करतां त्यांस आयत्या वेळीं त्यांच्या स्नानघरांत कोंडून ठेवल्याशिवाय दुसरा उपाय नाहीं असें डिकला वाटलें. अखेर एलिससाहेबांस न्हाणीघरांत अडकवून डिकनें जमलेल्या सभासदांस त्यांचे नांवावर आपलेंच व्याख्यान ऐकविलें व त्या व्याख्यानांत दुपारीं भेटलेल्या फ्लोरेन्सच्या पुस्तकाची इतकी स्तुति केली कीं, भाषण संपतांच निरनिराळ्या प्रकाशकांनीं दहा लाख पुस्तकांच्या प्रती आगाऊ मागविल्या व याच सुमारांस न्हाणीघरांतून बाहेर पडलेल्या एलिस साहेबांस या दहा लाख पुस्तकांच्या मागणीचें इतकें कौतुक वाटलें कीं, त्यांनीं डिकला क्षमा करून आपला भागीदार केलें. डिकनें फ्लोरेन्सशीं लग्न केलें व '( It can be done ') या जगांत अशक्य कांहीं नाहीं हें स्वोदाहरणानें सिद्ध करून दाखविलें.

वर सांगितलेंच कीं या कथानकाची खरी गम्मत डिकची भूमिका घेणाऱ्या नटाच्या ॲक्टिंगमध्यें होती. त्याचे आत्मविश्वासपूर्ण हातवारे, त्याची आत्मविश्वासद्योतक ऐट; त्याचे आत्मविश्वासानें ओथंबलेले शब्द यांचा प्रेक्षकांच्या मनावर विलक्षण परिणाम होई. अर्धा खेळ झाल्यावर ' विश्रांति ' साठीं जो पडदा पडतो तो पडूंच नये असें सर्वांस वाटलें. बेलसाहेब धूम्रपान करण्यासाठीं बागेंत गेले.

' हॅलो मि. बेल् ! हाऊ डू यू डू ' म्हणून शब्द त्यांच्या कानीं पडले व त्यांच्या खांद्यास पाठीमागून कोणी स्पर्श केला म्हणून बेलसाहेब मागें वळून पाहतात तों नारायणराव कुळकर्ण्यांची मूर्ति !

कित्येक वर्षांच्या अंमलदारीच्या संस्कारामुळें नारायणरावानें केलेल्या फाजील लगटीस्तव बेलसाहेब त्यांचेवर अत्यंत रागावले असावेत असा भास क्षणभर त्यांच्या क्रुद्ध मुद्रेवरून कोणाचाही झाला असता. पण बेलसाहेब मोठे ' स्पोर्ट ' ( खेळाडू वृत्तीचे गृहस्थ ) होते. रागाची क्षणिक उत्पन्न झालेली लाट ओसरतांच त्यांनीं नारायणरावाला ओढून आपले शेजारीं बसवला व विचारलें—

" व्हॉट आर यू डुइंग वुइथ युअरसेल्फ हियर ? इकडे कोठें आलांत तुम्ही ?"

" तुम्ही आलांत तेथें मी आलों " नारायणराव म्हणाले. " बरें पण तुम्हांला एक विचारूं कां ? "

" हो हो ! खुशाल विचारा."

" साहेब, आमचें प्रमोशन आम्हांला कधीं मिळणार ? डिसोझा, रेगे, कामत हे सर्व माझे मागून कंपनीमध्यें आले ते आज चारशें, तीनशें रुपये कमावतात व मी आपला सव्वाशें दीडशेंवरच राबत आहे. लोक म्हणतात कीं, मी तुमचा फार लाडका आहे. लाडकेपणाची हीच फलश्रुति असेल तर नको तें लाडकेपण."

" बरें आहे ! बघूं ! घे, हा सिगार तर घे ! "

" 'बघूं' नको ! या बैठकीला काय तो निकाल लागला पाहिजे. "

" पण मी काय करूं ? तूं असा भित्रा, मेषमात्र, संकोचवृत्तीचा आहेस त्याला लोक काय करणार ? किती तरी मी तुझ्याबद्दल साउंडीकडे रदबदली केली पण तो म्हणतो कीं जोंपर्यंत कुलकर्णी असा अजागळ आहे तोंपर्यंत त्याला कांहींही प्रमोशन देतां कामा नये. ज्याला नुसतें प्रमोशन मागावयाचा धीर होत नाहीं त्याला प्रमोशन कसें मिळणार ? "

" हें तुम्ही माझ्या गतकालाविषयीं बोलत आहां. "

" पण तूं आज बदलला आहेस याला पुरावा काय ? "

" साहेब, तुमच्या अंगाला स्पर्श करील असा एक तरी कारकून आहे का आपल्या ऑफिसमध्यें ? आणखी तुमची खात्री पटेल असें मी काय करूं बोला ! कथानकांतल्या डिकप्रमाणें कांहीं अजब गोष्ट करून दाखवूं काय ? "

" मलाही वाटावयास लागलें आहे कीं तुझे स्वभावांत अलीकडे क्रांति झाली आहे. बरें, तूं हॅंगकॉंगच्या शाखेवर काम करावयास तयार आहेस काय ?"

" शनि, मंगळ या ग्रहांवर जाऊन तेथें आपल्या कंपनीची शाखा काढणें मला अधिक पसंत पडेल ! "

"शाबास ! कुलकर्णी ! आज तुला हॅंगकॅंगला जाण्याचें कारण नाहीं, पण पुढच्या आठवड्यांत लाहोरला आम्ही नवीन शाखा काढणार आहों तेथें तुला पाठवूं. पण पगाराचें काय ?"

"मला तीन आंकडी पगार आवडत नाहीं ! चार आंकडे बरे दिसतात !"

"खरें पण त्यांस जरा अवकाश आहे ! तूर्त पांचशें पुरतील ?

"पुरतील."

* * *

प्रोग्राम पुरा झाल्यानंतर नारायणराव भाड्याची मोटार बोलावणार इतक्यांत त्याचे हाताची बाही कोणी ओढली ! पहातो तों 'राव' ! त्यांनीं त्याला आपल्या मोटारींत ओढलें व ते म्हणाले 'विजयी वीराचें अभिनंदन असो !'

'अँ ? आपणास कसें कळलें ?' नारायणराव म्हणाला.

'I am all eyes ! and ears two !" मला हजार डोळे आहेत. व तितकेच कान आहेत. काय ? मी सांगितलेली युक्ति लागू पडली कीं नाहीं ?'

'आपण मला जन्माचें ऋणी करून ठेवलेंत.'

"तुमच्या केसचा विचार करतां" राव म्हणाले "मला तत्काळ दिसून आलें कीं ऑफिसच्या दरबारी वातावरणामध्यें बेलसाहेबांची गांठ घेऊन त्यांचेशीं आपलें योग्य गाऱ्हाणें सांगण्याचें तुम्हांला धैर्य कालत्रयीं होणार नाहीं ! म्हणून तुम्हांला मी सांगितलें कीं रिकाम्या वेळांत कीं, ज्यावेळीं मन प्रसन्न व आनंदित असेल तेव्हां बेलसाहेबांस तुम्ही भेटल्यास तुमचें कार्य होईल ! युरोपियन लोकां-मध्यें मोठमोठ्या व्यापारी उलाढालीची चर्चा नाटकमंदिरांत, नृत्यागारांत किंवा भोजनप्रसंगीं होत असते याचें कारण एवढेंच कीं या प्रसंगीं उभयपक्षांचे दिल खुले असतात, त्यांचा आत्मविश्वास जागता असतो. या जगांतील ऐश्वर्य, संपत्ति या सर्वांची प्राप्ति आत्मविश्वास असणाऱ्याच लोकांस होत असतात. जीं राष्ट्रें आत्मविश्वासयुक्त तींच पराक्रमी, तींच यशस्वी, तींच स्वतंत्र असा खुद्द निसर्गाचा नियम आहे ! या मुंबईतील प्रत्येक घर, प्रत्येक पेढी, प्रत्येक कारखाना यांचे मागें आत्मविश्वासाचा केवढा इतिहास आहे ! मी तर भाग्य = आत्मविश्वास असें

समीकरण मांडतों ! विशेष मौजेची व कांहींशी खेदाची गोष्ट म्हणजे कित्येक वेळां आत्मविश्वासाचीं साधनें जवळ असून केवळ योग्य मार्गदर्शन न झाल्यामुळें आपण त्यांचा उपयोग करूं शकत। नाहीं. रात्रीच्यावेळीं एका पानाच्या आड असलेली आपली सहचरी चक्रवाकास सांपडत नाहीं व म्हणून तो सारखा आक्रोश करीत असतो असें आपणास जें कवि सांगतात तें सत्यसृष्टीमध्यें सदैव अनुभवास येतें. धनाचा गुप्त ठेवा पायाळू माणसाला दिसतो तसा आत्मविश्वासाला अपयशाचे पोटांत यशाचें बीज दिसत असतें. निराशेच्या निबिड अंधकारामध्यें आत्मविश्वासाचा सूर्य उगवला म्हणजे भाग्योदय होतो. म्हणून उत्कर्ष मिळवूं इच्छिणाऱ्या तरुणांनों, आत्मविश्वास संपादन करा. ”



# वानप्रस्थाश्रम.

लेखिका—**सौ. जानकीबाई रानडे.**

" Hearty Congrats. Passed with First Class Hons ( मनःपूर्वक अभिनंदन. पहिल्या वर्गांत पास ) ही तार वाचल्याबरोबर वसंतरावांचा आनंद पोटांत न मावून ते एकदम " अग ए ! अग ए ! " असें दोनतीनदां म्हणाले. हातांत असलेलें काम अर्धेंच टाकून मालतीबाई बाहेर आल्या व त्यांनीं मोठ्या औत्सुक्यानें विचारलें. " काय ? तार आली ? " " अग, हो ! आपला मधुकर पहिल्या वर्गांत पास झाला. " हर्षानें व प्रेमानें पुलकित झालेले वसंतराव पहिल्या ह्या शब्दावर जोर देत म्हणाले.

* * *

**वा**मनपुरांत वसंतराव वाटवे ह्या नांवाचे एक प्रख्यात सरकारी डॉक्टर होते. ह्यांच्या पत्नीचें नांव मालतीबाई. ह्यांचा मधुकर हा शेंकडों ' नवस आयास ' ' उपास तपास ' करून झालेला एकटा एकुलताएक मुलगा. वसंतरावानीं मधुकराच्या शिक्षणाच्या बाबतींत शक्य तेवढी काळजी घेण्यांत कांहींमात्र कसूर केली नाहीं. व मधुकरही " मनीऑर्डरीचा मनुष्य " न राहतां त्यानें बी. ए. मध्यें पराकाष्ठेचा प्रयत्न करून पहिला वर्ग पटकावला. ह्यामुळें वसंतरावांना

वरील तार वाचून "आज आपण धन्य झालों" असें वाटलें असल्यास नवल नाहीं. वसंतरावांची सरकारी नोकरी भरत आली होती व त्यांना लवकरच पांचशें रुपये पेन्शन व्हावयाचें होतें. पेन्शन व्हावयाच्या आंत मधुकराचें लग्न जमल्यास करावें असें त्यांच्या मनांत फार होतें; व मालतीबाईंनाही मधुकराच्या दोन हाताचे चार हात झालेले केव्हां पाहीन ह्याबद्दल फार उत्कंठा लागली होती. नुसती उत्कंठाच नव्हे तर त्यांनीं आपली भावी सूनही ठरवून ठेवली होती !

ह्या भावी सुनेचें नांव लीला. ही वसंतरावांचे बालपणचे जिवलग स्नेही विष्णुपंत यांची एकुलती एक मुलगी. विष्णुपंत लीलेच्या लहानपणींच वारल्यामुळें लीलेच्या आईनेंच तिची शिक्षणाची सर्व व्यवस्था केली. लीला वरचेवर वसंतरावांच्या घरीं येत असे व तेही तिला आपुलकीच्या भावनेनें वागवीत. मधुकर व लीला एकमेकांशीं मनमोकळेपणानें बोलत असत व देशाच्या सद्यःस्थितीबद्दल त्यांच्यामध्यें वरचेवर वादविवाद होत असे. असाच एकदा वादविवाद चालला असतां लीला म्हणाली "पुरुषांनीं पराक्रमाचा पोकळ टेंभा कितीही मिरविला तरी स्त्रियांची सर त्यांना यावयास सात जन्म घ्यावे लागतील ! मधुकर, तुला ठाऊक असेल कीं हल्लींच्या चळवळींत महात्मा गांधींची सर्व मदार भगिनीवर्गावर आहे."

"एकंदरींत आपल्या म्हणण्याच्या पुष्टीकरितां तुला पुरुषाचाच आधार घ्यावा लागला म्हणायचा ! अग लीले ! वृक्षावांचून वेली व्यर्थ !" मधुकर हसून म्हणाला.

"कसलीही गहन गंभीर गोष्ट हसून चेष्टेवारी न्यावयाची पुरुषांना मेलं जन्मजात खोडच आहे. स्त्रियांच्या समतावादानें संतप्त झालेले पुरुष सदाकद स्त्रियांना कमी लेखण्याचा प्रयत्न करतात." लीला रागाचा आविर्भाव आणून म्हणाली.

"लीले ! रागाचें रूपांतर अनुरागांत होत असतें. तूं स्वतःच सांग कीं वृक्षावांचून वेली व्यर्थ हें खोटें आहे कां ?" लीलेकडे हास्यपूर्ण दृष्टि लावून मधुकर बोलला.

"इश्श !" लीलेनें लाजून खालीं मान घातली.

*　　*　　*

मधुकर व लीला ह्यांचा विवाह होण्याचें निश्चित झालें. वसंतरावांनीं आपल्या एकुलत्याएक मुलाच्या विवाहाकरितां एकाद्या बड्या संस्थानिकाला शोभेल अशा प्रकारचा थाट केला होता. पाण्यासारखा पैसा खर्चून मधुकरच्या विवाहाची वसंतरावांनीं तयारी चालविल्यामुळें वामनपुरांत हा विवाह म्हणजे 'न भूतो न भविष्यति' असा होणार होता. हीन दीन लीन झालेल्या भारतभूच्या पायांत पारतंत्र्याच्या बेड्या पडल्यामुळें मालतीबाईंना मनांतून वाटत होतें कीं सर्व थाटमाट काट करावेत, पण—बी. ए. त पहिला वर्ग मिळून कॉलेजची फेलो-शिप मिळालेला एकुलताएक मुलगा—एकुलतेंएक कार्य—कीड लागेल इतका पैसा—थाटामाटाचा विवाह करण्याची पतिमहाराजांची इच्छा—व शेवटीं स्त्रीहृदय—इतक्या गोष्टींचें प्राबल्य होऊन त्यांचा नाइलाज झाला. विवाहाची तयारी जोरांत चालली होती. पण दैवाच्या मनांत तिसरेंच होतें. "मनसा चिंतितं कार्यं दैवमन्यत्र चिंतयेत्" ही म्हण यावेळीं प्रत्ययास आली.

विवाहाला चार दिवस अवकाश होता. आपल्या कॉलेजच्या प्रिन्सिपालला सांगून मधुकर माधवपुरीहून वामनपुराकडे मोटारनें येत होता. मधुकरचा आनंद दैवाला पाहवला नाहीं. वाटेंत जोराचा मोटार ॲक्सिडंट होऊन मधुकरला जबर दुखापत झाली. ताबडतोब त्याला वामनपुराच्या सरकारी इस्पितळांत आणलें. वसंतराव व मालतीबाई ह्यांचा आनंद पार वितळून गेला. त्यांनीं मानवी प्राण्याला जेवढे जेवढे प्रयत्न करणें शक्य आहे, त्या सर्व प्रयत्नांची पराकाष्ठा केली. पण दैवच प्रतिकूल झाल्यावर प्रयत्नांना तरी कसें यश येणार? लीला अहोरात्र मधुकराजवळ बसून त्याची सेवा करीत होती. पण मधुकरला बरें वाटण्याऐवजीं घटकोंघटकीं त्याची प्रकृति क्षीण होत चालली. आशेचा अंकुर अभेद्य असल्यामुळें लीलेला वाटत होतें कीं मधुकर ह्यांतून खास वांचेल. पण दैवदुर्विलासापुढें दीन दुबळ्या आशेचा अंत होत असतो हें बिचाऱ्या लीलेला अद्यापि कळावयाचें होतें.

"मी जगलों वाचलों तर लीले! तुझ्या गळ्याची शपथ घेऊन सांगतों कीं तुझ्याबरोबर देशाकरितां झटेन." मधुकर अडखळत म्हणाला.

"हें काय? अक्षरसुद्धां बोलूं नये असें डॉक्टरांनीं सांगितलें आहेना?" लीला भीत भीत म्हणाली.

" होय ! डॉक्टरांचे शब्द खरे होणार—

मी आतां मरणार... मी मेलों तर तूं दुसरें लग्न... " लीलेनें मधुकराच्या तोंडावर हात ठेवून त्याला पुढें बोलूं दिलें नाहीं.

" लीले, ये, " मधुकर जरा वेळानें म्हणाला. लीलेनें मधुकरच्या गळ्याला घट्ट मिठी मारली.

योगायोग असा कांहीं चमत्कारिक होता कीं ज्यावेळीं लीलेनें मधुकरच्या गळ्यांत विवाहमाला घालावयाची, बरोबर त्याचवेळीं लीलेनें मधुकरच्या गळ्याला घट्ट मिठी मारली व मधुकराचें प्राणोत्क्रमण झालें. दुःखानें लीलेचें हृदय शतशः विदीर्ण झालें. वसंतराव व मालतीबाई ह्यांचा हंबरडा फत्तराला सुद्धां पाझर फुटेल असा होता.

* * *

वरील गोष्टीला कांहीं दिवस लोटले होते. हृदयाच्या हृदयांतील भाषेला पारखे असणाऱ्या या 'व्यावहारिक' विश्वांत वावरणारी लीलेची आई—सुशीलाबाई आपल्या मुलीजवळ तिच्या लग्नाविषयीं गोष्ट काढीत होती. विवाहाची गोष्ट तर बाजूलाच राहिली पण नुसत्या विवाहाच्या विचाराचें वारेंसुद्धां मनाला शिवणें म्हणजे महापाप असें वाटणाऱ्या लीलेनें म्हटलें. " आई ! माझें लग्न झालें नाहीं असें कां तुला वाटतें ? लग्न झालें ! ते गेले ! वैधव्य कपाळीं आलें ! आतां कसलें लग्न ? अन् कसला विवाह ? "

" बाळ ! जगाच्या दृष्टीनें तुझें लग्न झालें नाहीं. तूं अशीच राहिलीस तर तुला जग हसणार नाहीं कां ? " सुशीलाबाई गहिंवरून म्हणाल्या.

" अक्षता पडल्या असत्या आणि ते गेले असते, व मी अशी राहिलें असतें तर जग मला हंसलें असतें कां ? " लीलेनें विचारलें.

सुशीलाबाईंनीं नकारार्थी मान हलविली.

" निर्जीव, निस्तेज निःशब्द अक्षतांनीं आमचा विवाह होण्यापेक्षां, जिवंत तेजस्वी बोलक्या अश्रूंनीं आमचा विवाह झाला असतां, आई ! आतां लग्नाची गोष्ट कशाला काढतेस ? विवाह म्हणजे दोन देहांचा समागम नसून दोन हृदयांचें मीलन होय. हृदयाचें दान एकदांच देतां येतें आणि तेंही एकाच मनुष्याला. हृदयाचें एकदां दान दिल्यावर दुसऱ्यांदां दुसऱ्याला दान, आई !

कोणची सती देईल ? " लीलेला पुढें बोलवेना. सुशीलाबाईंनाही गहिंवर येऊन त्यांनीं घट्ट तिला पोटाशीं धरिलें. कांहीं वेळ दोघीही स्तब्ध राहिल्या. थोड्या वेळानें सुशीलाबाईंनीं विचारलें— " बाळ ! तूं पुढें काय करणार तें तरी सांग. "

" आई ! मालतीकाकूंच्या बरोबर ह्या बाबतींत मी पूर्ण विचारविनिमय करून असें ठरविलें आहे कीं, माझा गृहस्थाश्रम कसा का होईना, पण संपल्यामुळें मी वानप्रस्थाश्रम स्वीकारणार. " लीलेनें उत्तर दिलें.

" म्हणजे काय ? मला तुझ्या म्हणण्याचा अर्थ कळला नांहीं. " सुशीलाबाई आश्चर्यानें बोलल्या.

" वानप्रस्थाश्रमाचें मंदीर त्यागाच्या पायावर उभारलें आहे. पूर्वीच्या काळीं विधवा स्त्रिया आपलें सर्वस्व कुटुंबाला वाहून स्वतः अनाथ असल्या तरीं पोराबाळांना सनाथ करीत असत. देशाला कुटुंब मानून मी त्याला माझें सर्वस्व देणार व देशाकरितां देह देणार.... "

लीला असें बोलत असतां तिला मध्येंच थांबवून सुशीलाबाई म्हणाल्या " लीले ! हा मार्ग वाटतो तितका सोपा नाहीं. स्वस्थ ' हरि हरि ' म्हणत बसण्यापेक्षां काट्याकुट्यानें भरलेल्या असल्या अवघड अडचणीच्या आडवाटेनें कशाला जातेस ? "

" देशाला आग लागली असतां ' हरि हरि ' म्हणण्यानें हरि येईल का ? मार्ग अवघड, काटेकुटे बोचतील म्हणून गप्प बसले असतां हिंदभूच्या पायांतलि पारतन्त्र्याच्या लोखंडी बेड्या सुटतील का ? देशाला देव मानून देशाकरितां देह दिला तर माझ्यावर तो जगचालक परमेश्वर प्रसन्न होणार नाहीं कां ? " देश-भक्तीचें अंगांत वारें येऊन लीला बोलत होती.

" आजकाल कैक स्त्रिया आरंभीं आरंभीं देशभक्ति करतात, पण पुढें पुढें देशभक्ति दूर राहून आपल्या शीलावर शिंतोडे उडवून घेतात; हें तुला माहीत नाहीं कां ? " सुशीलाबाईंनीं रोखठोक विचारलें.

" आई ! असा आडवा तिडवा आडमुठा घास कशाला घेतेस ? प्रत्यक्ष मचि कांहीं दिवस देशकार्य करून बिघडलें तरी केलेलें कार्य—कितीही कमी असलें—तरी फुकट जाणार नाहीं. फूल नाहीं फुलाची पाकळी—जेवढी देशसेवा माझ्या हातून होईल तेवढी मी करीन. शीलावर शिंतोडे उडवून घेणाऱ्या

ख्रियांचें पूर्वीचें आचरण कांहीं ‘ निराळें असतें. ’ तसें आई ! माझें आहे असें तुला वाटतें कां ? आई ! हीन दीन अनाथ झालेल्या तुझ्या एकुलत्याएक लाडक्या मुलीचे एवढे लाड पुरीव आणि मला परवानगी दे. ” असें म्हणून लीला आईला मिठी मारून रडूं लागली. व सुशीलाबाईंनींही मोठ्या कष्टानें लीलेला संमती दिली.

* * *

वसंतरावांना पांचशें रुपये पेन्शन झालें होतें. मधुकर दिवंगत होऊन सुमारें एक वर्ष झालें होतें. आतां एकदां चांगल्यापैकीं मुलगा दत्तक घेऊन राहिलेले दिवस ‘ हरी हरी ’ म्हणत काढावे असें वसंतरावांच्या मनांत वरचेवर येत असे, पण हा बेत: मालतीबाईंना अजीबात पसंत नसे. त्यांच्याच संमतीनें लीलेनें आपला बेत ठरविला होता. व मालतीबाईंनाही वाटत होतें कीं, आपणही देशाकरितां कांहीं तरी करावें. रात्रंदिवस विचार करून काय करावयाचें ह्याबद्दल त्यांनीं आपल्या मनाशीं निश्चय केला. एकदां बोलतां बोलतां वसंतराव म्हणाले— “ मी जेव्हां जेव्हां दत्तकाचा प्रश्न काढतों तेव्हां तेव्हां तूं कांहीं तरी काढून विषय टाळतेस, असें कां ? आपली एवढी मोठी इस्टेट—ह्याचा उपयोग कसा करावयाचा ? तूं एवढी मोठी धार्मिक !-मग दत्तकाच्या आड कां ? ”

“माझ्या मनांत काय आहे व माझें मत काय आहे तें मी आपल्याला सांगेन, पण आपण रागावणार नाहीं असें आधीं वचन दिलें पाहिजे. ” मालतीबाई शांतपणानें बोलत होत्या.

“ मी तुझ्यावर आजपर्यंत कधीं रागावलों म्हणून आज वचन मागतेस ? तरी पण वचनच पाहिजे असेल तर हें घे वचन ! ” असें म्हणून वसंतरावांनीं मालतीबाईंच्या हातावर हात मारला.

“ हें पहा, माझें म्हणणें कडेपर्यंत ऐकून घ्यावें, म्हणजे गैरसमज होणार नाहीं. आपण येथून वीस कोसांवर असणाऱ्या ‘ कृष्णपुर ’ ह्या खेडेगांवीं जाऊन राहूं या. तेथें धर्मार्थ दवाखाना काढून एक मोफत प्राथमिक शिक्षणाची शाळाही काढूं या. आपल्या सर्व इस्टेटीचा उपयोग तें ‘ कृष्णपुर ’ खेडें सुधारण्याकडे करूं या. यांतच धर्म आहे, यांतच देशसेवा आहे. यांतच सर्व कांहीं आहे. मधुकरच्या नांवानें शाळा व दवाखाना चालविल्यानंतर आपलें नांव

चालविण्याकरितां आणखी निराळा दत्तक तो कशाला पाहिजे ? खेड्यापाड्यांची उन्नति करण्यानेंच पारतंत्र्यांत खिचपत पडलेल्या हिंदभूची बहुमोल सेवा होणार आहे. सर्व पेन्शनर लोकांनीं जर चंग बांधला तर खेड्यापाड्यांची उन्नति होण्यास कितीसा वेळ लागणार आहे ? हल्लीं वानप्रस्थाश्रम नाहींसा झाला आहे. पण असें करण्यानें वानप्रस्थाश्रमाचें पुनरुज्जीवन होऊन देशाचें दैन्य फिटेल. खेड्यांची उन्नति झाल्याशिवाय आपल्या देशाची सर्वांगीण उन्नति होणें कालत्रयीं शक्य नाहीं. खेड्यांतील लोक आपलेच बंधु आहेत. त्यांना बंधुप्रेमानें वागवूं या. ते अडाणी आहेत, त्यांना सुज्ञ करूं या. त्यांच्या सुखसोयी पाहूं या. त्यांना पठाणांच्या तडाक्यांतून सोडवूं या. यांतच देवपूजा आहे, यांतच तपश्चर्या आहे, यांतच धर्मपालन आहे, यांतच देशसेवा आहे, यांतच दत्तकविधी आहे... " कां माझें म्हणणें आपल्याला पटतें कां ? "

असें म्हणून मालतीबाई वसंतरावांच्याकडे टक लावून पाहूं लागल्या.

" हा वानप्रस्थाश्रम तुला कोणीं शिकविला ? " वसंतरावांनीं थोडेंसें हसून विचारलें.

" हा वानप्रस्थाश्रम नव्हे असें कोण म्हणेल ? कालमानाप्रमाणें बाह्याकृति बदलतील पण अंतर्गत तत्त्व अबाधित असतें. चार आश्रमांचीं बाह्यरूपें जरी बदललीं तरी त्यांचीं अंतर्गत तत्त्वें मात्र नेहमीं वास करणार ह्यांत तिळमात्र शंका नाहीं. मीं सांगितलेला वानप्रस्थाश्रम आणि पूर्वीचा वानप्रस्थाश्रम ताडून पहा, आपल्याला सकृद्दर्शनीं विरोध दिसेल, पण तत्त्वतः ते एकच आहेत असें आपल्याला कळून येईल. " आपण जें बोललों त्याचा काय परिणाम होतो हें पाहाण्याकरितां मालतीबाई थांबल्या, तेव्हां वसंतराव म्हणाले—

" तूं बोलतेस ह्यांत तथ्य बरेंच आहे. पण हा मार्ग तुला वाटतो तितका सोपा नाहीं. मधुकर गेल्यापासून मला कशांतच सुख वाटत नाहीं. शिवाय मी शहरगांवीं वाढलेला; तेव्हां मला खेड्यांत जाऊन त्या लोकांची उन्नति करतां येईल किंवा नाहीं ह्याची शंकाच आहे. माझें आतां वय झालें आहे; माझ्या अंगात पूर्वीचा जोर आतां राहिला नाहीं. "

" तें सर्व खरें आहे. पण इच्छा आहे तेथें मार्ग आहे. काय आपल्याला शक्य

असेल तेवढीच आपण देशसेवा करूं या. महात्माजी साठी उलटल्यानंतर सुद्धां देशसेवा करत नाहींत का? आपल्या मधुकरची सुद्धां शेवटची इच्छा देशसेवा करणें हीच होती. कांहींही करून माझ्याकरितां आपण एवढी गोष्ट कबूल कराच. आपलें उदाहरण हजारों पेन्शनर लोकांना मार्गदायी होईल. त्यायोगानें मधुकरच्या आत्म्याला शांति मिळेल, व आपलेंही ऐहिक व पारलौकिक कल्याण झाल्याशिवाय राहणार नाहीं. मधुकरच्या शेवटच्या इच्छेप्रमाणें लीलेनें सुद्धां देशाकरितां देह वाहण्याचा निश्चय केला आहे. व स्वातंत्र्यसंग्रामांत उडी घेतली आहे. व आपणही मी सांगितल्याप्रमाणें वागूं या. पूर्ण विचार करून मी आज आपल्याला हें सांगतें आहे. आजपर्यंत आपण माझी कोणतीच इच्छा मोडली नाहीं, तेव्हां ही सुद्धां इच्छा पूर्ण करावी. कृष्णपुरांत गेल्यावर आपल्या करितां मी शक्य तेवढी मेहनत घेईन व आपल्याला जेणेकरून त्रास होणार नाहीं ह्याबद्दल शक्य तेवढी काळजी घेईन."

*  *  *

**मा**लतीबाईंच्या भाषणाचा उपयोग जसा व्हावयास पाहिजे होता तसा झाला. लौकरच वसंतराव मालतीबाईंच्या समवेत कृष्णपुरांत रहावयास गेले व तेथें "मधुकर औषधालय" व "मधुकर बालकमंदिर" ह्या दोन उपयुक्त संस्था त्यांनीं गोरगरिबांकरितां मोफत सुरू केल्या. अशा तऱ्हेनें वसंतराव व मालतीबाई ह्यांचा वानप्रस्थाश्रम सुरू झाला. कृष्णपुरच्या उन्नतीकरितां आपल्या सर्व इस्टेटीचा विनियोग करणारे वसंतराव व मालतीबाई तेथील लोकांना देवमाणसाप्रमाणें वाटलें यांत नवल कसलें?



# जगदीश शास्त्र्यांचें स्वप्न !

लेखक—विहारी.

त्या वेळीं जगदीशशास्त्र्यांनीं चहूंकडे चांगलाच नांवलौकिक कमाविला होता. ब्राह्मणजातींत जन्मल्यामुळें 'वर्णानां ब्राह्मणो गुरुः' या उक्तीप्रमाणें जरी ते सर्वश्रेष्ठ होते, तरी गुरु होण्याची त्यांची मुळींच लायकी नव्हती. ते जरी स्वतःला 'शास्त्री' म्हणून संबोधीत असले तरी कुठल्याही शास्त्राचा त्यांना गंधही नव्हता. नाहीं म्हणायला त्यांनीं पाकशास्त्रांत सिद्धि संपादन केली होती आणि त्याच सिद्धीच्या बळावर ते बॅरिस्टर शर्मांच्या बरोबर ब्रह्मदेशांत गेले होते. १८९० सालीं बॅ. शर्मा रंगून शहरीं आले आणि तेव्हांपासून अवघ्या पांचच वर्षांत त्यांनीं इतक्या उत्तम रीतीनें आपला जम बसवला कीं इतर युरोपियन बॅरिस्टरांइतका त्यांना सर्वत्र मान मिळूं लागला. अर्थातच बॅ. शर्मांना आपली रहाणी युरोपियन तऱ्हेची करावी अशी इच्छा झाल्यास नवल नव्हतें. त्यांनीं हळूं हळूं युरोपियन खाना सुरूं केल्या-

मुळें जगदीशशास्त्रयांची उपयुक्तता अर्थातच कमी झाली. अखेर जगदीश-
शास्त्रयांच्या ऐवजीं एका खानसामाची नेमणूक करून बॅ. शर्मानीं त्यांना नोकरी-
वरून कमी केलें. परदेशांत नोकरीसाठीं म्हणून आलेल्या शास्त्रयांवर ही मोठीच
आपत्ति आली. पण बॅ. शर्मा स्वभावानें उदार व अंतःकरणानें थोर असल्यामुळें
त्यांनीं जगदीशशास्त्रयांना पूर्वीचाच पगार पेन्शनच्या रूपानें चालू ठेवण्याचें वचन
दिलें. यामुळें काम न करतां भरपूर पगार मिळूं लागल्यामुळें शास्त्रीबुवांनीं रंगून
शहरीं इतर उद्योग आरंभण्यास सुरवात केली. ते जातीनें ब्राह्मण होते, इतकेंच
नव्हे तर एका भिक्षुकाच्या कुळांत ते जन्माला आले होते. यामुळें त्यांच्यावर
आपल्या पिढीजाद धंद्याचा थोडातरी छाप बसल्याशिवाय राहिला नव्हता. छापील
पोथ्यांच्या आधारें ते मंत्रतंत्र म्हणून भिक्षुकी करीत. सुरवातीसुरवातीला त्यांच्या
पदरांत फारच थोडें पडत असे. पण जसजशी त्यांची ओळख वाढूं लागली
तसतशी त्यांची प्राप्तीही वाढूं लागली. अखेर जगदीशशास्त्री हें एक मोठें प्रस्थ
होऊन बसलें. १९०९ सालीं तर शास्त्रीबुवांची चांगल्या सधन लोकांत गणना
होऊं लागली. ना बायको ना पोर अशा अवस्थेमुळें त्यांचा खर्चही अगदीं
बेताचाच होता. त्यामळें त्यांची माया एक लाखापर्यंतची असावी असा कांहीं-
कांचा तर्क होता. तर कांहीं लोक म्हणत, निदान पाऊण लाखाला मरण नव्हतें.
भिक्षुकी साधून सावकारीही आरंभल्यामुळें शास्त्रीबुवांचा पैसा फुगत चालला.
ह्या वाढत्या पैशाला जर वेळींच तोंड फोडलें नाहीं तर मोठा प्रसंग गुदरल्या-
शिवाय रहाणार नाहीं असा आपल्या मनाशीं विचार करून जगदीशशास्त्री
स्वतःसाठीं वधू मिळविण्याच्या खटपटीस लागले. त्यांचें वय १९०९ सालीं
जरी त्रेपन्न वर्षांचें होतें तरी ते आपल्याला नवयुवकच समजत असत. त्यांनीं
आपल्याकडून खूप खटपट केली पण ब्रह्मदेशांत वधू मिळणें त्यांना अशक्यप्रायच
दिसूं लागलें. त्यांच्याजवळ पैसा होता तरी त्यांच्यासारख्या सड्या फटिंगाला
मुलगी देतो कोण ? त्यांतून ते ब्रह्मी आईबाप, ते असला जांवई कसा पत्करणार ?
त्यांतून जगदीशशास्त्री पडले मद्रासी अय्या. त्यामुळें तर त्यांची कुठेंच डाळ
शिजेना. अखेर आपल्या गांवीं गेल्याशिवाय लग्नगांठ बसणार नाहीं. अशी पक्की
खूणगांठ बांधून त्यांनीं आपल्या वयाच्या त्रेपन्नाव्या वर्षीं ब्रह्मदेशाला रामराम
ठोकून तंजावर प्रांतांतल्या आपल्या चेन्नगोड्ड गांवीं प्रयाण केलें. तेथें एकादी

आपल्या जातीची बायको करून जमलेल्या पुंजीवर सुखानें संसार करावा असें त्यांनीं आपल्या मनाशीं ठरवून ठेवलें होतें. तेथें आल्यावर त्यांनीं बराच प्रयत्न केला पण कुठेंच संधान जुळेना, तेव्हां एकादा मुलगा दत्तक घेऊन आपलें नांव पुढें चालविण्याची त्यांनीं योजना केली. इतक्या अवधींत कुंभकोणम् महापर्वणी झाली. अनायासें महापुण्य पदरांत पडण्याचा योग प्राप्त झाल्यामुळें जगदीशशास्त्र्यांनीं कुंभकोणमला जाण्याचें ठरविलें. तेथें गेल्यावर त्यांच्या आयुष्यांत जें परिवर्तन घडून आलें त्याची त्यांनाच काय पण कुणालाही कल्पना नव्हती.

* * *

जगदीशशास्त्र्यांची नागेश्वर अय्यरशीं योगायोगानेंच गांठ पडली. नागेश्वर अय्यर हा स्वतःला एका इन्शुअरन्स कंपनीचा एजंट म्हणवून घेत असे, व आपला जवाहिऱ्याचाहि व्यापार आहे असें तो लोकांस भासवीत असे. अर्काट जिल्ह्यांत त्याचें घरदार असून कलकत्ता, मद्रास इत्यादि ठिकाणीं त्याचें नेहेमीं जाणें येणें असे. त्याच्या तीन मुलींपैकीं दोघींचीं लग्नें झालीं होतीं, पण अद्याप एकीचें व्हावयाचें राहिलें होतें. तिघीहि रूपानें सुस्वरूप व कोणाचेंहि लक्ष वेधून घेतील अशा होत्या. त्यांतल्या त्यांत सर्वांत धाकटी अधिक सुंदर होती. तिचें नांव रुक्मिणी. ती जरी वयानें 'चवदाची' होती तरी गायनवादनादि कलांत तिनें चांगलेंच प्राविण्य संपादन केलें होतें. नागेश्वर अय्यरनें जगदीश-शास्त्र्यांचें चालत आलेलें स्थळ पाहून रुक्मिणीला त्यांच्या पदरांत टाकावयाचें ठरविलें. शास्त्रीबुवांना तर स्वर्गाची दोरी हातीं आल्यासारखें वाटलें. त्यांचें वय जरी त्रेपन्न वर्षांचें होतें तरी त्यांनीं अद्याप चाळिशी ओलांडली नसावी असें कुणालाही वाटलें असतें. कारण त्यांची शरीरयष्टि चांगली मजबूत होती. नागेश्वर अय्यर याचवेळीं नेमका इन्शुअरन्स कंपनीच्या एका भानगडींत सांपडल्यामुळें त्याला ताबडतोब ६००० रुपयांची आवश्यकता होती. हे पैसे भरल्याशिवाय आपण जिवंत राहूं शकत नाहीं असें अय्यरनें जगदीशशास्त्र्यांना डोळ्यांत पाणी आणून सांगितल्यामुळें त्यांना बायकोसाठीं सहा हजार रुपयांवर पाणी सोडावें लागलें. अखेर कोणत्याहि प्रकारचा गाजावाजा न करतां एका दिवसांत शास्त्री-

बुवांचा लग्नसोहोळा कसाबसा पार पडला आणि नागेश्वर अय्यरला जरूरीचें काम असल्यामुळें तो दुसऱ्याच दिवशीं कलकत्त्यास निघून गेला.

लग्न आटोपल्यावर आपल्या नवपरिणित वधूसह जगदीशशास्त्री रंगूनला गेले. तेथें त्यांचा पूर्वीपासून चांगला जम बसला असल्यामुळें चेन्नगोड्डला रहाण्यापेक्षां ब्रह्मदेशांत राहूनच अधिक कमाई करतां येईल असा मनाशीं विचार करून त्यांनीं हिंदुस्थानला व जन्मभूमीला रामराम ठोकला व ब्रह्मदेशांतच कायमचें स्थायिक होण्याचें त्यांनीं निश्चित केलें. ब्रह्मदेशांत आल्यावर त्यांनीं आपल्या सासऱ्याची पुष्कळ चौकशी केली पण त्याचा कोठेंच तपास लागण्याचें चिन्ह न दिसल्या-मुळें त्यांनीं त्याचा नाद सोडून दिला. त्यांचे ब्रह्मदेशांतले दिवस मोठ्या आनंदांत जाऊं लागले.

*
* *

[ २ ]

पुढें दोन वर्षांतच जगदीशशास्त्र्यांना पुत्रजन्मोत्सवाचा सोहळा साजरा करण्याचा सुप्रसंग येऊन ठेपला. दत्तक पुत्राकरवीं पारलौकिक कल्याण संपादन करण्याचा त्यांचा जो पहिला हेतू होता त्याची आतां मुळींच जरूरी राहिली नाहीं. त्यांचा औरस पुत्र रामचंद्र यानें आपल्या बाललीलांनीं मातापित्यांचें लक्ष वेधून घेतलें व तो त्या छोट्याशा कुटुंबांत आनंदाचा ठेवा होऊन राहिला.

पण हा आनंद फार दिवस उपभोगण्याचें सौख्य जगदीशशास्त्र्यांच्या ललाटीं लिहिलें नसल्यामुळें त्यांचें लौकरच दुर्दैव ओढवलें. त्यांची नूतनपरिणित पत्नी जी रुक्मिणी तिनें गेलीं दोन वर्षें आपल्या वृद्ध पतीची सेवाचाकरी करून त्याला प्रसन्न केलें होतें. आपल्या पातिनिष्ठेनें त्याचें जीवन आनंदमय केलें होतें. पण अलीकडे तिच्या वृत्तींत बरीच चलबिचल झालेली दृष्टीस पडूं लागली. तिच्या-बद्दल शेजाऱ्यापाजाऱ्यांत भलभलत्या कंड्या पिकूं लागल्या. तिच्या गैरवर्तनाचा जरी प्रत्यक्ष पुरावा कोणालाच दाखावितां आली नाहीं तरी मुळांत कांहींतरी पाणी मुरत असलें पाहिजे असें प्रत्येकास वाटूं लागलें. खुद्द जगदीशशास्त्र्यांच्या कानांवरही हे प्रवाद गेले व ते साशंक वृत्तीनें तिच्या प्रत्येक गोष्टीकडे पाहूं लागले. रुक्मिणीही तितक्याच बेदरकारपणें वागूं लागली. पतिपत्नींच्या मधून

विस्तव जाईनासा झाला येथपर्यंत पाळी आली. अखेर एके दिवशीं अगदीं कळस झाला. आपल्या अंगावरचे सर्व मौल्यवान् दागिने व हातीं सांपडलेली रोकड घेऊन त्या दिवशीं रात्रीं रुक्मिणी जी नाहींशी झाली ती झाली. शास्त्रीबुवांनीं जंगजंग पछाडलें, प्रयत्नांची पराकाष्ठा केली, पण तिचा कोठेंच थांग लागेना. रुक्मिणीचा शोध लागणें जेव्हां अगदीं दुरापास्त होऊन बसलें, तेव्हां त्यांनीं तिचा नाद सोडला व आपलें सर्व लक्ष रामचंद्रावर केंद्रित केलें. रामचंद्र हा जात्याच बुद्धिमान् मुलगा असल्यामुळें शिक्षणांत त्याची भराभर प्रगति होऊं लागली. एकामागून एक इयत्ता टाकीत तो आपल्या एकोणिसाव्या वर्षी कलकत्ता विद्यापीठाचा बी. ए. झाला १९१८ मध्यें त्याच्या आईनें त्याचा त्याग केल्या-पासून जगदीशशास्त्र्यांचा तो अगदीं जीव कीं प्राण होऊन बसला होता. 'गृहं तु गृहिणीहीनं कांतारादतिरिच्यते' असा जरी त्यांना पदोपदीं अनुभव येत होता तरी पुत्रमुखदर्शनानें त्याच्या अंतःकरणांतील सर्व काळोख नाहींसा होऊन त्यांना पुनरुज्जीवन प्राप्त झाल्याप्रमाणें वाटत असे. ते अजूनही भिक्षुकी करीत होते तरी रामचंद्राकडे त्यांचें यत्किंचितही दुर्लक्ष नसे. १९३० सालीं रामचंद्र बी. ए. झाल्यावर ते पुन्हां एकदां आपली जन्मभूमि पहाण्याच्या इराद्यानें त्याला घेऊन हिंदुस्थानांत आले.

* * *

**आ**तां जगदीशशास्त्री जरी पाऊणशेच्या घरांत आले तरी त्यांच्या अंगांतला उत्साह तिळमात्रही मावळला नव्हता. वेळप्रसंगीं पंधरा वीस मैल चालण्याची त्यांची हिंमत आजही कायम होती. ते स्वतःचीं कामें स्वतः करीत, स्वतःचीं धोतरें धुवीत, इतकेंच काय पण कधीं कधीं पाणीही आणीत. हा प्रचंड उत्साह म्हणजे अखंड ब्रह्मचर्याचा प्रत्यक्ष परिणाम होय असें कांहीं म्हणत असत.

जगदीशशास्त्र्यांचा एक दूरचा नातेवाईक मद्रासला प्रसिद्ध वकील होता. त्याचें नांव चंद्रशेखरम् सीतारामय्या. तो चांगला नाणावलेला वकील असून त्याची प्राप्तीही बरीच मोठी होती. त्याच्याकडे एक दिवस जगदीशशास्त्री रामचंद्रासह आले. वकीलसाहेबांनीं व त्यांच्या पत्नीनें बरेच दिवसांनीं आलेल्या ह्या श्रीमंत पाहुण्यांचे मोठ्या उत्साहानें स्वागत केलें. चंद्रशेखरम् यांना पार्वती नांवाची एकुलती एक मुलगी होती. ती सध्यां उपवर झालेली असल्यामुळें वकीलसाहेबांच्या

पत्नीचें लक्ष आयत्या चालून आलेल्या स्थळाकडे वेधल्यास नवल नव्हतें. रामचंद्र स्वरूपानें देखणा होता, बी. ए. झालेला होता आणि श्रीमंत बापाचा एकुलता एक लेक होता. मग आणखी काय पाहिजे? 'रामचंद्राला आय्. सी. एस्. होण्यासाठीं इंग्लंडला पाठविला म्हणजे झालें' असा वकिलीणबाईनें आपल्या मनाशीं विचार केला. व त्यालाच आपली पार्वती देण्याचें स्वतःच्या मनानें ठरवून टाकलें.

वकिलांच्या मनांतहि तेंच होतें. घरांतल्या सगळ्या माणसांची ह्या विवाहाला संमति मिळाली. पण आज लग्न होणें अशक्य होतें. शारदा कायद्याची मोठीच धोंड मध्यें उभी राहिल्यामुळें सगळ्यांच्या आशा विरघळून गेल्या. पार्वतीला नुकतेंच बारावें वर्ष लागलें असल्यामुळें शारदा कायद्याला धाब्यावर बसवून हा विवाह घडून येणें अशक्य होतें. वकिलीणबाईंना तर आतांच लग्नसमारंभ उरकून घेण्याची घाई झाली होती. आपल्याला केव्हां एकदां जांवई येतो असें त्यांना होऊन गेलें होतें. त्यांनीं पुष्कळ प्रयत्न केला, कांहीं उपाय सुचेना. इतक्यांत एकाएकीं त्यांना एक उपाय सुचला व त्या अगदीं आनंदून गेल्या. लगबगीनें त्यांनीं ती बातमी आपल्या पतिराजांच्या कानांवर घालून त्यांची संमति विचारली. चंद्रशेखरनीं ताबडतोब आपली अनुमति दिली. हें लग्न एकाद्या संस्थानच्या हद्दींत केल्यास शारदा कायदा आड येणारा नव्हता. हाच तो वकिलीणबाईंचा रामबाण उपाय.

मुलीच्या लग्नासाठीं सीतारामय्या पदुकोटाला जाणार आहेत ही बातमी लवकरच गांवभर झाली. वकिलांच्या मित्रांनीं त्यांची हजेरी घेतल्यामुळें सीतारामय्यानीं तो बेत मागें घेण्याचा विचार चालवला. पण वकिलीणबाईंनीं आपला मुद्दा सोडला नाहीं.

त्या म्हणाल्या, 'कायद्याच्या भीतीनें इतकें चांगलें स्थळ हातांतून घालविणारांची मूर्खांतच गणना केली पाहिजे.'

'त्यांत काय मोठें बिघडतें? ह्याच्याइतकीं वाटेल तेवढीं स्थळें मिळतील.'

'छट्, उगीच वाटेल तें बोलण्यांत काय अर्थ आहे? मुलीच्या बाबतींत इतका बेफिकीरपणा चांगला नाहीं.' मुलीची आई उद्गारली.

'बरं, मग तुमचें काय म्हणणें आहे? तें तरी कळूं द्या.'

' म्हणणें एवढेंच कीं, आज वाङ्‌निश्चय पक्का करून टाकावा. सर्व करारमदार लेखी करावेत. रामचंद्राला आपल्या खर्चानें आय्. सी. एस्. साठीं इंग्लंडला धाडावा. आणि तो परत आल्यावर तीन वर्षांनीं लग्न करावें. '

वकिलीणबाईंची ही व्यवहार्य योजना सर्वांनाच सोळा आणे पसंत पडली. जगदीशशास्त्र्यांनींहि तिला मनःपूर्वक पाठिंबा दिला. रामचंद्राला मात्र कुरूप पार्वती पसंत नसल्यामुळें त्याची संमति नव्हती. पण आपल्या वडिलांचा या बाबतींत ठाम निश्चय झालेला पाहून आणि विशेषतः इंग्लंडला जाण्याचा योग येतो आहे हें ध्यानांत घेऊन त्यानें मुळींच तोंड उघडलें नाहीं.

* * *    * * *

## [ ३ ]

जगदीशशास्त्री रंगूनला परत गेले. रामचंद्र इंग्लंडला रवाना झाला असल्यामुळें त्यांना अगदीं एकटेंच रहावें लागलें. तिकडे जाऊन त्याला दोन वर्षें झालीं होतीं. या अवधींत शास्त्रीबुवांचें मन रुक्मिणीकडे एकसारखें ओढ घेत होतें. ती आतांपर्यंत कितीहि जरी गैर वागली असली तरी तिला तिच्या पापांची क्षमा करून शास्त्रीबुवा तिचा स्वीकार करावयास तयार झाले होते. म्हातारपणीं आपली सत्तेची बायको जवळ असावी, आपल्याला तिचा मोठा आधार वाटेल असें त्यांना एकसारखें वाटत होतें. पण रुक्मिणी कशी येणार ? ती कोठें नाहींशी झाली होती कोणास ठाऊक ?

अखेर विचार करकरून त्यांचें डोकें भ्रमण पावूं लागलें व त्याचा शरीरावर परिणाम होऊन ते आजारी पडले. डॉक्टरांच्या सल्ल्यावरून त्यांनीं लगेंच एका आठवड्यांतच रंगून सोडलें व मद्रासला जाणाऱ्या बोटींत पाय ठेवला. ते नेहमींप्रमाणें थर्ड क्लासनेंच प्रवास करीत होते. एके दिवशीं सेकंडक्लासनें प्रवास करणारी एक बाई त्यांच्या अंगावरून गेली. तिला पहातांच ते आश्चर्यानें स्तिमित होऊन गेले. अगदीं थेट रुक्मिणीसारखी ती त्यांना दिसली. तिच्याकडे अनेकवार पाहून अखेर त्यांनीं आपली खात्री करून घेतली कीं ती रुक्मिणच. बोट मद्रासला लागावयाचा शेवटचा दिवस आला. त्या दिवशीं तिच्याशीं बोलावयाचें त्यांनीं ठरविलें. आपलें सामान हमालाच्या डोक्यावर देऊन ती चालूं लागली. इतक्यांत जगदीशशास्त्री तिच्यापुढें दत्त म्हणून उभे राहिले. दोघांनींहि एकमेकांकडे एकदां

पाहिलें, व ती म्हणाली 'तुम्हांला मला भेटावयाचें आहे ? मग ' ११४ नाईक रस्ता ' या पत्त्यावर भेटा. '

' ठीक आहे. काय, तीच तर तूं ? '

' हं. तीच मी. ' तिनें हंसत हंसत उत्तर दिलें.

* * *

[४]

जगदीशशास्त्र्यांनीं आगबोटींतून उतरतांच आपला मोर्चा थेट चंद्रशेखर सीतारामय्या यांच्याकडे वळविला. ते आतां चंद्रशेखरचे व्याही झाल्यामुळें त्यांचा पूर्वीपेक्षांहि चांगला सत्कार झाला.

त्यावेळीं जिकडे तिकडे हरिजनोद्धार व मंदिर-प्रवेश या चळवळी जोरांत चाललेल्या होत्या. कोठेंहि पहा, त्यासंबंधीं चर्चा नाहीं असें आढळत नव्हतें. जगदीशशास्त्री वकिलसाहेबाबरोबर जेथें जेथें जात तेथें तेथें हाच विषय निघत असे.

' सनातन धर्म बुडाला ' असें एका धर्ममार्तंडांनीं उद्गार काढल्यावर वकिलीणबाई म्हणाल्या ' तुम्ही जर शारदा कायदा पास करून घेतला नसतात तर धर्म कसा बुडाला असता ? '

' छट्, त्याच्याशीं धर्माचा काय संबंध आहे?' सीतारामय्या म्हणाले.

' सगळें मिळून एकच. जुन्या रूढी मोडणारांना तुम्ही उत्तेजन दिलेंत, त्यामुळें धर्माचीं शकलें शकलें झालीं. '

' वकिलीणबाईंच्या म्हणण्यांत कांहीं तथ्य नाहीं असें नाहीं.' शास्त्रीबुवा म्हणाले;

बराच वेळ अशाच गप्पा झाल्यावर जगदीशशास्त्री उठले आणि ११४ नाईक रस्त्याकडे जावयास निघाले.

तेथें गेल्यावर त्यांना जी माहिती कळली ती त्यांच्या स्वप्नांत सुद्धां कधीं आली नसेल. इतकी ती ' भयंकर ' होती.

नागेश्वर अय्यर हा जवाहिऱ्या नव्हता किंवा इन्शुअरन्स-एजंटहि नव्हता. तो जातीनें न्हावी असून त्याचें कलकत्त्याला मोठें हेयर कटिंग सलून होतें त्याच्याजवळ एक ब्राह्मण बाई रहात असे. तिच्यापासून त्याला ज्या तीन मुली झाल्या त्यांपैकीं रुक्मिणी ही एक होती. नागेश्वर हा पक्का लफंगा असल्यामुळें

त्याच्यावर दोनतीनदां तुरुंगवासाचाहि प्रसंग आला होता. सध्यांहि तो तुरुं गांतच होता.

रुक्मिणीनें जगदीशशास्त्र्यांच्या घरांतून पलायन केल्यापासून अनेक धंदे केले. ती एका नाटककंपनींतहि कांहीं दिवस राहिली होती. सध्यां ती एका सिनेमा कंपनींत शिरली असून ' सावित्री ' चित्रपटांत सावित्रीची भूमिका घेण्यासाठीं मद्रासला निघाली होती. तिला तेथें पैसेहि चांगले मिळत. त्यामुळें तिला कुणाच्याहि मदतीची जरूरी नव्हती.

इतकी सगळी हकीगत सांगितल्यावर रुक्मिणी म्हणाली, ' मी तुमची मोठी अपराधी आहे. मी आणि माझ्या वडिलांनीं तुम्हांला फसविलें. आम्हांला क्षमा कराल ना ? तुमच्या हातून हें जें पाप घडलें त्याचें परिमार्जन करण्यासाठीं आतां काशीला जा. कारण त्याशिवाय तुम्हांला गति मिळावयाची नाहीं. '

जगदीशशास्त्री एकाद्या लहान मुलासारखा रडूं लागला व रुक्मिणी आपल्या लुगड्याच्या पदरानें त्याचे डोळे पुसूं लागली. तो देखावा मोठा हृदयद्रावक होता. इतक्या दिवसांनीं अचानक सांपडलेली बायको सोडून जाण्याचा शास्त्रीबुवांच्यावर मोठा प्रसंग ओढवला होता. ते रुक्मिणीचा हात पुन्हां पुन्हां हातांत घेत व कुरवाळीत. अखंड विरहाची कल्पना डोळ्यापुढें येतांच ते गद्गद स्वरानें बोलूं लागले. ' ह्या जाती कुणी निर्माण केल्या ? जातिभेद ही केवळ लफंगेगिरी आहे. ब्रह्मदेवानें ह्या असल्या जाती खास निर्माण केल्या नाहींत. आम्ही माणसांनींच हा नसता उद्योग केला आहे. '

रुक्मिणी त्यांचें सांत्वन करीत म्हणाली, ' तें कांहीं असलें तरी मी आतां अपवित्र पापिणी आहे. माझ्या हातून दहा पिढ्या रौरव नरकांत जातील इतकें पाप झालें आहे. तेव्हां माझ्या अंगाला आतां स्पर्श करूं नका. नाहींतर तुम्हीही पापाचे वांटेकरी व्हाल. '

जगदीशशास्त्र्यांना तिचें म्हणणें पटत चाललें. नाटकमंडळ्या आणि सिनेमाकंपन्या ! त्यांनीं तेथील वर्णनें कानांवर हात ठेवून ऐकलीं होतीं. त्यामुळें तिच्या बोलण्यांत खोटेपणा असेल असें त्यांस वाटलें नाहीं. याच वेळीं त्यांच्या डोळ्यापुढें रामचंद्राची मूर्ति आली. दोन एक महिन्यांत तो विलायतेहून यायचा होता. आणि लगेंच त्याचें सीतारामय्याच्या मुलीशीं लग्न व्हायचें होतें. सीतारामय्या

किंवा त्याची बायको यांना जर हें प्रकरण समजलें तर रामचंद्राचें लग्न तरी होईल काय ? रामचंद्राची जात कोणती ? त्यांच्या डोक्यांत विचारचक्र सुरू झालें. विचारांच्या खळबळीमुळें डोकें फुटतें आहे कीं काय असें त्यांना वाटूं लागलें आणि त्यासरसे ते जिन्याच्या पायऱ्या उतरून रस्त्यावर केव्हां आले तें त्यांना सुद्धां समजलें नाहीं.

* * *

[ ९ ]

अखेरीस आपल्या पापांची निष्कृति करण्यासाठीं म्हणून शास्त्रीबुवांनीं काशीक्षेत्राची वाट धरली. त्यांचा आगगाडीचा प्रवास जरी सुखानें चालला होता तरी त्यांचें मन इतस्ततः भ्रमण करीत होतें. वास्तविक पाहतां त्यांच्या हातून कसलेंच पाप झालें नव्हतें. आणि झालें असें गृहीत धरल्यास तें अजाणतां झालें होतें असें म्हटल्यास हरकत नव्हती. पण त्यांच्या चित्ताला मुळींच स्वस्थता नव्हती. आगगाडींत निजल्यानिजल्याच त्यांना एक भयंकर स्वप्न पडलें.

* * *

"रामचंद्र आय. सी. एस्. न होतां इंग्लंडहून परत आला आणि तितकीच दुःखाची गोष्ट ही कीं तो महाराचा मुलगा म्हणून सर्वत्र ओळखला जाऊं लागला. त्याच्यांत एवढें रूपांतर झालें होतें तरी जगदीशशास्त्र्यांना तो पूर्वीइतकाच प्राणप्रिय होता. त्याच्यासाठीं नोकरी आणि बायको या दोन गोष्टींचा शोध करीत ते बापलेक दारोदार हिंडूं लागले.

ते सीतारामय्याच्या घरीं गेले, पण वकिलीणबाईनें झाडूवाल्यांकडून त्यांना बाहेरच्या बाहेर हांकून लावलें. इतर नातेवाइकांच्या येथेंही त्यांना तोच अनुभव आला. ते एका ट्रॅममध्यें बसूं लागले तोंच एक रुद्राक्षमाळा घातलेला ब्राह्मण ओरडला. 'या चांडाळांना बाहेर खेंचा.' तोंच एक मुसलमान, एक धर्ममार्तंड व इतर लोक त्यांच्या अंगावर धावले. प्राणाच्या भीतीनें बापलेकांनीं पळ काढला.

जगदीशशास्त्र्यांनीं रामचंद्राच्या नोकरीसाठीं पुष्कळ धडपड केली. पण त्याला कोणी पट्टेवाल्याची किंवा दारवानाचीही नोकरी देईना. कारण तो पडला महार !

अखेर शास्त्रीबुवा एका संन्याशाकडे गेले व त्याला म्हणाले, ' स्वामीमहाराज, कांहीं करा, पण माझ्या मुलाला ब्राह्मण करून घ्या. '

' अशक्य, ' स्वामीजींनीं आपला दंडा हातांत घेत म्हटलें. ' चांडाळाला मेल्याशिवाय व ब्राह्मणजातींत जन्म घेतल्याशिवाय ब्राह्मण होतां येत नाहीं. त्यानें जरी सत्कर्में केलीं व तो शुद्धाचरणानें राहिला तरीही त्याला ब्राह्मण व्हावयाला शेंकडों जन्म घ्यावे लागतील. '

" पण, काय हो स्वामीजी, तुमची जात तरी कोण हो ? "

" मूर्खा, माझ्या पूर्वींच्या जातीशीं तुला काय करायचें आहे ? ' असे उद्गार काढून त्या यतीनें शास्त्रीबुवांना आपल्या दंड्याचा प्रसाद दिला.

* * *

शास्त्रीबुवा रावबहादुर नरसिंहाचार्यांकडे गेले व आपला बी. ए. झालेला मुलगा चपराशी म्हणून कां होईना पण नोकरीस ठेवा असें गयावया करून सांगूं लागले. 'शक्य नाहीं' रावबहादुर गरजले, ' मी स्वतः जरी जातिभेद पाळत नसलों तरी माझ्या घरीं असला ' महारडा ' मुळींच खपायचा नाहीं. मी एकादा शूद्र पोरगा पत्करीन.'

' मी शूद्र झालों असतों तर ? ' रामचंद्र आपल्या वडिलांना म्हणाला. ' पण, मी तर चांडाळ आहे. न्हावी आणि ब्राह्मण या दोघांच्या संयोगापासून माझा जन्म झालेला असल्यामुळें माझी जात तर आतां कायम झाली आहे. असेंच ना, बाबा ?'

' खरं आहे तुझं म्हणणं. देवा, देवा, हीं सगळीं शास्त्रेंच जाळून टाकशील तर ? म्हणजे कितीतरी अभागी जीव सुखांत राहतील. ' शास्त्रीबुवा हताश होऊन म्हणाले.

' बाबा, मी आतां एकाद्या स्टेशनवर हमाली पत्करतों आणि पाहतों कांहीं पोटाला मिळतें कां ? '

पण तिथेंही त्याचें दुर्दैव ओढवलें आणि लोकांनीं त्याला हांकून दिला.

* * *

भटकतां भटकतां जगदीशशास्त्री अगदीं मेटाकुटीला आले, तहानेनें त्यांचा जीव अगदीं व्याकूळ झाला. त्यांनीं पुष्कळांना पाणी मागितलें, पण व्यर्थ. अखेर त्यांना एक विहीर दिसली. पायऱ्या उतरून इकडे तिकडे साशंक नजरेनें पहात

ते पोटभर पाणी प्यायले. इतक्यांत एक ब्राह्मणाची बाई घागर घेऊन आली. त्या दोघांना पाहतांच ती एकदम ओरडली, 'रांडेच्यानों, ही विहीर विटाळून ठेवलीत, आतां मी पाणी कुठलं घेऊं ?'

त्यांच्याभोंवतीं लोकांची गर्दी जमली.

'हा माझा मुलगा आहे. त्याला मारूं नका. तुमच्या पायां पडतों.' जगदीशशास्त्री घसा खरवडून त्या लोकांची विनवणी करीत होते.

'बोल, हा मुलगा तुझाच कशावरून ?'

'कशावरून म्हणजे ? माझाच आहे तो. माझ्यासारख्या ब्राह्मणाच्या पोटीं त्याचा जन्म झाला आहे.'

'थांबा, थांबा' इतक्यांत एक बाई गर्दीतून घुसून ओरडली. 'हा मुलगा माझा आहे आणि मीं त्याची आई आहे. माझी जात चांडाळाची आहे.'

'हाणा, ठोका' लोकांचा आवाज चढत चालला. जिवाच्या भीतीनें बापलेक पळूं लागले. पळतां पळतां त्यांनीं मागें वळून पाहिलें तों रुक्मिणी !

* * *

ते एका प्रचंड व वैभवशाली देवालयासमोर येऊन उभे राहिले. जगदीशशास्त्र्यांनीं डोळे मिटून व हात जोडून देवाची प्रार्थना करावयास सुरवात केली.

'परमेश्वरा, तूं अनाथाचा नाथ व दीनांचा आसरा आहेस. तुझ्या ठिकाणीं भेदाभेद नाहीं. पतितांना तूं पावन करून घेतोस आणि पापी लोकांचा उद्धार करतोस. माझ्यावर व माझ्या मुलावर आकाशाची कुऱ्हाडच कोसळली आहे. माझा मुलगा चांडाळ झाला आहे. तो तुझ्या दर्शनाला येऊं शकेल काय ?'

'खुशाल येऊं दे,' आंतून गंभीर आवाज आला,' मी चराचरांचा मातापिता असल्यामुळें कोणत्याही पतितानें माझ्याकडे खुशाल यावें. मी प्रत्येकाला आसरा द्यावयाला सदासर्वकाळ सज्ज होऊन बसलों आहे.'

अखेर जीवाचा धडा करून जगदीशशास्त्री आपल्या मुलासह देवळांत घुसले आणि मूर्तीच्या पायांवर त्यांनीं आपलें डोकें ठेवलें. इतक्यांत एक पुजारी आला आणि त्यांना पहातांक्षणींच ओरडला, 'धांवा, धांवा, चांडाळ, चांडाळ !'

हां हां म्हणतां लोकांची गर्दी जमली.

'हाणा, मारा, बडवा ' इत्यादि आरोळ्यांनीं तें देऊळ दुमदुमलें.

'ह्या म्हाताऱ्याला मारूं नका. त्याच्या पोराला ठार करा. ' पुजारी ओरडला.

' माझा प्राण घ्या, पण पोराला वांचवा.!' जगदीशशास्त्री आर्तस्वरानें विनवण्या करूं लागले. पण त्या धुमश्चक्रींत त्याचें ऐकतो कोण ? सगळ्यांच्या काठ्याखालीं रामचंद्र अर्धमेला होऊन पडला होता.''

* * *

जगदीशशास्त्र्यांनीं डोळे उघडून पाहिलें. आपण कुठें आहोंत याचा त्यांना भ्रम पडला. त्यांनीं आजूबाजूला पुन्हां एकदां पाहिलें तों आपण आगगाडीच्या डब्यांत आहोंत असें त्यांना आढळल्यावर त्यांच्या जिवांत जीव आला. 'एकूण हें स्वप्न तर ? ' असे मनाशीं उद्गार काढून त्यांनीं हात जोडले.

* * *

[ ६ ]

**रा**मचंद्र आय्. सी. एस्. होऊन परत आल्यावर असिस्टंट कलेक्टर म्हणून त्याची मंगलोरला नेमणूक झाली. चंद्रशेखर सीतारामय्याला रुक्मिणीची कांहींच हकीगत ठाऊक नसल्यामुळें पूर्वी ठरल्याप्रमाणें रामचंद्र आणि पार्वती यांचें मोठ्या थाटानें लग्न झालें. पण जगदीशशास्त्र्यांचा कुणालाच शोध लागला नाहीं. कोणी म्हणत, त्यांनीं संन्यास घेऊन काशीस प्रयाण केलें. कोणी म्हणत, त्यांनीं रामेश्वरची वाट धरली. पण खरी गोष्ट कधींच कुणास कळली नाहीं.*



* श्री. चक्रवर्ती राजगोपालाचार्य यांच्या एका गोष्टीवरून.

# शीतल ज्वाला

[ लेखक—श्रीयुत बाळकृष्ण मोरेश्वर कानिटकर
एल्‌एल्. बी. ]

" धडाड् धडाड् धाड ! ! " कानठळ्या बसणारे जपानी तोफांचे आवाज, 'शांघाय'च्या सीमेवर ऐकूं येऊं लागले होते ! त्राहि भगवन् झालेले शांघायचे रहिवाशी वाट फुटेल तिकडे पळत सुटले होते. कोणी परकीय सत्तांच्या शिवारांत आसऱ्याला आले होते, तर कित्येक वाट चुकून नेमके युद्धभूमींत गुरफटले जाऊन मृत्यूस मिठ्या मारीत होते. सर्वजण इकडे युद्धांत धडपडत होते तर टोकियोच्या दक्षिण भागांतील उद्यानांतील एका लताकुंजांत एक तरुण स्त्रीपुरुषाचें जोडपें उभें होतें.

" मग काय ठरवलंस तूं मिंकोटोगी ? " त्या तरुणानें विचारलें.

" माझ्या मनाचा अजून निश्चयच होत नाहीं. "

" त्यांत इतकी अडचण कां वाटावी हेंच कळत नाहीं. अग, तुझा प्रत्यक्ष भाऊ त्या दरोडेखोरांनीं मारला तरी तुला त्यांच्या नायकाबद्दल आपलेपणाच वाटतो ? "

" तसं नाहीं हो कोमानोगो. मला किनई खरोखरच तुमच्याशीं लग्न करावेंसें वाटतें पऽण-खरंच होमायाकोचें आकर्षण फारच विलक्षण. त्यांचा शूरपणा आठवला कीं आपला जीव त्यांच्यावरून ओंवाळून टाकावासा वाटतो. "

" बरं तर मी जातों आतां. माझी तुला करुणा येत नाहीं, हेंच खरें. पण निदान माझी आठवण ठेव. " इतकें बोलून तो तरुण तांतडीनें निघून गेला.

त्याच्या मावळत्या आकृतीकडे प्रज्वलित ज्वालामुखीप्रमाणें रागानें परंतु सस्नेह पहात मिंकोटोगीही आपल्या मार्गाला लागली.

* * *

" **ख**रंच ! तुम्ही जर हा वाईट धंदा सोडून कांहीं चांगलें कार्य कराल तर-तर मी आपलीच नाहीं कां ? " होमायाकोचा वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालेला फोटो पहात मिंकोटोगी विचार करीत होती. तिनें तें पत्र हातांत घेतलें व वाचलें.

" १०००० येन बक्षीस ! १०००० येन बक्षीस !!

सुप्रसिद्ध दरोडेखोर होमायाकोस पकडून देईल त्यास १०००० येन बक्षीस देण्यांत येईल ! "

" होमायाको ! काय झालं हें ? कुठें असाल बरं ? शेवटीं ही वेळ यावी ना ? याशिवाय दुसरें कांहींच करतां यायचं नाहीं कां ? जा गडे. मग मी कधींच नाहीं बोलायची. अगबाई ! राग आला वाटतं. पण खरं खरं सांगावं, हें वाईट नाहीं कां ? आपलं शौर्य दुसऱ्या कामीं लावलं तर ?

* * *

" **या**ला तुम्ही ओळखतां कां ? " फिर्यादीच्या सरकारी वकिलानें मिंकोटोगीस विचारलें.

भर कोर्टांत साक्ष देतांना साक्षीदाराला काय वाटतें हें पिंजऱ्यांत उभें राहिल्याशिवाय कळत नाहीं. आपली साक्ष किती महत्त्वाची आहे याची जाणीव असल्यावर, आणि आपल्या साक्षीमुळें ' आरोपी क्वचित् फासावरही लटकणें शक्य आहे, ' अशी भीति वाटत असल्यावर तर साक्षीदाराची, त्यांतून प्रेमाच्या

माणसाविरुद्ध, साक्ष देतांना किती करुणाजनक स्थिति होत असली पाहिजे हें शब्दांनीं व्यक्त करणें अशक्य आहे.

'हो' म्हणून सांगितलें कीं होमायाको निश्चित तुरुंगांत जाणार व त्याच्यावर इतर गुन्हे शाबीत होऊन काय परिणाम होईल कोण जाणें ! 'नाहीं' म्हणून सांगितलें तर इतर पुराव्यांमुळें स्वतः खोटी साक्ष दिल्याबद्दल कैदेंत जावें लागतें !

काय करावें याचा तिला विचार पडला. शेवटीं आपल्याला आणि होमायाकोला बचावण्यास कोमानोगो समर्थ आहे, हें तिला नक्की वाटत होतें. पण यावेळीं कोमानोगोस कोण बोलावणार ? तो कोठें असेल ?

पण हें काय ? हा कोण वकील ? वा: कोमानोगोच. परमेश्वरच पावला म्हणायचा. या एकाच गोष्टीनें तिला धीर आला. तिनें मन घट्ट केलें. आणि सरकारी वकीलानें पुन्हां विचारतांच उत्तर दिलें, "छे: या गृहस्थास मी ओळखीत नाहीं." यावर "पहा बरं. खोटं सांगितल्यास पश्चात्ताप करावा लागेल" असें सरकारी वकिलानें म्हणतांच, 'हें सुचाविण्याचें काम आपलें नसून कोर्टाचें आहे' अशी आरोपीच्या वकीलानें कानउघाडणी केली. शेवटीं हें छोटेंसें भांडण न्यायाधीशास मिटवावें लागलें. त्यानें स्वतःच मिंकोटोगीस खरें सांगण्याबद्दल बजावून काम पुढें चालूं केलें.

***

अरे रे ! काय केलं मी हें ? कुठें असेल बरं मिंकोटोगी ? इतका मत्सर वाईट असतो कां ? माझें मिंकोटोगीवर प्रेम होतें ना ? मग तिला ज्यांत सुख लागलें असतें तें मी करावयास नको होतें काय ? मला तिचा लाभ होत नाहीं म्हणून तिला पसंत असलेल्या इसमाशीं तिचा विवाह होण्यांत मदत केली असती तर ? आणि तसेंच पाहिलें तर होमायाको खरोखर गुन्हेगारच नाहीं. त्यानें दरोडे घातले होते, पण ते सर्व दीन दुबळ्या अनाथांसाठीं. कायद्यांत याला बचावाला म्हणून पुराव्यास घेतां न आलें तरी परमेश्वराच्या घरीं तो तितका दोषी खास ठरणार नाहीं, हें मला माहीत होतें. परंतु कोता स्वार्थ आड आला ! त्या दिवशीं कोर्टांत त्याचा किती अपमान झाला ? किती बेअब्रू झाली ? त्यामुळें बिचारा फारच कष्टी झाला. आणि मिंकोटोगी तर बेशुद्धच झाली. खोटी साक्ष दिल्याबद्दल तिलाही शिक्षा झाली.

या सर्व अनर्थास कारण कोण ? कोमानोगो ! कोमानोगो ! ! असेंच त्याचें मन सांगत होतें !

* *
*

धडड् धाड् ! धडड् ! धाड् ! ! धा ! ! ! शांघायवर धुमश्चक्री चालूच होती. परंतु प्रचंड व प्रबळ अशा जपानी सैन्यासही चिनी खंदक व त्याच्यापुढील काटेरी तारांचें कुंपण ओलांडतां येत नव्हतें. चिनी तोफांच्या माऱ्यामुळें जपानी लोक कुंपणापर्यंत येऊं शकत नव्हते ! आणि त्यावांचून कुंपण उखडतां येत नव्हतें.

पण ते पहा, ते तीन जपानी सैनिक. ते काय करताहेत त्या बाजूला ? अरे पण, जपून चाला. अन् यांच्या अंगावर हीं जाडजाड चिलखतें कसलीं ? अन् हें डायनामाइटच्या वातीसारखें काय ? म्हणजे ? डायनामाईटमध्यें त्यांनीं स्वतःस मढविलें आहे ? शाबास आहे धाडसाची ! आपल्या राष्ट्रासाठीं देहाच्या प्रत्यक्ष चिंध्या उडविण्यास तयार होणाऱ्या त्या वीरांची धन्य आहे !

ते पहा ते सेनापतीच्या हाताचें चुंबन घेत आहेत ! किती स्फूर्तिदायक अन् करुणाजनक देखावा हा ! पण या सर्व वीरांनीं अशा पाठी कां फिरविल्या बरें ? त्या आत्मत्यागी वीरांच्या परस्पर भेटी चालल्या आहेत वाटतं ?

* *
*

"कोण ? मिंकोटोगी ?" दोघे एकदम उद्गारले !

' होय. '

'आणि आपण ? कोमानोगो ?'

' होय. '

'आणि तुम्ही ? होमायाको ?'

* *
*

आत्मशुद्धीसाठीं आत्मत्याग !

* *
*

**शां**घायच्या चिनी खंदकांसमोर तीन जपानी सैनिक दबत दबत चालले आहेत. पण हें काय ? हे तर हातांत हात घालून उभे राहिले.

अरेरे! त्यांच्याच लोकांनीं त्यांच्यावर गोळ्या झाडल्या कीं.

धाड, धाड्, धडाड्!

आगीच्या डोंबांत कांहींच दिसेंनासें झालें. त्या तीन आत्मत्यागी तरुण सैनिकांच्या नाहींसें होण्यानें, जपानी सैन्यास कुंपण तोडून चाल करता आली.

देशासाठीं आगीच्या ज्वाळा सुद्धां त्या आत्मत्यागी जपान्यांस शीतल वाटल्या. शाबास! धन्य त्यांच्या धीराची !!



# निर्दय ?

( लेखकः—श्रीयुत **परशराम त्रिंबक सहस्रबुद्धे.** )

निघावयाची माझी वेळ झाल्याबरोबर मला कसेंसेंच वाटूं लागलें. कारण मला माझ्या ताईचा निरोप घ्यावयाचा होता. ताई आज महिनाभर अंथरुणाला खिळून होती. असल्या दीर्घकालीन आजारानें तिला अत्यंत क्षीणता आली होती. इतकेंच नव्हें तर आपण ह्या दुखण्यांतून कांहीं फार दिवस वांचत नाहीं—मृत्यु एक एक दिवस जवळ येत आहे—हें जणूं कांहीं तिला समजलेंच होतें. त्यामुळें तिच्या सर्व हालचालीवर निराशा पसरल्याप्रमाणें दिसे. पूर्वींचे तिचे चंचल व पाणीदार नेत्र आतां निस्तेज व स्थिर बनले होते.

आधींच माझ्यावर तिचें जीवापलीकडे प्रेम. त्यांत ती मृत्युशय्येवर पडलेली. त्यामुळें मला तिचा निघतांना निरोप घेण्यास कठीण वाटलें. पण कुणी सांगावें, ती पुन्हां भेटेल कीं नाहीं ? अशा निराशाजनक विचारानेंच मी ह्या गोष्टीला तयार झालों. मोठा धीर करून तिच्या खोलीशीं आल्यावर अगदीं हळूंच-आंत डोकावून पाहिलें.

ताईचा कृश देह पलंगावर पडलेला दिसला. तिच्या मुखावर निस्तेजपणाची दाट छाया पसरली होती. छातीपर्यंत पातळशी चादर असून ताईनें आपला एक

हात पोटावर आडवा मलूलपणें टाकला होता. पायाचे तळवे पांघरुणाबाहेर आले असून ती आपल्या पायाच्या बोटांना सारखी हलवीत होती. डोक्यावर कसल्या तरी औषधाचे पट्टे लावल्यामुळें व डोक्यावरील केस अव्यवस्थितपणें पसरल्यामुळें तिच्याकडे पहातांना भीतीच वाटत होती.

आई तिच्या मस्तकाजवळ बसली होती. उजवा हात मधून मधून ताईच्या कढत कपाळावर ती ठेवी व डाव्या हातानें नेत्रसंपुटांत जमलेले अश्रू पदराला पुशी. ताईच्या डोळ्यावर त्या वेळीं कसली तरी ग्लानि आली असावी. आईला तरी तसेंच वाटलें असावें. कारण तिनें हलकेंच उठून टेबलावरील दिवा अधिकच मंद केला.

त्याच वेळेस मी आंत पाऊल टाकलें व सद्गदित होऊन " ताई ! "—अशी हळूच हांक मारली. ती ऐकून आईनें माझ्याकडे पाहिलें व हातानें खुणावीत म्हटलें, " भाऊ ! थांब जरा. तिचा आतांच कुठं डोळा लागलाय. अमळ पडूं दे.—म्हणजे बरं वाटेल तिला. अन् कदाचित् तापहि उतरेल. "

हें ऐकून मी हलकेंच दिव्याजवळ गेलों आणि त्या मंद प्रकाशांत हातावरील घड्याळ पाहिलें. तों त्यांत दहा वाजले होते आणि मला तर साडे दहाला निघालेंच पाहिजे होतें . मला विचारच पडला. मी ताईच्या शरीरयष्टीकडे अनिमिष नेत्रांनीं पाहिलें. ती स्तब्धच पडलेली होती. आई मात्र तोंडानें कसलें तरी स्तोत्र पुटपुटत होती. तिलाच आतां विचारावें असें मनांत म्हणून मी तिच्याजवळ जाऊन तिला विचारलें. "आई! काय करावं! माझी तर जायची वेळ झाली. अकराच्या गाडीला मला गेलंच पाहिजे. कारण उद्यांच पेपर आहे पहिला. मग ताईची आणि माझी भेट कशी होणार ? "

ताईची किंचित् हालचाल झालेली पाहून आई म्हणाली. " अरे ! तिला झोंप कां लागली आहे ? पण म्हटलं स्वस्थ पडली आहे ती पडूं दे. पांच मिनिटं."

पण आईचें वाक्य पुरें होण्याच्या आधींच ताईला खोकल्याची ढास आली. ती पहातांच आई " आले हं—" असें म्हणून तिच्या तोंडाजवळ तस्त घेऊन गेली. मी पण तिच्या डोक्याजवळ उभा राहिलों.

आधींच क्षीण झालेल्या ताईला खोकल्याची ढास अति त्रास देई. तिच्या

देहाचे अशा वेळीं होत असलेले हाल पहावत नसत. मलाहि त्या वेळीं तें पाहून फार वाईट वाटलें. पण तिचें दुखणें मला कां घेतां येणार होतें ?

आईनें व मी तिला अमळ बसली करून तिच्या तोंडाजवळ तस्त धरिलें. तिचें थुंकून होतांच मी हलक्या हातानें पांढऱ्या पडलेल्या तिच्या ओठावरून ओल्या फडक्याचा बोळा फिरविला. त्या वेळीं ती टक लावून माझ्याकडे पहात होती. ती कांहीं तरी विचारणार असा मला दोनतीनदां भास झाला. पण तिला बोलवत नव्हतें. दम लागल्यामुळें श्वासोच्छ्वास जोरानें चालू झाल्याचा हा परिणाम असावा. किंचित् वेळ गेल्यावर मात्र तिचे डोळे पाण्यानें भरून आलेसें मला वाटलें.

" ताई !—" मी सद्गदित होऊन विचारलें. " ताई–!"

मोठ्या धीरानें मी सुरवात केली खरी, पण पुढें कांहींच बोलवेना. ताईच्या ध्यानांत ही गोष्ट येतांच तिच्या नेत्रांतून टपटपां अश्रू खालीं पडूं लागले.

तोंड बाजूला सारून मी रुमालानें डोळे पुसले व आईकडे पाहूं लागलों. तों ती देखील स्थिर दृष्टीनें बघत होती. "भाऊ! कां उगीच रडतोस ? तिला कांहीं कां बरं त्यानं त्रास होत ?" असाच जणूं कांहीं त्या दृष्टींत अर्थ भरलेला होता. आईच्या त्या क्षणैक दृष्टिपातानें मी शुद्धीवर आलों आणि पुन्हां धीर करून म्हटलें, " ताई ! मी येतों बरं आतां ?––माझी परीक्षा आटपली—कीं, लागलीच येईन परत हं ?––"

" भाऊ, " क्षणभर थांबून क्षीण आवाजांत ती म्हणाली. " भाऊ—भाऊ ––भाऽऽउऽ––" अन् इतकें म्हणून तिनें आपली मान वळविली. भाऊ ह्या दोन अक्षरांसाठीं तिला किती श्रम पडले ते तिच्या मुखावर स्पष्टपणें मला दिसले.

खोकला गेला असल्यामुळें आईनें तिला निजविली, मग तिनें मला आपल्याजवळ बसण्याबद्दल सुचविलें. मी बसतांच आपला हात दुबळेपणानें तिनें माझ्या मांडीवर टाकला.

" ताई––जातों आतां. वेळ होत आली माझी. लवकरच येईन हो तुला भेटायला ?"

" भाऊ—कसली भेट आतां ?" आपल्या हाताकडे पहात तिनें म्हटलें.

"छे: ग ताई! तूं भलतीच कल्पना नको हो करून घेऊंस."

"भाऊ--पण जा-जा." तिनें एकदम शुद्धीवर आल्यासारखें करून म्हटलें. "जा-परीक्षा पास हो-जा भाऊ आतां." इतके शब्द बोलतांच उसनें आणलेलें अवसान नाहींसें झालें. बंधुप्रेमानें उसळी खाल्ली. पुन्हां कंठ दाटून तिनें म्हटलें, "नाहीं भाऊ—तूं कुठंही जा—पण तुला भेटल्याशिवाय प्राणच जाणार नाहीं माझा बरं कां?" दम लागल्यामुळें पुन्हां क्षणभर थांबून ती पुढें म्हणाली, "जा-जा तूं. पण परत लवकरच यायला लागणार—!"

"हात्तिच्या, येईन बरं ताई!" विस्कळित झालेले तिचे केस सारखे करीत मी म्हटलें.

मुंबईस गेल्यावर हा करुणप्रसंग माझ्या डोळ्यापुढून हलत नसे!

तिथें पहिले दोन दिवस बरे गेले. एक तर पहिले दोन पेपरही बरे गेले होते व ताईची प्रकृतीही बरी असल्याचें समजलें होतें. तिसऱ्या दिवशीं सकाळीं 'स्टो' पेटवून त्यावर कॉफीचें आधण ठेविलें व हातांतील काकड्याशीं चाळा करीत तिथेंच बसलों. मनांत ताईच्या विषयींच विचार एकसारखे चालले होते. ती बरी आहे हें ऐकल्यापासून मनाला किंचित् समाधान वाटल्यामुळें विचारही किंचित् थट्टेचे यावे ह्यांत नवल नाहीं. "ताई!" मी मनांत म्हटलें, "तिला वाटलं मी मरणार!! घोंगडीवर काढलेले लोक चांगले झालेले नाहीं कां आपण पहात? बायका आधींच भित्र्या अन्-आजारी पण!! बरी होऊं दे म्हणजे ताईसाहेबांनीं कशी गंमत मांडली होती तें सांगूं!" ह्या विचारांचें माझें मलाच मग हंसूं आलें.

पण हें कल्पनेचें सौख्य देखील फार वेळ टिकण्याचें नशिबीं नव्हतें. कारण कॉफी पिऊन स्टोव्हची किल्ली सैल करतों न करतों तोंच पोस्टमननें एक पत्र दारांत टाकलें. पत्र पाहतांच प्रथम आनंद वाटला पण पुन्हां वाटलें कीं पत्र कां बरं यावं? ताईचें दुखणें जास्त तर नाहीं ना? कदाचित् तिला अधिक बरें वाटलें असेल—

पत्र फोडतांना ह्या विचारांनीं मनाची समजूत केली खरी, पण पत्रांतील मजकुरामुळें माझी विचारनौका दुःखसागरांत, जोरानें आघात झाल्याप्रमाणें हेलकावूं लागली.

मजकूर कांहीं फार नव्हता. "ताई-प्रकृतीच्या दृष्टीनें दिवसेंदिवस जास्तच

क्षीण होत आहे. ती फार आठवण काढते. अन् कालपासून तिनें तुझ्या नांवाचा ध्यासच धरला आहे. परीक्षा संपतांच ताबडतोब निघून ये—" एवढाच मजकूर बाबांनीं लिहिला होता, पण माझ्या मनांत विचारांची खळबळ उडविण्यास तो पुरेसा होता. मी आलों तेव्हांची तिची निःशक्त देहलता माझ्या दृष्टीसमोरच होती व त्यानंतर चार दिवस लोटले होते. तेवढया वेळांत ती अधिक किती अशक्त झाली असेल त्याचें कल्पनाचित्र मनापुढें उभें रहातांच माझें हृदय भरून आलें. नेत्रांत अश्रू जमून मनाला खिन्नता वाटावयास लागली. मोठ्या कष्टानें सर्व काम आटपून परीक्षेला गेलों.

परीक्षेचा पेपर कसा लिहीत होतों तें माझें मलाच ठाऊक. लिहिण्याकडे माझें मुळींच लक्ष नव्हतें. "भाऊ—भाऊ" असा शब्द कुठून तरी येतो आहे असा भास एकसारखा होऊं लागून लिहिणें बंद होई व विमनस्कतेनें मी कुठेंतरी पाहूं लागे.

एक तास संपला तरी माझा एकहि प्रश्न लिहून झाला नाहीं. आतां काय करावें ह्या विचारांत मी होतों. इतक्यांत तेथील एक 'निरीक्षक' घाईघाईनें माझ्याजवळ आला व किंचित् काळजीच्या स्वरानें म्हणाला—" हा टेलीग्राम आलाय-पहा काय आहे तो !

'टेलीग्राम' इतकें म्हणतांच, माझ्या हृदयांत धस्स झालें. हातांतला टाक आपोआप गळून पडला व एकदम उभा राहिलों. तारेंत काय असणार हें मला समजलेंच होतें.— 'ताई मृत्युशय्येवर वाट पहात आहे, तावडतोब ये.' माझ्या-च्यानें कुठेंच बघवेना व आतां घेरी येऊन पडतों कीं काय असें वाटूं लागलें.

तडक घरीं आलों. सामानांची घाईघाईनें बांधाबांध केली व घरीं जावयास निघालों.

आगगाडींत खिडकीजवळ मीं बसलों. कुणी पाहिलें असतें तर माझें तोंड मलुल झाल्याप्रमाणें दिसलें असतें आणि तसें होणें सहाजिकच होतें. आगगाडी सुटल्यावर खिडकींतून दुपार असल्यामुळें उष्ण उष्ण वारा येत होता. त्यामुळें आधींच भणाणलेल्या माझ्या मस्तकाला जास्तच त्रास होऊं लागला. म्हणून मी कांच लावून टाकली. टोपी हातांत घेतली. व हातांतील पुस्तक उघडून पाहूं लागलों.

डोळे पुस्तकांतील मजकुरावरून फिरत होते खरे, पण मन घरीं ताईच्याजवळ

घुटमळत होतें. तीनचार पानें वाचून झाल्यावर काय वाचलें त्याचा मी विचार करूं लागलों,पण कांहींच ध्यानांत आलेलें नव्हतें ! आपण काय वेडयारखें करीत आहों असें वाटून माझें मलाच किंचित् हंसूं आलें व बस् झालें म्हणून पुस्तक मिटून खालीं ठेवलें !

गाडीनें दोनतीन स्टेशनें मागें टाकलीं. ह्यानंतरच्या तीन स्टेशनांवर तीं थांबणार नसल्यानें वेग अधिकच वाढला. त्यामुळें गाडींतील माणसें, वेगामुळें बसणाऱ्या हलक्या धक्क्यामुळें, हलत होतीं. फळें विकावयास आलेला भय्या त्या धडधडण्यामुळें टोपलींतील फळें सांडतील कीं काय अशी भीति वाटून बिचारा टोपली बांकावर ठेवून स्वस्थ बसला.

इतक्यांत काय झालें कुणास ठाऊक. जोरानें खर-र्-र.कच् कच असा विचित्र आवाज होऊन गाडीची गति एकदम कमी करण्यांत आली.सर्वांनोच एक जबरदस्त हिसका बसला. कांहीं समोरासमोर बसलेलीं माणसें आदळलीं. फळवाल्याची टोपली आडवी झाली व त्यांतील फळें इतस्ततः फेकलीं गेलीं लहानमुलें रडावयास लागलीं. मोठी मंडळीं " काय झालं " म्हणून उठली आणि कांहीं वेळ एकच गोंधळ उडाला !

ब्रेक दाबला गेला असला तरी गाडी एकदम थांबणें अशक्यच असतें. म्हणून –थोड्या कमी वेगानें पुढें गेल्यावर गाडी थांबली. आंतील माणसांत चलबिचल सुरू होऊन त्यांनीं आपापलीं डोकीं खिडक्यांच्या बाहेर काढून ' आहे तरी काय ? ' अशा चौकसदृष्टीनें पहावयास सुरवात केली. पण खरें काय झालें हें मात्र कोणासच कळत नव्हतें. कांहीं वेळानें तर गाडी मागेंच जाऊं लागली. तेव्हां तर आश्चर्यानें सगळयांचींच तोंडें पहाण्यासारखीं झालीं. हळूहळू गाडी, जेथें आम्हास धक्का बसला त्या ठिकाणीं येऊन थांबली व बरीचशी मंडळी भराभर गाडींतून उतरली.

येथेंच कांहींतरी गडबड असावी अशा विचारानें मी पण बाहेर पाहूं लागलों. गार्ड खालीं उतरला होता व इतरही मंडळी त्याच्याभोंवतीं जमली होती. काय झालें हें कळण्याची माझ्या मनाला तीव्र उत्कंठा लागल्यामुळें मी उभा राहून पाहूं लागलों पण तसें कांहीं प्रथम समजेना. अखेर लोकांच्या बोलण्यांत आलें कीं, कोणीतरी मजूर, मुलीच्या लग्नाचें सामान आणण्यास गेला. परत येतांना ह्याचं

गाडीखालीं सांपडून त्याचा चुराडा झाला. त्याच्याबरोबर असलेल्या पण सुदैवानें बचावलेल्या स्नेह्यानें ही बातमी सर्वांस सांगितली.

ती हकीगत ऐकून मी स्तंभितच झालों! संस्कारक्षम मनाला लागोपाठ घडून येणाऱ्या ह्या दुःखदायी गोष्टींमुळें किंचित् विषण्णता आली. हा म्हणजे एक अपशकुनच नव्हे कां? असें मी आपल्यालाच विचारलें. मी कांहीं शकुनअपशकुन मानणारा नव्हतों पण त्या वेळीं मला भीति वाटली एवढें मात्र खरें. दुर्दैवानें अकालीं मरणाऱ्या माणसाचा व आपल्या सुखदुःखांचा अपशकुनाच्या धाग्यादोऱ्यांनीं संबंध लावूं म्हणणें चुकीचें नाहीं कां?

असें एकदां वाटलें खरें पण लागलीच पुन्हां विचार आला. कुठच्या गोष्टीचा कोणत्या गोष्टीशीं अदृश्यशक्तीनें संबंध जोडला जाईल हें कुणी सांगावें? सूर्याचा व धरणीमातेचा कांहीं संबंध असेल असें कोणास वाटलें होतें? पण असा कांहीं संबंध आहेच कीं ज्यामुळें ती लाखों वर्षें सूर्याभोंवतीं फिरत आहे! नाहीं कां? मग त्याला गुरुत्वाकर्षण म्हणोत अगर कांहीं म्हणोत. पण एका काळीं तो संबंध अतर्क्यच वाटत होता.

ह्या विचारसरणीनें मनाला किंचित् वाटलेली भीति दृढ झाली व ताईविषयीं कांहीं वेळ ह्या अनपेक्षित अपघातानें जो विसर पडला होता, तो नाहींसा होऊन तिच्याविषयीं भीतिदायक विचार येऊं लागले व हृदयांतील खळबळ असह्य झाल्यामुळें नेत्र पुन्हां अश्रूंनीं भरून आले.

सकाळीं आलेली 'तार' मी पुन्हां खिशांतून काढून वाचूं लागलों. एकदां, दोनदां कितीतरी वेळां मी ती वाचली, पण मनाचें समाधानच होईना. त्यांत कांहीं विशेष होतें असेंही नाहीं. त्यावेळींही मला हें माहीत होतें. पण असें असूनही ती वाचून माझ्या मनांत सुखदायक विचार येऊन गेला. अशा वेळीं सुखदायक विचार येणें लौकिक दृष्टीनें कदाचित् निर्दयपणाचें असेल. असें होत होतें एवढें मात्र खरें. 'ताई माझ्या भेटीसाठीं मृत्युशय्येवर तळमळत आहे' हें वाचून मला एका दृष्टीनें समाधान वाटलें! दुसऱ्याला आपल्याबद्दल आत्यंतिक प्रेम वाटत असल्याचें आपणांस समजलें म्हणजे जो आनंद होतो तोच मला झाला. ताईची तळमळ म्हणजे माझ्यावरील उत्कट बंधुप्रेमाचें प्रत्यक्ष उदाहरणच नाहीं कां? आणि तिच्यासारख्या प्रेमळ भगिनीच्या प्रेमाचा कोण भुकेला नाहीं?

आणखी कितीतरी वेळ मी तसाच विचारांत घालविला असता. पण लवकरच शुद्धीवर आलों. शेजारीं बसलेल्या पार्शी गृहस्थानें आपल्या पत्नीला म्हटलें— " अर्धा तास गाडी येथें थांबली. बरीच लेट जाणार ! " त्या त्याच्या वाक्यानें मी पण जागा झालों. व माझ्या विचाराची दिशाच बदलली. गाडी अधिक किती वेळ थांबली जाईल ह्याचा नेमच नव्हता. आणि ताईची अत्यवस्था ध्यानांत आल्यानें मला तर प्रत्येक क्षण मोलाचा वाटूं लागला. क्षणाक्षणाला ताईची कृश देहलता दूर दूर जात आहे असें वाटल्यामुळें एका जागीं स्वस्थ बसणें मला अशक्य झालें. म्हणून मी टोपी हातांत घेऊन गाडीखालीं उतरलों. उतरून काय करायचें हें मुळींच मनाशीं ठरलेलें नव्हतें. परंतु गाडी आणखी किती वेळ उभी रहाणार ह्याचा तपास काढावा असें ठरवून मी हळूं हळूं गाडीच्या डब्याजवळ जाऊं लागलों.

त्याच्या डब्याजवळ खूपच गर्दी जमली होती. दोन रुळांच्या मध्यें त्या मेलेल्या हमालाचें छिन्नविछिन्न झालेलें प्रेत तेथें दिसत होतें. त्याच्या बाजूला पडलेले दगडांचे तुकडे रक्तानें न्हाऊन गेले असल्यामुळें चकाकत होते. डब्यांच्या मागें प्रेत असल्यामुळें त्यावर ऊन पडून तें त्या दगडावरून परावर्तित होई व पहाणाऱ्याच्या डोळ्यांत शिरे, त्यावेळीं फारच भयंकर वाटे. तरण्याताठ्या असलेल्या त्याच्या अंगावरील सर्व कपडे फाटलेले व रक्तानें भडक झालेले होते. हातांतील सामान इतस्ततः फेकलें गेलेलें होतें.

भोंवतालीं जमलेली मंडळी खिन्न वदनानें उभी होती. गार्ड, ड्रायव्हर, दोन पोर्टर हेही तेथें हजर होते.

मी सर्वांकडे नजर फिरविली व मलाही अत्यंत वाईट वाटलें. मनांत म्हटलें " बिचारा हमाल. मुलीच्या लग्नाचें सामान आणावयास जातो काय, आणि स्वप्नांत देखील आलें नसलेलें अनिवार्य संकट त्याच्या जीवावर येतें काय; आणि दुर्दैव हें कीं त्याच्या अंगावरून जाणाऱ्या गाडींतून आपणही येत होतों. ह्या बिच्याऱ्याचा कमरेजवळून जेव्हां गाडीचें प्रचंड चाक गेलें असेल तेव्हां त्याला ब्रह्मांड आठवलें असेल ! अभागी पत्नीची आठवण होऊन लहानग्या अर्भकाचा कोमल आवाज त्याच्या कानावर पडल्याचा भास त्याला झाला असेल व पुन्हां तो ऐकावयास मिळणार नाहीं म्हणून त्यानें अश्रू ढाळले असतील. म्हातारी आई

असेल तर तिचें हृदयविदारक विव्हळणें त्याच्या कानांवर पडूं लागल्यासारखें त्याला वाटलें असेल आणि जर माझ्यासारखी ताई त्याला—"

ही कल्पना मनांत येतांच मला दचकल्यासारखें झालें. वेड्याप्रमाणें मी चहूं बाजूंस पाहिलें. आगगाडीखालीं चिरडून जाणाऱ्याला असले विचार मनांत यायला तरी अवकाश कुठें असतो ? असें मनांत येऊन मी अति विचार करणाऱ्या माझ्या मनाला दोष दिला. आपण कोणच्या कारणासाठीं जागा सोडून आलों याचें मला स्मरण झालें. व शेजारीं उभ्या असलेल्या ड्रायव्हरकडे मी स्थिर दृष्टीनें पाहूं लागलों.

आपण प्रश्न विचारला तर हा नीट उत्तर देईल कां ? असा मला प्रश्न पडला. परंतु घाबरण्यांत अर्थ नाहीं असें मनाशीं म्हणून मी त्याला एकदम विचारलें.

" मिस्टर ! गाडी किती वेळ थांबणार आतां ? "

त्यानें उत्तर न देतां उपहासात्मक दृष्टीनें माझ्याकडे पाहिलें.

" अर्धा-पाऊण तास झाला कीं—" हें पुढें मी म्हणालों, त्यावेळीं माझा स्वर केंविलवाण्या झाला होता; पण त्याला त्याचें कांहींच वाटलेंसें दिसलें नाहीं. त्यानें गार्डाकडे व नंतर इतर मंडळीकडे पाहिलें. तुच्छतादर्शक स्मित केलें. पुन्हां स्तब्ध राहून पुढें पडलेल्या प्रेताकडे पाहून त्रासिक व उपहासात्मक स्वरानें म्हटलें.

" निर्दय ! किती हो निर्दय आहांत तुम्ही ! ! समोर तुमच्या गरिबाचं प्रेत पडलं आहे अन् तुम्हाला घरीं जाणं सुचतं तरी कसं ? "

जवळच्या इतर मंडळींनींहि त्याच ' निर्दय 'पणाचा उच्चार केला व त्याच्या म्हणण्याला पुष्टि दिली.

" निर्दय ! " मी खालीं मान घातली व बाजूस झालों—तो शब्द माझ्या कानांत पुन्हा घुमूं लागला—

" निर्दय ! " मी मनाशीं म्हटलें " निर्दय कसा ? काय केलं मी ? कोण जाणं ?"

मला कांहींच सुचेना म्हणून मी तसाच डब्यांत चढून जवळच्या बाकावर धाडकन् अंग टाकलें व विषण्ण मनस्कतेनें इकडे तिकडे पाहूं लागलों.

" निर्दय ! " पुन्हां तोच शब्द कानांत कोणीतरी उच्चारीत आहे असा मला भास झाला. " खरंच मी निर्दय आहे कां ? " मी मनाला प्रश्न केला. एकदां वाटलें—" नाहीं कसा ? हा निर्दयपणाच म्हटला पाहिजे. हमाल झाला म्हणून काय

झालं, सगळीं परमेश्वराचींच लेकरं. भाऊ-भाऊच सगळीं नाहींत कां? मग भावाचें प्रेत टाकून निघून जाण्याची घाई करणें किती कठोरपणाचें आहे? मृताबद्दल आदर दाखविणें हें प्रत्येकाचेंच कर्तव्य आहे.पण आपण मात्र त्या गरीब हमालाला तेथेंच टाकून जाण्याची घाई केली.शवाचा योग्य तो शेवट लावणें दूरच राहिलें, पण जवळ उभें राहून त्याची चौकशी करून शाब्दिक कां होईना, पण सहानुभूति प्रदर्शित करणें हेंच आपलें कर्तव्य आहे—"

ह्या विचारांनीं माझा निर्दयपणा स्पष्ट झाला. व त्या भरांत मी पुन्हां त्या हमालाजवळ जाण्यास उठलों तोंच—

ताईची मृत्युशय्येवर तळमळणारी मूर्ति अंतःचक्षूपुढें उभी राहिली व म्हणूं लागली—"भाऊ, किती रे तूं निर्दय आहेस! तुझी सख्खी बहिण इथें तळमळत आहे अन् तूं मात्र तिथें वेळ घालविण्याच्या विचारांत आहेस!-भाऊ! माझा प्राण तुझ्या भेटीसाठीं कंठाशीं घुटमळत आहे! मी येईन ताबडतोब म्हणून तूंच ना कबूल केलंस, आणि आयत्या वेळीं निर्दयपणें उशीर करूं पहातोस? लहानपणापासून तुझ्यावर मी किती प्रेम करीत आलें पण त्याची परतफेड-तुझ्या दृष्टिभेटीसाठीं मी तळमळत असतांना देखील-अशी निर्दयपणें करतोस?"

"निर्दय!" खरंच सर्वस्वीं निर्दय आहे मी! ताईच्या भेटीसाठीं-वैयक्तिक बंधुप्रेमानें-उत्सुक झालों म्हणून आधीं निर्दय ठरलों व विश्वबंधुत्वाच्या उदात्त कल्पनेनें तेथें थांबूं लागलों म्हणूनही मी निर्दय ठरलों-आणि दोन्ही गोष्टी खोट्या नव्हत्या.

मला अंधेरी आल्यासारखें वाटूं लागलें. कंठ कोरडा पडून आवंढा देखील गिळतां येईना अशी माझी स्थिति झाली व तळमळणाऱ्या ताईच्या कल्पनामय चित्रामुळें हृदय भरून आल्यामुळें मला कोठेंच बघवेना; डोळे घट्ट दाबून धरले व मुसमुसून रडूं लागलों!

* * *

तो प्रसंग गेला, तो दिवस गेला व माझ्यासाठीं तळमळणारी माझी लाडकी बहीण पण गेली!!

पण खरोखर मी निर्दय आहें अं? हें कोडें मात्र अजूनही उलगडत नाहीं.



# मोटार-ड्रायव्हर

( लेखक—श्रीयुत व. त्र्यं. सोनाळकर. )

“दुसरीकडे कोठें सध्यां तरी सोय लावतां येणार नाहीं; पण माझा मोटारड्रायव्हर गेला आहे तेव्हां त्या कामावर पहा रहात असाल-तर—”

मोटार-ड्रायव्हर—

माझ्या अंगाचा नुसता भडका झाला ते शब्द ऐकून ! मी क्रुद्ध नजरेनें त्यांच्याकडे पाहिलें, व ताड्कन म्हणालों, “ मी बी. ए. आहे—”

“ मला माहीत आहे. ” ते शान्तपणें म्हणाले “ जरा शान्त डोक्यानं विचार करा ! नुसत्या शब्दाला बिचकून जाऊं नका. उद्यां अगर परवां केव्हां तरी येऊन मला भेटा. मात्र दोन दिवसांच्या आंत काय तें नक्की कळवा. तोंपर्यंत मी तुमची वाट पाहीन. ”

मी एकहि शब्द न बोलतां दिवाणखान्यांतून बाहेर पडलों. मला तेथें थांबण्याची मुळींच इच्छा नव्हती. त्यांच्या त्या शब्दांनीं मी इतका संतापलों होतों, कीं वाटलें ज्या कंठांतून हे शब्द बाहेर पडले—

लाज नाहीं वाटली असं विचारतांना—

बी. ए. झाल्यावर मोटारड्रायव्हर—

नेहमींप्रमाणें मी निराश अंतःकरणानें घरांत शिरलों. आज सहा महिने माझा हा कार्यक्रमच होऊन बसला होता. ज्या दिवशीं माझा बी. ए. चा रिझल्ट लागला, त्याच दिवशीं बाबा वारले. आणि मला पुढचा विद्याभ्यास सोडून नोकरीच्या पाठीमागें लागावें लागलें. आम्ही घरचे फारसे श्रीमंत नव्हतों. पण बाबांच्या काटकसरी स्वभावामुळें त्यांनीं थोडीफार 'शिल्लक' राखली होती. त्यावर आम्ही जवळजवळ सहा महिने काढले. नेहमीं अर्जांचीं बेंडोळीं घेऊन फिरायचं व संध्याकाळीं घरीं निराश होऊन यायचं, असें गेले सहा महिने चाललें होतें. आतां आमच्याजवळचें भांडवल संपुष्टांत यावयाची वेळ आली होती. आणि म्हणून मी अगदीं जारीनें प्रयत्न करीत होतों. पण या बेकारीच्या दिवसांत नोकरी मिळावी कशी—मी एकटा असतों तर—

पण माझ्या गळ्यांत शकूचं एक लोढणं होतं—

माझा विवाह बाबांनीं गेल्या वर्षींच करून दिला होता.

मी घरांत शिरलों. शकूनें माझें हास्यमुखानें स्वागत केलें. नेहमीं मी निराश होऊन घरीं आलों, कीं आपल्या गोड हास्यानें शकू माझें स्वागत करी व मला धीर देई. पण आज तेंच गोड हास्य माझ्या अपमानित मनाला शान्त करूं शकलें नाहीं.

नेहमीं तिची ती हास्यमुद्रा पाहून माझ्या तोंडावर माझ्या नकळत आपोआप हास्यरेषा उमटत; पण आज तसें झालें नाहीं—

—माझ्या डोक्यांत बी. ए. आणि मोटारड्रायव्हर धांगडधिंगा घालीत होते—नेहमींचा 'रामबाण' फुकट जातांच शकूचें हास्य लोपलें. पण ती शान्तपणें म्हणाली, "हें काय, किती चेहरा उतरलेला दिसतो आहे! दुपारीं चहा घेतलेला दिसत नाहीं. कपडे काढावे, तोंपर्यंत मी सुंदरसा चहा करून घेऊन येतें." असें म्हणून ती आंतल्या खोलींत गेली.

मी कोट काढून खुंटीवर ठेवला, व विषण्ण अंतःकरणानें आरामखुर्चींत अंग टाकलें. संतापाची जागा आतां दारुण निराशेनें भरून काढली होती.

शून्य मनानें आढ्याकडे पहात मी पडलों होतों.

शकूनें चहाचा कप आणून माझ्या हातांत दिला.

त्यावेळीं मला चहाची गरज होती किंवा नव्हती याची जाणीवहि नसतां मी निमुटपणें तो चहा घशाखालीं लोटला.

जवळच शकू माझ्याकडे निश्चल दृष्टीनें पहात उभी होती. बराच वेळ आम्ही दोघेही स्तब्ध होतों. शेवटीं शकू म्हणाली, "आज असं झालं तरी काय ? किती चेहरा उतरून गेला आहे."

"शकू, बस अशी. तुला न सांगून कसं चालेल ? दुर्दैवानं तुझा माझ्याशीं जन्माचा संबंध जडलेला आहे. तुला न सांगून काय करूं ? आजपर्यंत मी नुसत्या निराशेचा अनुभव घेत होतों-आज त्यांत अपमानाची भर पडली—"

शकूची मुद्रा दुःखी झाली. तिनें आपली मान खालीं घातली. अर्थात् मी तिच्याकडून उत्तराची अपेक्षा करीत नव्हतों. मी जरा वेळानें म्हणालों, "बी. ए. होऊन मोटारड्रायव्हर—" मी माझें मस्तक दोन्ही हातानें दाबून धरलें. "शकू, शकू, आज तुझा मोह नसता तर मी आत्महत्या—"

शकूनें आपला कोमल हात माझ्या तोंडावर ठेवला व गडबडीनें म्हणाली, "काय हें—पुरुषांनीं संकटाला भ्यायचं तर स्त्रियांनीं काय करावं ? आत्महत्येचा विचार-छे, शोभत नाहीं हे पुरुषीपणाला—हें पहा माझं ऐकावं—आतां अगदीं स्वस्थ पडायचं. मी तोंपर्यंत चुलीला लागतें. जेवणं वगैरे झालीं कीं स्वस्थपणें बोलूं—हं." शकू माझ्याकडे प्रेमळपणें पहात मला उत्तर देण्याचीही सवड न देतां घरांत निघून गेली.

स्वस्थता ! आतां या अपमानानंतर स्वस्थता ! !

अशक्य ! बी. ए. ! आणि मोटार-ड्रायव्हर !

काय हा अपमान !

***   ***   ***

"**बे**काराची अगर इतरांच्या दयेवर जगणाराची बायको म्हणवून घेण्यापेक्षां मिळवत्या मोटारड्रायव्हरची बायको म्हणवून घेण्यांत मला आनन्द वाटेल."

"शकू, बोलणं सोपं आहे. ध्येयाचीं गोंडस वाक्यं बडबडणं फुकाचं असतं. पण वेळ आली कीं तें वाऱ्यावरचं बडबडणं वाऱ्यावर जातं. पण शकू, शेजारपाजारच्या बायका जेव्हां 'मोटारड्रायव्हर' ची बायको म्हणून हिणवितील, त्या वेळीं हें तुझें गोंडस वाक्य राहील बाजूला आणि डोळ्यांतून गंगायमुना येतील."

"खरंच सांगतें. मला कांहीं वाटायचं नाहीं."

"पण शकू, मला ती कल्पनाच सहन होत नाहीं. बी. ए. होऊन मोटार-ड्रायव्हर—"

"धन्द्याला कां कुठें कमीपणा चिकटलेला असतो. धन्दा म्हटला कीं तो मूलतः वाईट नसतो.तो ज्यांच्या हातांत जातो, ते त्याला तसलं वाईट स्वरूप देतात. मला तर वाटतं कीं अशिक्षितापेक्षां सुशिक्षितांनींच मोटार-ड्रायव्हर्स बनून त्या धन्द्याला आलेलं किळसवाणं रूप घालविलं पाहिजे."

"तीं श्रीमन्तांचीं कामं आहेत. श्रीमन्तांनीं कोंड्याची भाकरी खाल्ली तर ती त्यांची लहर ठरेल. दरिद्र्यांनीं खाल्ली कीं दुसरें कांहीं खायला मिळत नाहीं, म्हणून खातो, असंच जग म्हणेल."

"जग काय म्हणेल यावर कां स्वतांच्या कर्तबगारीचा रस्ता आखाय्चा. परदेशांत म्हणे मोठमोठ्या काखानदारांचीं मुलं आपल्याच कारखान्यांतून इतर मजुराबरोबर कामें करितात—

"तुझ्या डोक्यांत 'व्याख्यानाचं भूत' संचारलेलं दिसतं आहे. हें पहा, असलीं लेक्चरं मी खूपच वाचलीं आहेत, ऐकलीं आहेत. वाचतांना आणि ऐकतांना मला तीं गोड वाटलीं. पण आज प्रत्यक्ष वेळ येतांच—शकू, गेल्या वर्षीच्या माझ्या आजारानंतर मी मावशीकडे गेलों आणि त्यावेळीं तिच्या 'कार'वर हौसेनं मोटार ड्रायव्हिंग शिकलों. मावशीची मोटार मी किती अभिमानानं नागपुरांतून फिरवीत असे—पण उद्यां तशीच नानासाहेबांची मोटार, त्यांचा मोटार-ड्रायव्हर म्हणून—कल्पनाच असह्य होते. हौसेच्या कलेवर पोट जाळण्याची कल्पना मला कशीशीच वाटते. पण दुर्दैवानं ती वेळ आणली आहे. मी अतिशय व्यथित झालों आहें, हें पाहून शकू म्हणाली, "जाऊं द्या, उद्यां पाहतां येईल काय करायचं तें. आज रात्रीं दोघेही विचार करून ठरवूं काय करायचं तें—"

* * *

दुसऱ्या दिवशीं भवति न भवति होऊन मी शेवटीं नानासाहेबांच्या बंगल्यावर दाखल झालों.

परत त्याच ठिकाणीं मी खालीं मान घालून उभा होतों, नानासाहेब आंत आले.

"बसा त्या खुर्चीवर. बसा—असा संकोच नका धरूं. मग काय विचार झाला तुमचा ?"

" मी आपल्या मोटारवर रहायला तयार आहें." मी खालच्या मानेनें उत्तर दिलें.

"खरं सांगायचं म्हणजे तुम्ही खरोखर शहाणपणा केला आहे. कारकुनीच्या चकारींतून इतरांच्या मागें जाण्यापेक्षां कोठें तरी इतर धंद्याकडे पहाण्याची आपली दृष्टीच गेली आहे. शिक्षण घ्यायचं ते कारकुनीसाठीं—हाच शिक्षणाचा हेतु बनला आहे. मला तुमच्याबद्दल फार अभिमान वाटतो. यावरून हलक्या दिसणाऱ्या धंद्यांतूनहि तुम्हांला तुमची उन्नति करून घेतां येईल. पण तुम्हीं नेकीनं आणि धीरानं वागलं पाहिजे. चला, आपली गाडी मी दाखवितों तुम्हांला."

मी नानासाहेबांच्या मागून चालूं लागलों. नानासाहेबांच्या वर्तणुकीचें मला आश्चर्य वाटत होतें. त्यांच्या मोटारवर मी ड्रायव्हर होण्याचं कबूल केलं तरी ते माझ्याशीं सन्मानानें वागत होते.

आम्हीं गॅरेजमध्यें आलों. अतिशय सुंदर कार होती ती ! एक २०–२१ वर्षांचा मुलगा ती स्वच्छ पुसत होता.

" नारायण, हे पाहिलेंस कां तुझे नवे मालक" नानासाहेब माझ्याकडे अंगुलीनिर्देश करीत म्हणाले, " हे सांगतील तसं करीत जा. तुझ्याबद्दलची माझ्याकडे तक्रार येतां कामा नये." नंतर माझेकडे पहात ते हंसत म्हणाले, " नेतां कां आम्हांला थोडेंसें ड्राइव्हला ?"

* * *

महिन्याच्या शेवटीं नानासाहेबांनीं माझ्या हातावर कांहीं नोटा ठेवीत म्हटलें, " हे घ्या, शंभर आहेत—"

मी आश्चर्यचकित झालों. माझी कल्पना होती कीं, ५०—अगदीं फार झालं तर पंचाहत्तर देतील.

" आतां घरीं—आज फार वेळ झाला तुम्हांला जायला—घरीं मंडळी काळजींत असतील.

"नानासाहेबांच्याबद्दल मला त्यावेळीं काय वाटलं तें सांगतां येत नाहीं. मी त्यांच्याकडे कृतज्ञतापूर्वक पाहून परत फिरलों. कारण माझ्या डोळ्यांत अश्रू तरंगूं लागले होते.

मी झपाट्यानें घराकडे निघालों. शकूच्या पुढं केव्हां एकदां उभा राहीन असं मला झालं होतं. आणि त्या उत्साहामुळें मला असं वाटलं कीं आज मी किती तरी हळूं चाललों आहें. घर देखील येत नाहीं !

दारांत शकू उभी होती. तिनें हास्यमुखानें माझें स्वागत केलें. मी घरांत शिरतांच मी तिच्यापुढं नोटा धरीत म्हणालों," उपदेशाचं पहिलं फळ मी तुझ्या चरणीं अर्पण करितों. त्याचं तूं वाटेल तें कर."

"असं कां—मग तें मी आपल्यालाच बक्षीस देतें." शकू हंसत म्हणाली. "शकू—" मला पुढें बोलवेना. मी तिचा हात माझ्या हतांत घट्ट धरून ठेवला, व तिच्याकडं पहात राहिलों.

ती गोड हंसत होती—

माझ्याभोंवतीं असलेल्या या दोन देवमाणसांना पाहून स्वर्गांतलि देवांना देखील हेवा वाटत असावा.

* * * * * * * * *

**चार** वर्षांत माझी स्थिति कितीतरी बदलली होती. मी पांच सात सुशिक्षित तरुणांना मोटारड्रायव्हर बनविलें होतें. ते निरानिराळ्या ठिकाणीं नोकरीस होते.

एके दिवशीं नानासाहेब मला म्हणाले, "हें पहा, मी एक योजना तयार केली आहे. २०–२५ हजार मोटारच्या धंद्यांत घालायचा माझा विचार आहे. पांच सहा मोटारी खरेदी करून एक 'मोटार—ड्रायव्हिंग' शिकण्यासाठीं वर्ग काढावा व फक्त सुशिक्षित वर्गांतील तरुणांना तेथें मोटार—ड्रायव्हिंगचें शिक्षण द्यावें. व त्याच्या जोडीला कांहीं मोटार्स भाड्यानं ठेवाव्या ही साधारण रूपरेषा सांगितली. त्याचे सर्व कागदपत्र मी तुम्हाला दुपारीं दाखवीन. पैसे मी घालतों धंद्यांत; तुम्हीं सर्व व्यवस्था पहायची. आणि माझे भागीदार म्हणून रहायचं. आहे कबूल ?"

—अर्थात् मी कबूल केलें.

* * *

अजूनहि मी मोटारड्रायव्हर आहें. पण माझ्या हाताखालीं १५ मोटारी असून तितकेच ड्रायव्हर्स आहेत. आमच्या शाळेंत कित्येक सुशिक्षित तरुण शिक्षण घेत आहेत व भाड्याच्या गाडीवर असणाऱ्या ड्रायव्हर्समध्यें एकहि मॅट्रिक न झालेला असा नाहीं. एक तर माझ्यासारखाच बी. ए. आहे.

"धंदा म्हटला कीं तो मूलतः वाईट नसतो. तो ज्यांच्या हातांत जातो, ते त्याला तसलं वाईट स्वरूप देतात" हा गुरुमंत्र देणारी माझी भाग्यदेवता शकू आतां मोटारड्रायव्हराची बायको म्हणून ओळखली जात नसून मोटार मालकाची बायको म्हणून ओळखली जाते.

मी मात्र स्वतांला अजून 'मोटारड्रायव्हर' म्हणून: म्हणवून घेण्यांत भूषण मानतों.



# स्फूर्तीचे तीन कथासंग्रह.

[ १ ]

**स्फूर्तीमधील २२ गोष्टी**

स्फूर्ति मासिकाच्या पहिल्या वर्षांत प्रसिद्ध झालेल्या महत्त्वाच्या गोष्टींचा व चरित्रलेखांचा संग्रह या पुस्तकांत केला आहे. स्फूर्तिदायक ऐतिहासिक गोष्टी, उद्बोधक सामाजिक लघुकथा, उदात्त चरित्रलेख आणि मनोरंजक शास्त्रीय गोष्टी यामुळे हा संग्रह वाचनीय झाला आहे.

पृष्ठसंख्या ३३२ किंमत १। रु०

[ २ ]

**स्फूर्तिप्रभा**

स्फूर्ति मासिकाच्या दुसऱ्या व तिसऱ्या वर्षी प्रसिद्ध झालेल्या गोष्टींपैकी वाचनीय व उद्बोधक अशा निवडक लघुकथांचें या पुस्तकांत पुनर्मुद्रण केलें आहे. प्रसिद्ध लेखकांच्या सुरस लघुकथांचा यांत समावेश झालेला असल्यामुळें या पुस्तकाला आधुनिक लघुकथांच्या प्रातिनिधिक ग्रंथाचें स्वरूप प्राप्त झालें आहे.

पृष्ठसंख्या ३६० किंमत १ रु०

[ ३ ]

**कथासंसार**

स्फूर्ति मासिकाच्या चवथ्या वर्षी प्रसिद्ध झालेल्या लघुकथांपैकीं वेचक गोष्टींचा हा तिसरा संग्रह आहे. या संग्रहांतील गोष्टींची निवड कसोशीनें केली असल्यामुळें त्यांतील बहुतेक गोष्टी मनोवेधक व कलापूर्ण अशा आहेत.

पृष्ठसंख्या २०० किंमत १ रु०